# हिन्दी-मराठी-कोष





रचयिता

श्री नारायण तम्माजी कातगडे
उर्फ श्री पुण्डलीक

ॐ

# हिंदी-मराठी-कोश

लेखक

## नारायण तंभाजी कातगडे

उर्फ

पुंडलीक

( "हिंदी-शिक्षक अथवा स्वराज्याच्या भाषेशीं परिचय" के लेखक )

प्रकाशक

सस्ता-साहित्य-मंडल, अजमेर

[प्र]थमवार १००० ]     १९२८     [ मूल्य २)

सजिल्द का मूल्य २॥)

प्रकाशक
जीतमल लूणिया, मंत्री
सस्ता-साहित्य-मंडल अजमेर







नोट—सस्ता-मंडल से प्रकाशित सस्ती हिंदी पुस्तकों की सूची अंतिम पृष्ठों में देखिए।



मुद्रक
जीतमल लूणिया
सस्ता साहित्य प्रेस, अजमेर

## प्रकाशक के दो शब्द

गांधीजी ने अपनी आत्मकथा में चंपारन के बारे में लिखते हुए जिन पाठशालाओं का उल्लेख किया है उनमें से एक को चलाने वाले स्वयंसेवक पुंडलीकजी हैं। महाराष्ट्रीय होते हुए और हिन्दी भाषा से अनजान होते हुए भी उन्होंने बिहार के देहात में शिक्षा का काम करने की हिम्मत की, और वहां की जनता का प्रेम संपादन किया। उसी हिम्मत से उन्होंने हिन्दी भाषा का अच्छी तरह अध्ययन भी किया, और इस सिद्धान्त का अनुभव किया कि हिन्दी ही भारतवर्ष की राष्ट्रीय भाषा हो सकती है। यह अनुभव करते ही अपने उत्साही स्वभाव के अनुसार महाराष्ट्रीयों के लिए एक 'हिन्दी-शिक्षक' उन्होंने तैयार किया, और आज उसी की पूर्ति के लिए यह 'हिंदी—मराठी-कोष' भी उन्होंने तैयार किया है। हिंदी पढ़ने में महाराष्ट्रीयों को कितनी सहायता की जरूरत है, और किस किस्म के कोष की उन्हें जरूरत है इसका ठीक ठीक ख्याल रख कर ही उन्होंने इस कोष की रचना की है। इस पर उन्होंने जो परिश्रम किया है वह सहृदय पाठकों की नजर से छिपा न रहेगा। और यह परिश्रम उन्होंने केवल सेवाभाव से राष्ट्र-भाषा के प्रति अपने अटूट प्रेम के लिए किया है।

महाराष्ट्र का राष्ट्र-प्रेम सुविख्यात है। राष्ट्रीयभाषा सीखने में उत्साह पूर्वक इस ग्रन्थ का वे उपयोग करेंगे इस आशा से मंडल ने भी अपने निश्चित कार्यक्षेत्र से बाहर जाकर भी महाराष्ट्रोपयोगी यह ग्रंथ प्रकाशित किया है। आशा है कि महाराष्ट्र इस मंडल की इस सेवा और श्री पुंडलीक जी के प्रेम-मय परिश्रम की जरूर कद्र करेगा।

मंत्री
सस्ता-साहित्य मण्डल, अजमेर

# अभिप्राय

श्री० ब्रह्मचारी पुण्डलीकजी यांनी लिहिलेल्या हिन्दी-मराठी-कोशाची हस्त लिखित प्रत मी पाहिली. शब्दाला सुटसुटीत असा हिंदी प्रतिशब्द ही देण्याचा प्रयत्न केलेला असून त्यांत ही बरेंच यश आलेलें आहें. हिंदी मध्यें वापरले जाणारे सोपे संस्कृत शब्द व हिंदी मध्यें क्वचित् वापरले जाणारे बोजड उर्दू शब्द या कोशांत न घेतल्यामुळें, हा कोश महाराष्ट्राच्या दृष्टीनें जसा व्हावयास पाहिजे होता तसाच झाला आहे. शब्दांची निवड चांगली झाली आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. 'हिंदी-शिक्षक अथवा स्वराज्याच्या भाषेशीं परिचय–' हें पुस्तक प्रसिद्ध झाल्या नंतर अशा प्रकारच्या हिंदी-मराठी-कोशाची महाराष्ट्रांत आवश्यकताच होती; ती ह्या कोशानें भरून निघाली आहे. शिवाय या कोशाला जोडूनच हिंदी वाक् प्रचार किंवा वाक्–संप्रदाय याचा ही एक छोटासा कोश दिलेला आहे, त्याचा ही उपयोग हिंदी शिकणारांस पुष्कळच होण्या सारखा आहे. हिंदी ही आपली राष्ट्रीय भाषा आहे हें आतां निर्विवाद ठरलें आहे, आणि हिंदी शिकणाऱ्या प्रत्येक महाराष्ट्रीयास श्री पुंडलीकजी यांच्या "हिंदी–शिक्षका" प्रमाणेंच त्यांचा हा "हिंदी-मराठी-कोश" उपयोगी होईल अशी मला खात्री आहे।

सातारा
ता०-२० । १२ । १९२५ } न० चिं० केळकर

---

श्री केळकर से मैं सहमत हूँ ।

एम्. आर. जयकर

---

श्री नारायण तम्माजी कातगडे यानीं हिंदी-मराठी-कोश लिहिलेला मी पाहिला मराठी मायभाषा असून हिंदी शिकूं इच्छिणारास तो फारच उपयोगी पडेल. रा. कातगडे यांनीं हिंदी चा अभ्यास येथें व हिंदी मुलखांत राहून केला असल्यानें मराठी विद्यार्थ्यांस कोश कसा उपयोगी पडेल याची कल्पना त्यांस उत्तम असल्यानें हा कोश तज्ज्ञांच्या व इतर दृष्टीनें ही उपयोगी झाला आहे. अपरिचित व कधींमधीं येणारे उर्दू शब्द त्यांनीं गाळले आहेत, आणि परिचित व सामान्य हिंदी लोकांच्या बोलण्यांत येणारे तेवढे घेतले आहेत, हिंदी–वाक्प्रचार म्हणजे लकबी व म्हणी यांचा ही त्यांनीं समावेश केला आहे, तात्पर्य हा कोश मराठी लोकांस चांगलाच उपयोगी पडेल।

ता० ७ । १ । २६ ] चिंतामणि विनायक वैद्य

---

श्री पुण्डलीकजी यांनां हिन्दी भाषेचें महत्व अनुभवानें पटलें आहे. चंपारण्य मध्यें मुलांनां शिकवितां शिकवितां ते स्वतः ती भाषा शिकलें. स्वराज्याच्या सर्व चळवळी पैकीं राष्ट्रभाषा-विस्ताराची चळवळ त्यांना विशेष पटली आहे. मराठी बोलणाऱ्या लोकांच्या सोयी साठीं त्यांनीं 'हिन्दी-शिक्षक' म्हणून एक पुस्तक तयार केलें आहे. त्याच्या पुढील सोय म्हणून त्यांनी हिन्दी-मराठी-कोश ही तयार केला आहे. हा कोश विशिष्ट हेतूनें च केलेला आहे. मराठी जाणणाऱ्या प्रौढ वाचकांना सहज समजणारे शब्द यांतून बहुत करून गाळले आहेत, व म्हणून च पुस्तकाची उपयुक्तता कमी न होतां तें इतकें आटपशीर झालें आहे. जाडे जाडे विद्वद्भोग्य संस्कृत आणि फारशी अरबी शब्दांना ही त्यांनीं विचारपूर्वक रजा दिली आहे, शब्दार्थ कामाचे आणि बरोबर दिले आहेत, हा कोश बरोबर बाळगला असतां सामान्य व्यवहार अथवा वाचनाच्या बाबतींत कोणची ही अडचण येणार नाहीं या पुस्तकानें हिंदी शिकूं इच्छिणाऱ्यांची चांगलीच सोय होणार आहे।

दत्तात्रेय बालकृष्ण कालेलकर।
माघ० शु० १ शुक्रवार ।

# प्रस्तावना

देशामध्यें हिंदी ही राष्ट्राची सार्वत्रिक भाषा व्हावी अशी जी चळवळ चालू आहे, त्याचा एक भाग म्हणून प्रस्तुत 'हिंन्दी–मराठी–कोश' लिहिला व छापला जात आहे. हिंदुस्थानची राष्ट्रीय भाषा हिंदी हीच असावी या बद्दल मतभेद असण्याचें कारण आतां राहिलेलें नाहीं. आणि जरी थोडा बहुत मतभेद कोठें असलाच तर त्याला उत्तर देण्याची जागा ही नव्हे. हिंदी किंवा दुसरी कोणतीहि भाषा राष्ट्राची राष्ट्रीय म्हणजे सार्वत्रिक भाषा मानणें, म्हणजे आपापल्या मातृभाषांची उपेक्षा करणें खात्रीनें नव्हे. हिंदमातेच्या अखिल पुत्रांना हिंदीभाषा चालचलाऊ कामापुरती तरी व्यवस्थित समजली पाहिजे यांत शंका नाहीं. हिंदी मराठीशीं अगदींच जुळती असल्यामुळें मराठी जाणणाऱ्या लोकांनां हिंदी शिकणें अत्यन्त सुलभ आहे. महाराष्ट्रांतील लोकांनां हिंदी शिकविण्या करितां एक हिंदी व्याकरण व हिंदी–मराठी–कोश या दोन पुस्तकांची आवश्यकता मला वाटूं लागली, आणि मिळेल त्या संधीचा फायदा घेऊन हीं दोन्हीं पुस्तकें तयार करून लिहून प्रसिद्ध करण्याचा छंद माझ्या मनानें घेतला. 'हिन्दी–शिक्षक अथवा स्वराज्याच्या भाषेशीं परिचय' हें पुस्तक मी लिहून प्रसिद्ध केलें आणि जनतेनें त्या पुस्तकाचा गौरव चांगला केला असून मीं जनतेचा त्या बाबतींत ऋणी आहें.

हिंदी–मराठी–कोश लिहिण्याचें काम हातीं घेण्याचें पूर्वीं मीं त्या विषयांची आवश्यक माहिती मिळविली, आणि महाराष्ट्रांतील व इतर ठिकाणच्या विचारी व तज्ज्ञ लोकांशीं पत्र-व्यवहार करून सर्वांकडून सूचना मागविल्या, त्या सूचनांचा योग्य विचार केला, त्या सर्वांच्या सर्व सूचानांचा या ठिकाणीं प्रत्यक्ष उल्लेख करण्याचें कारण नाहीं. सूचना मागविल्या असतां माझ्या पत्रांनां आस्थेनें उत्तरें पाठविणारां मध्यें श्री बाबा साहेब परांजपे, वऱ्हाड; पंडित हरीहरशर्माजी, मद्रास; आनंद-कर्ते श्री० वासुदेव आपटे, पुणें; श्री० काका साहेब कालेलकर, सत्याग्रहाश्रम साबरमती; आणि कै० पू० अण्णा साहेब विजापुरकर वगैरे मंडळी प्रमुख होतीं. श्री० अण्णासाहेब विजापुरकर यांनीं आपल्या पत्रांत असें म्हटलें आहे कीं—

"हिंदी भाषा शिकण्या बद्दल आज कांहीं दुमत असण्याचा संभव नाहीं, पण शिकण्याच्या पद्धति सम्बन्धीं मत-भेद होणें अगदीं शक्य आहे. त्याचें स्वरूप व्यावहारिक असावें कि वाङ्मयिक पूर्णत्वाच्या स्वरूपाचें असावें या बद्दल ही मतभेद असणें सहाजिक आहे, व कोश तयार करितांना या गोष्टीचा विचार अवश्य करावा लागणारच. ......तुलशिदासाचें हिंदी व आजचें हिंदी या मध्यें पुष्कळच फरक पडला आहे. शिवाय उर्दु-प्रधान हिंदी व संस्कृत-प्रधान हिंदी हा एक मोठा विकट प्रश्न कोशाच्या बाबतींत उद्भवणारच."

श्री० अण्णा साहेब विजापुरकर यांनीं केलेले वरील प्रश्न व इतर अनेकांनीं लेखी व तोंडी उपस्थित केलेले सवाल यांचा खुलासा, मीं कोशाची जी योजना दिली आहे ती या ठिकाणीं दिली असतां, आपोआप होण्या सारखा आहे. कोशाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें असावें हें निश्चित करण्याचा विचार करितांना नाम, सर्वनाम, विशेषण क्रिया विशेषण. व धातु हे सर्व वेगवेगळे दाखवून कोशाचें तितकें स्वतंत्र भाग करावेत असा एक विचार पुढें आला होता. थोडें कां होईना पण हिंदी जाणणाऱ्या लोकांनां तशा प्रकारच्या कोशाचा उपयोग अधिक झाला असता यांत शंका नसली तरी, नवशिक्या हिंदी जाणणारास शब्द शोधण्यास या योगें बराच त्रास पडला असता; आणि म्हणूनच तो विचार त्याज्य ठरविला. हिंदी शब्दाला एकादा हिंदी सुटसुटींत प्रतिशब्द ही मला शक्य झालें तेथें मीं प्रस्तुत कोशांत दिला आहे. शब्दाला, असा हिंदी प्रतिशब्द जेथें जेथें देण्यांत आला आहे ते सर्वच शब्द व्युत्पत्तीच्या दृष्टीनें मूळचे हिंदी आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. ते हिंदी मध्यें रूढ झालेले आहेत इतकाच त्याचा अर्थ आहे. मराठींतील जे शब्द हिंदींत बरोबर त्याच अर्थानें वापरले जातात ते ग्राह्याग्राह्य विचारानें वगळले आहेत. नियमास सुटून होणाऱ्या रूपांचा खुलासा

कित्येक ठिकाणीं देण्याचा प्रयत्न केलेला आहे. आपल्या राष्ट्रीय हिंदी मध्यें क्वचित वापरले जाणारे पारशी व अरेबिक आणि जाडे जाडे विद्वद्भोग्य संस्कृत शब्द कोशांत समाविष्ट करून कोश व्यर्थ फुगविलेला नाहीं. हिंदी मध्यें 'रा' व 'ड़ा' या मध्यें पुष्कळ वेळां भेद केला जात नसल्या मुळें एकच शब्द तसा दोन तऱ्हेनें लिहून तो दोन वेळां कोशांत घातलेला नाहीं. मूळचा शब्द कोठून म्हणजे कोणत्या भाषेतून आलेला आहे हें दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न या कोशांत केलेला आहे. हिंदी वाक्प्रचार व संप्रदाय यांचा एक स्वतंत्र कोश करून तो शेवटीं या कोशास जोडलेला आहे।

कोशाचीं बरीचशीं पानें लिहून झाल्यानंतर प्रवासांत कऱ्हाडची कृष्णानदी ओलांडतांना नावें मध्यें दोन हमालांच्या भांडणांत माझी कातड्याची बेग तुटली जाऊन कोशाचीं हस्त-लिखितें पुरामध्यें कृष्णार्पण झालीं, त्यायोगें नुकसान किती झालें याची कल्पना त्या 'हमालांना' काय असणार ? मीं तें निमुटपणें सहन केलें आणि कोष लिहिण्यासारखें कष्टाचें व किचकट काम कायमचें सोडून बसण्याच्या विचारांत कांहीं दिवस घालविले. हातांत घेतलेल्या कोणत्या चांगल्या कार्याला आपली कसोटी विघ्नाच्या वरकलावर करून घ्यावी लागत नाहीं ? पुनः पुनः कोशाचें हें काम भविष्यत झालें तरी तें मध्येंच सोडून न देतां त्याची माझ्या बुद्धीप्रमाणें मी व्यवस्थित कड पोंचविली आहे. असो.

रामनारायणलाल यांची The Students Practical Dictionary, इंग्रजी–हिंदी–डिक्शनरी; चतुर्वेदी द्वारकाप्रसाद शर्मा यांचा 'हिंदी शब्दार्थ पारिजात' ओकांचा गीर्वाण लघुकोश, तुळसीदासांचें हिंदी रामायण, प्रचलित हिंदी वाङ्मय ( अभ्यासकां करितां पुस्तकांची यादी कोशाला शेवटीं जोडलेली आहे ) कँडीचा इंग्रजी-मराठी-कोश वगैरे पुस्तकांचा उपयोग प्रस्तुत कोश तयार करितांना झालेला आहे. 'कँडीची डिक्शनरी', 'मिरज विद्यार्थी संघा' नें जवळ जवळ अठरा महिने माझ्याकडे उपयोगार्थ ठेविलेली होती त्या बद्दल त्या संस्थेचे मीं या ठिकाणीं आभार मानतों।

कोशांतील शब्दांची निवड व अर्थनिर्णय होऊन वर्णानुक्रमानें ते सर्व शब्द स्वच्छ लिहून निघे पर्यंत किती वेळां त्याची टिपणें व खाडा खोडी होत असतात, हें त्या कामांत प्रत्यक्ष पडल्या शिवाय कळणें थोडें कठीण आहे. असलीं कष्टाचीं कामें ज्या स्वयं सेवकांनीं हिंदी भाषेच्या प्रसारार्थ मधून मधून करण्यांत मला मदत केली आहे त्या सर्व तरुण मित्रांचा मी ऋणी आहे. अशा विकट व कष्टाच्या कामांत ज्यांनी उत्साहानें भाग घेतला होता त्यांत कै० अनन्त धोंडो शिराळकर यांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे। दैवदुर्विलास असा आहे कीं ज्या ठिकाणीं माझ्या या प्रस्तुत कोशाचीं बरीचशीं पृष्ठें पुरांत वाहून गेलीं त्याच गांवीं त्याच नदींत दुसऱ्याचा जीव वाचविण्या करितां पुढें सरसावलेल्या अनंतरावांना श्रीकृष्णामातेनें आपल्या ओट्यांत घेतलें. हा कोश पहाण्यास अनंतराव नाहींत ही अत्यन्त दुःखाची गोष्ट आहे !

अजमीरच्या 'सस्ता–साहित्य–मण्डल' नें हा कोश शक्य तितक्या लवकर छापवून हिंदी भाषेच्या प्रसाराला जी चालना दिली व सोय केली त्याबद्दल माझ्या बरोबर कोणाहि राष्ट्र-प्रेमी मनुष्यास त्या 'मण्डल' विषयीं अभिमानच वाटेल, आणि म्हणून माझ्या प्रमाणें सर्वच हिंदी-प्रेमी लोक मण्डलचे आभारी आहेत. श्री० दे० भ० न० चिं० केळकर, चिंतामणराव वैद्य आणि काका साहेब कालेलकर यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून प्रस्तुत कोशाची हस्त लिखित प्रत काळजी पूर्वक पाहून आपले अभिप्राय मला लिहून दिले व योग्य आणि महत्वाच्या सूचना केल्या त्या बद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहे।

हा कोश काय किंवा हिंदी–शिक्षक काय दोन्हीं पुस्तकांचा उद्देश महाराष्ट्रांत हिंदी-प्रचार करणें हाच आहे. या दोन्हीं ग्रन्थांतून नफा किंवा मेहनतीचा मोबदला म्हणून कांहींच घ्यावयाचे नसल्यानें, महाराष्ट्रांतील तरुण या पुस्तकाच्या सहायानें हिंदी भाषेशीं आपला परिचय करून घेतील तरच प्रस्तुत लेखक आपल्या श्रमाचें चीज मानील।

गांधी जयंति
शके १८५०
मिरज.

पुण्डलीक.

# हिन्दी-मराठी-कोष



राष्ट्र-भाषा भक्त

श्री गङ्गाधररावजी देशपाण्डे ( वेलगाँव )

सस्ता-साहित्य प्रेस, अजमेर

# अर्पण-पत्रिका

हिंदी ही प्रिय भारतांत करणें,
राष्ट्रीय भाषा, तरी ।
कोष-व्याकरणादि साधन हवे
अभ्यासकांच्या करीं ॥
केला यत्न तदर्थ अल्पतर हा,
यद्बोध ह्या कारण ।
त्या लोकाग्रणींतील पूज्य पुरुषा
गंगाधरा अर्पण ॥

पुण्डलीक

## सांकेतिक चिन्हांचा खुलासा

| | |
|---|---|
| ना० | नाम |
| वि० | विशेषण. |
| क्रि० वि० | क्रिया विशेषण. |
| स० ना० | सर्व नाम. |
| अ० | अव्यय. |
| पु० | पुल्लिंग |
| स्त्री० | स्त्रीलिंग. |
| हिं० | हिंदी. |
| उ० | उर्दू. |
| सं० | संस्कृत. |
| स० क्रि० | सकर्मक क्रियापद. |
| अ० क्रि० | अकर्मक क्रियापद. |
| × | प्रान्तीय शब्द |
| ❀ | कवितेंत येणारे शब्द |

टीपः—सर्व-साधारण कोशांमध्यें जीं सांकेतिक चिन्हें वापरलीं जातात त्यांचा अर्थ सामान्यतः सर्वांनाच माहीत असतो. तशा चिन्हांचा खुलासा या ठिकाणीं दिलेला नाहीं।

---

## लागत का ब्योरा

| | |
|---|---|
| कागज | ३३०) |
| छपाई, बाइंडिंग व चित्र | ८१०) |
| व्यवस्था, विज्ञापन, कमीशन आदि खर्च | ८६०। |
| | २०००) |

कुल प्रतियाँ १०००

एक प्रति का मूल्य २)

नोट—लेखक ने इसकी लिखाई का पुरस्कार कुछ नहीं लिया है, इसलिए लागत के ब्योरे में लिखाई नहीं जोड़ी गई है।

# हिन्दी-मराठी-कोष

## अ

अउ, अउर*—( अ० ) आणि, आणखी, शिवाय ।

अऊत*—( वि० ) अपुत्र ( हिं० ) पुत्रहीन, निपुत्रिक निर्वंश ।

अंकना, आंकना—( स० क्रि० ) खूण करणें, पुस्तकाला पानें घालणें, खुणेवरून ओळखणें ।

अंकवार—( ना० स्त्री० ) भेंट ( हिं० ) भेट, आलिंगन, मांडी । अंकवार देना,-भरना ।

अंगिया—( ना० स्त्री० ) चोली ( हिं० ) चोळी ।

अंगोछा—( ना० पु० ) अंग पूछा ( हिं० ) पंचा, आंगपुसणी, करवस्त्र, गात्रमार्जनी ।

अंत—( ना० पु० ) सिरा, छोर।( हिं० ) समाप्ति, शेवट, टोंक, अग्र ।

अंतरा, अंतरिया—(ना० पु०) एक दिवसा आड येणारा ताप ।

अंधेर—( ना० पु० ) अन्याय ( हिं० ) उपद्रव, अंधाधुंदी ना ताळ ना तंत्र ।

अंधेरा—( ना० पु० ) अंधार, अंधकार ।

अंबिया—( ना० स्त्री० ) कोयरी, कोंवळा, हिरवा अंबा ।

अंश—(ना० पु०) भाग, वाटणी, खांदा,—क (ना० पु०) वाटणी करणारा, बटवैया (हिं० ) ।

अंशल—( ना० पु० ) बाँटनेवाला ( हिं० ) वाटणारा ।

अकच्छ—( वि० ) नंगा, निर्ग्रन्थ ( हिं० ) नंगा, नागडा विवस्त्र ।

अकड़—( ना० स्त्री० ) टेढ़ापन ( हिं० )। वाकडेपणा, ऐट, अकड़बाज( ना० पु० )गर्विष्ट ।

अकथ
अकथनीय
अकथ्य } ( वि० ) न कहने योग्य ( हिं० ) न सांगण्यासारखें ।

अकनि+—( अ० ) अव्यय ।

अकम्+—( ना० स्त्री० ) वैर, शत्रुत्व ।

अकराम+—( ना० स्त्री० ) मिहरवानी ( हिं० ) दया, मेहरबानी, कृपा, अनुग्रह, मर्जी ।

अकर्मा—( वि० ) आळशी, सुस्त ।

अकर्मी—( ना० पु० ) दुराचारी ( हिं० ) लवाड़, सोदा, शठ, हरामजादा ।

अकल्पन+—( वि० ) यथार्थ (हिं०) वास्तविक, सत्य ।

अकलंक—( वि० ) बेदाग ( हिं० ) निर्दोष, निरपराधी,

अकहुवा+—(वि०) अकथनीय ।

अकाण्ड—( अ० ) हठात् ( हिं० ) अकस्मात्'—ताण्डव ( ना० पु० ) व्यर्थ गड़बड़;—पात् ( वि० ) जन्मतःच मरणारा ।

अकाज—( ना० पु० ) बिगाड़ ( हिं० ) बिघाड़, नाश, हिंसा ।

अकाट्य—( वि० ) अखण्डनीय ।

अकाम
अकारथ } ( वि० ) व्यर्थ, निष्फल, निरुपयोगी ।

अकाल—( ना० पु० ) दुर्भिक्ष ( हिं० ) वाईट वेळ, दुष्काळ;—पुरुष ( ना० पु० ) शीखांच्याग्रंथामधील-ईश्वर;—मृत्यु ( ना० स्त्री० ) अकाली येणारें मरण ।

अकुण्ठ—( वि० ) तीक्ष्ण ( हिं० ) पाणीदार, कड़क जलाल ।

अकुताना+—(अ० क्रि०)घबड़ाना (हिं०) घाबरणें, दमणें ।

अकुताही—( वि० ) ऊबनेवाला ( हिं० ) उदास ।

अकुतोभय—( वि० ) निडर ( हिं० ) निःशंक, निर्भय, साहसी ।

अकुल—( वि० ) नीच घराने का ( हिं० ) वाईट घराण्यांत जन्मलेला, नीच ।

---

फुटनोट—* कवितेंत येणारे शब्द; + प्रान्तीय, जुने अथवा अन्य भाषेंतील शब्द ।

अकुलाना—( अ० क्रि० ) घबड़ाना ( हिं० ) घाबरणें, भिणें, दमणें।

अकूपार—( ना० पु० ) समुद्र, सागर।

अकेला—( वि० ) एकटा, एकाकिन्।

अकोर*—( ना० स्त्री० ) मुँहभरी (हिं०) लांच, खाऊ, शेला पागोटें।

अकोरी* – (वि०) लांच खाणारा।

अकोसना—( स० क्रि० ) बुरा भला कहना ( हिं० ) शिव्या देणें, बरें वाईट बोलणें, तोंड-सुख घेणें।

अक्त—( वि० ) गीला ( हिं० ) भिजलेला।

अक्ल—( ना० स्त्री० ) बुद्धिमानी ( हिं० ) अक्कल, बुद्धी, ज्ञान;—का दुश्मन (वि०) मूर्ख;—मन्द (वि०) शहाणा।

अक्स—( ना० पु० ) पड़छाया।

अक्खड़ } (ना० पु०) गंवार ( हिं० ) रानटी, निष्का-
अखड़ } ळजी, खुळचट।

अखतीज—( ना० पु० ) अक्षय्य तृतीया।

अखबार—( ना० पु० ) समाचार पत्र ( हिं० ) वर्तमान पत्र, बातमी पत्र;—नवीस ( ना० पु० ) बातमी लिहिणारा, संपादक।

अखर्व—( अ० ) बड़ा लम्बा ( हिं० ) समस्त, पूर्ण, रेल चेल, मोठा।

अखाड़ा—( ना० पु० ) आंगन ( हिं० ) मल्ल-युद्ध-स्थान, तालीम।

अखाद्य—( ना० पु० ) न खाण्यासारखा पदार्थ।

अखिल—( वि० ) सब ( हिं० ) सर्व, सारा, समस्त, सम्पूर्ण।

अखेट } ( ना० स्त्री० )शिकार ( हिं० ) मृगया, पारध,
आखेट }

अख्याति—( ना० स्त्री० ) बदनामी ( हिं० ) अपयश, अप्रतिष्ठा, अपकीर्ति, दुर्लौकिक।

अगटना—( स० क्रि० ) इकट्ठा होना ( हिं० ) एकत्र होणें, जमा होणें।

अगति—( ना० पु० ) मरणानंतर ज्याला संस्कार केले नाहींत असा।

अगर—( अ० ) जर, जरी।

अगल, बगल—( क्रि० ) सर्व बाजूंनीं।

अगवा, अगुआ—( ना० पु० ) वाटदाखविणारा।

अगवानी—( ना० स्त्री० ) स्वागत।

अगवाड़ा—( ना० पु० ) घराचा पुढचा फाग।

अगहन—( ना० पु ) मार्गशीर्ष।

अगाड़ी—( ना० स्त्री० ) प्रगति, घोड्याला पुढच्या बाजूला बांधण्याची दोरी।

अगाध—( वि० ) अथाह ( हिं० ) अत्यन्त खोल, ज्याचा ठाव लागत नाहीं असा।

अगास*—( ना० पु० ) ओटा।

अगासी+—( ना० स्त्री० ) पगड़ी, दालान ( हिं० ) पगडी पड़वी, सोधा।

अगुण—( वि० ) गुणहीन।

अगेंद्र*—( ना० पु० ) सुमेरु ( हिं० ) पहाड़ांचा राजा हिमालय।

अगोरना } ( स० क्रि० ) चौकी देना ( हिं० ) पहारा
अगोटना } बसविणें, नजर ठेवणें।

अगोरा, अगोरदार—( ना० पु० ) रखवाला ( हिं० ) रखवालदार, पहारेकरी।

अगौनी—( ना० स्त्री० ) अगवानी ( हिं० ) सामोरें जाणें, स्वागत।

अगौर+—(ना० स्त्री०) पेशगी किराया ( हिं० ) अगाऊ दिलेलें भाडें।

अग्नि— } ( ना० स्त्री० ) अग्नि,
आग— }

—का पुतला, ( वि० ) फार हुपार;

—के मोल, ( क्रि० ) फार महाग,

*अग्यारी—( ना० स्त्री० ) अग्नि से धूप देना ( हिं० )

अग्र—( ना० पु० ) प्रथम, श्रेष्ट, सिरा ( हिं० ) अग्रभाग, प्रथम।

अग्रहार—( ना० पु० ) देवतांना दिलेली संपत्ति।

अघखानी—( ना० पु० ) पापी, अधर्मी, पापांचा समुदाय।

अघटित—( वि० ) असम्भव (हिं०) अयोग्य, न होणारी, —( ना० पु० ) भविष्यकाल।
अघाई—( ना० स्त्री० ) पेट भराव ( हिं० ) तृप्ति।
अघाना—( अ० क्रि० ) तृप्त होणें, संतुष्ट होणें।
अघोर—( वि० ) भयानक ( हिं० ) भयंकर।
अङ्गरी—( ना० स्त्री० ) ज़िरह ( हिं० ) कवच, चिलखत।
अङ्गवना॰—( स० क्रि० ) स्वीकार करना बरदाश्त करना (हिं०) सहन करणें।
अङ्गीठी—( ना० स्त्री० ) चूल, चुल-खंड।
अचक—( अ० ) अचानक ( हिं० ) अकस्मात्।
अचक—( वि० ) अगदीं भरलेला।
अचकरी } ( ना० स्त्री० ) धींगाधींगी, अत्याचार (हिं०)
अचगरी } धांगड़धिगा, वात्रटपणा, दुष्टपणा, खेळकरपणा।
अचतुर—( वि० ) मूर्ख, सुस्त।
अचम्भा— } ( ना० पु० ) विस्मय (हिं० ) आश्चर्य,
अचरज— } आश्चर्यकारक गोष्ट; आश्चर्यकारक, विलक्षण,—करना। आश्चर्य करणें,—मानना, एखादी गोष्ट आश्चर्य कारक आहे असें मानणें।
अचल—( वि० ) अटल (हिं०) स्थिर, धीर, हलवितां येण्या सारखा, ( ना० पु० ) पर्वत, वृक्ष, जैनांचा पहिला तीर्थंकर, वृद्ध मनुष्य।
अचला—( ना० स्त्री० ) धरती ( हिं० ) पृथ्वी।
अचवन—( ना० स्त्री० ) कुल्ला करने की क्रिया ( हिं० ) चूळ भरणें, आंचवणें।
अचानक } ( क्रि० वि० ) अकस्मात्, एकदम।
अचानचक }
अचवना—( अ० क्रि० ) ( जेवल्यानंतर ) हात धुणें-आंचवणें।
अचार—( ना० पु० ) लोणचें, आचार, व्यवहार।
अचारज॰—( ना० पु० ) आचार्य, विद्वान मनुष्य, पंडित।
अचारी॰—( ना० पु० ) सदाचारी मनुष्य, ब्राह्मण, कर्मठ मनुष्य।

अचिक्कन—( वि० ) खुरदुरा ( हिं० ) खरबरीत, न उजळलेला।
अचिंत॰—(वि०) चिंता रहित, निश्चिन्त।
अचिंता } ( ना० स्त्री० ) अविचारीपणा,
अचिंताई } निष्काळजीपणा, छूडपणा।
अचिर—( अ० ) तुरन्त ( हिं० ) शीघ्र, लवकर।
अचीता } ( वि० ) विनाविचारा आकस्मिक ( हिं० )
अनचीता } अनपेक्षित, अनिष्टा, नकोसा झालेला, अप्रिय नावडता।
अचेत—( वि० ) बेहोश ( हिं ) मूर्छित, बेशुद्ध, निश्चेष्ट।
अचेतन— } ( वि० ) जड़ बुद्धिहीन, पशुतुल्य, मूर्खपणा।
अचैतन्य— }
अचैन—( वि० ) बेचैनी ( हिं ) दुःखी, व्याकुल, चैन नसलेला।
अच्छत— } ( वि० ) धड ( क्षतनसलेला ), टिकाऊ,
अच्त— } जगणारा।
अच्छर—( ना० पु० ) अक्षर।
अच्छा—( वि० ) चङ्गा ( हिं ) उत्तम, सुंदर, झकास मनोहर; ( अ० ) होकारार्थी अव्यय। अच्छी तरह से-काळजी पूर्वक, पूर्णपणें; समाधान कारक रीतीनें, अच्छी कही—समयोचित बोलल्या बद्दल पसंती दर्शक उद्गार वाची अव्यय; अच्छे से अच्छा—सर्वांत उत्तम।
अच्छोदन—( ना० पु० ) आखेट ( हिं० ) शिकार।
अछत—( वि० ) निराधार, असहाय, राज्यभ्रष्ट।
अछताना—पछताना ( अ० क्रि० ) पश्चात्ताप करणें।
अछरा॰—( ना० स्त्री० ) अप्सरा, याचें अनेक वचन "अछरन" असें होतें।)
अछरङ्ग—( ना० पु० ) तुहमत ( हिं० ) मिथ्यारोप।
अछवानी—( ना० स्त्री० ) वानी ( हिं० ) बाळंतकाढा।
अछूता—(अ०) जूठा नहीं (हिं०) अस्पृष्ट न उष्टावलेला पवित्र, स्वच्छ।
अछेह—( अ० ) बहुत ( हिं० ) पुष्कळ, अधिक, रगडून, मुबलक।
अज॰—( अ० ) अब, अजहूं—आतांतरी।
अजगव—( ना० पु० ) शंकराचें धनुष्य।

अजगुत—( वि० ) अद्‌भुत ( हिं० ) विलक्षण, आश्चर्यकारक।

अजज़ा–( ना० पु० ) (जुज़=भाग, याचें हें अनेक वचन आहे० ) भाग, घटकद्रव्यें ( केमिस्ट्रीमध्यें ) कुणाही तील कोणते ही भाग।

अजनबी—( वि० ) परदेशचा, नवीन ( ना० पु० ) परकीय मनुष्य, परदेशचा मनुष्य।

अजब—( ना० पु० ) आश्चर्य, नवल, ( वि० ) आश्चर्य कारक।

अज़्म+—( ना० पु० ) मतलब ( हिं ) अभिप्राय, हेतू, निश्चय।

अजल—( ना० स्त्री० ) मृत्यु, विलंब नशीब-अजलरसीदा, पूर्व नियोजित,–अजल गिरफ्ता, मृत्यूच्या दाढे़त सांपडलेला।

अज़ल्लत+—( ना० स्त्री ) जुल्म ( हिं० )अन्याय, जुलूम

अजलोक—( ना० पु० ) ब्रह्मलोक, स्वर्ग, नंदनवन।

अजसी—( वि० ) निन्दित, यश रहित।

अजा—( ना० स्त्री० ) बकरी, माया असत्य।

अज़ां—( अ० ) इस कारण से ( हिं० ) म्हणून।

अज़ाइब—( ना० पु० ) आश्चर्य, आश्चर्य कारक गोष्टी किंवा वस्तु।

अजाति—( वि० ) जाति बहिष्कृत (त्याज्य।)

अजान— ( वि० ) अज्ञान ( हिं० ) मूर्ख, निर्बोध, अजाणता, अविवेकी।

अज़ाब—( ना० पु० ) पीडा ( हिं० ) दुःख शिक्षा, छळ काळजी।

अजिन—( ना० पु० ) मृगछाला ( हिं० ) हरिणाचें कातडें।

अजिर—( ना० पु० ) आंगन, चबूतरा ( हिं० ) आंगण, चौक।

अजी—( अ० ) अहो महाराज ( एकाद्याचें लक्ष वेधण्यां करितां-आश्चर्य व्यक्त करण्या करितां या शब्दाचा उपयोग करितात। कमी प्रतीच्या मनुष्याशीं किंवा अगदीं सलगीच्या मनुष्याशीं बोलतांना हा उपयोगांत आणिला जातो, परंतु थोरांशी अत्यंत आदरानें बोलतांनाही कधीं कधीं याचा प्रयोग केला जातो।

अजीज़—( वि० ) प्यारा ( हिं० ) प्रिय, बहु मूल्य।

अजीर—( ना० पु० ) गुलाम ( हिं० ) गुलाम, मजूर, मोलकरी।

अजीर्ण—( ना० पु० ) अपच बदहजमी ( हिं० ) अपचन।

अजूटा—( वि० ) न उष्टावलेला, स्पर्श न, केलेला।

अजूरा+—( ना० पु० ) मजदूरी, किराया ( हिं० ) मजूरी वेतन, भाडें पारितोषिक,–अजूरेदार, मजूर, हमाल।

अजों—( अ ) आज तक ( हिं० ) आज पर्यन्त।

अजोड—( वि० ) विजोड, तुटलेला।

अजोय—( वि० ) न नागरलेला, अन्युक तेज हीन।

अजंट—( अ० ) पूर्ण पणें तयार।

अंजना—आँजना ( अ० क्रि० ) डोळ्यांला अंजन लावणें।

अंजाम—( ना० पु० ) नतीजा ( हिंदी ) शेवट, फल, —करना, शेवटास नेणें, संपादणें।—पाना शेवटास जाणें, संपणें।

अटक— } ( ना० पु० ) रोक( हिं० ) अडवणुक,
अटकाव— } आवर, भीति, अटक-मटक ( ना० स्त्री० ) कुचेष्टा, नखरा, नखरेबाजी,–अटकना ( अ० क्रि० ) मागें रहाणें, कांकूं करणें।

अटकर— } ( ना० स्त्री० ) अन्दाज़ ( हिं० ) अनुमान
अटकल— } अन्दाज,मत,–अटकल बाज,अन्दाज करण्यांत तरबेज, अटकलपच्चू। भलताच अन्दाज करण्याचें धारिष्ट करणारा।—से, जवळ जवळ।

अटकलना—( स० क्रि० ) अन्दाज करणें, किंमत करणें ओळखणें।

अटका—( ना० पु० ) एक प्रकारचें मातीचें भांडें, श्री जगन्नाथाचा प्रसाद।

अटकाना—( स० क्रि० ) रोकना ( हिं० ) आडविणें मागें खेंचणें, थांबविणें थांबवून ठेवणें।

अटखेल—( वि० ) खिलाडी ( हिं० ) खेळकर, चंचल उनाड।

अटखेली—( ना०स्त्री० ) खिलाडीपन (हिं०) उनाड़पणा, खेळकरपणा०

अटट—( वि० ) मजबूत (हिंदीं) बळकट, ढब्बू (फोपसा)

अटना—( अ० क्रि० ) समाना ( हिं० ) भरून जाणें, मावणे, फिरणें।

अटपट—( वि० ) टेढा ( हिं ) वाकडा, उलटा।

अटपटांग—( वि० ) निर्धन, अनुचित (हिं०) गरीब, दुष्ट, गोंधळलेला,

अटपटाना—( अ० क्रि० ) रेंगाळणें, मूर्खपणानें बोलणें,

अटपट बोलना—कांही तरी भकणें।

अटपटी*—(वि० ) नटखटी शरारत ( हिं० ) गुण्डाई; अविवेक, अविचार, गैरशिस्त।

अटम्बर—( ना० पु० ) आडम्बर (हिं०) खानदान, परिवार, अवडंबर।

अटम—( ना० पु० ) ढेर, वटारा (हिं०) ढीग, रास, पुंज,

अटल—( वि० ) अचल ( हिं० ) अढळ, कट्टर।

अटवाड—खटवाट ( ना० स्त्री० ) आंथरुणाला खिळून पडलेल्या आजाऱ्याची स्थिति।

अटवि } ( ना० स्त्री० ) जंगल ( हिं० )
अटवी } वन, कानन,

अटसट—( ना० स्त्री० ) दूरदर्शीपणा; युक्ति, खुबी।

अटा } ( ना० स्त्री० ) कोठा (हिं०)
अटारी } वरचा मजला, सज्जा।

अटाटूट—( अ० ) नितान्त, बिलकुल ( हिं०) अगदीं, निखालस।

अटाना—+( स० क्रि० ) भरना ( हि० ) भरणें, जोडणें।

अटाल—( ना० पु० ) बुर्ज,। धरहरा ( हि० ) दोरखंड, सहाय।

अटाला—( ना० पु० ) ढेर ( हिं० ) ढीग सांठा। —करना, ढीग करणें, गोळ करणें,—लदना, अधिक ओझें लादणें, ओझ्याखाली दबेसा करणें।

अटिया—( ना० स्त्री० ) झोपड़ी ( हिं० ) लहान घर, झोपड़ी, पर्णकुटी।

अटूट—( वि० ) न तुटणारा, कमी न होणारा।

अटेक—( वि० ) बिना सहारा ( हिं० ) निराश्रित।

अटेरन—( बा० पु० ) सूत लपेटने की लकड़ी (हिं०) सत्र काठन ठेवण्याकरितां बन विलेलें यांक किंवा लाकूड।

अटोल—( वि० ) अनाड़ी ( हिं० ) असभ्य, जंगली।

अटोप—( ना० पु० ) प्रकृति ( हिं० ) स्वभाव।

अट्टहास—( ना० पु० ) बहुत हँसना ( हिं० ) फार हसणें, पोट धरून हसणे।

अट्टाल— } ( ना०पु०) वरची खोली।
अट्टालिका— }

अट्ठा—( ना० पु० ) अठया (इस्पिटाच्या डावांतील)।

अठखेली—( ना० स्त्री० ) "अटखेली" पहा।

अठन्नी—( ना० स्त्री० ) धेली ( हिंदीं ) अधेली, आठ आण्याचे नाणे।

अठल+—( ना० पु० ) चौक महाणे।

अठवाहा—( ना० पु० ) आठवडा, ( अ० ) सप्ताहिक।

अठसठ+—( वि० ) अडसष्ठ।

अठहत्तर—( वि० ) अठयाहत्तर।

अठाईस—( वि० ) अठ्ठावीस।

अठानवे—( वि० ) अठयाण्णव।

अठारह—( वि० ) अठरा।

अठावन—( वि० ) अठ्ठावन।

अठासी—( वि० ) अठ्याऐंशी।

अठेल*—( वि० ) दृढ़ ( हिं० ) अविचलनीय, अपरिहाय, स्थिर।

अठोठ*—( ना० पु० ) ठाट ( हिं ) थाट, अवडम्बर।

अड़—( ना० स्त्री० ) हट टेक ज़िद ( हिं ) भांडण, हट्ट।

अड़क—( ना० स्त्री० ) रुकावट नहीं ( हिं० ) अड़चण।

अडंग—( ना० पु० मंडी ( हिं० ) बाजार, हाट।

अड़ंगा—( ना० पु० ) ( वि० ) झगड़ाल, टर्रा ( हिं ) भांडखोर लचांड रुकावट अञ्चन।

अड़चन—( वि० ) बाधा ( हिं० ) अस्वस्थ, ( ना० ) संकट, अडथळा।

अड़जात—( वि० ) वाईट कुलांत जन्मलेला, दुष्ट, खट, खटनट।

अड़ठया—( ना० पु० ) दल्लाल ( हिं० ) दलाल।

अडतल—( ना० पु० ) रक्षा ( हिं ) रक्षण, आश्रय, रक्षण करणारा, आश्रयदाता—बहाना।

अड़ना—( अ० क्रि० ) रुकना ( हिं ) आडणें, थांबणें, (घोडया विषयीं बोलताना याचा उपयोग केला जातो )

अडबंगा—( वि० ) तिर्छा ( हिं० ) खरबरीत, वाकडा तिकडा, विजोड ।

अड़बड़—( ना० पु० ) अर्थशून्य बोलणें, शिव्या देणें ।

अडबन्ध+—( ना० पु० ) कटिबन्ध ( हिं० ) कौपीन ।

अडवल+—( वि० ) अडुआ ( हिं० ) आडणारा, अडेल, हट्टी ।

अडाना—( सा० क्रि० ) आडविणें, सांगडणें सांगड घालणें ।

अडानी—( ना० स्त्री० ) मोठा पंखा ।

अडियल—( वि० ) आडणारा, अडेल, सुस्त ।

अडिआना—( स० क्रि० ) रक्षण करणें ।

अडुआ—( वि० ) हट्टी, कट्टर ।

अडूसा—( ना० पु० ) खोकल्यावर उपयोगी पडणाऱ्या एका वनस्पतीचे नांव ।

अडेंच—( न० स्त्री० ) दुश्मनी ( हिं० ) वैर भाव शत्रुता, द्वेष ।

अडोल—( वि० ) अटल ( हिं० ) स्थिर ।

अड़ोस पड़ोस—( ना० पु० ) शेजार, जवळपणा ।

अड्डा—( ना० पु० ) छावनी ( हिं० ) रहाण्याचें स्थान, तळ, गोट ।

अढाई— }
ढाई— } ( वि० ) अडीच ।

अढया—( ना० पु० ) अडीच शेराचें वजन किंवा माप ।

अणी— }
अनी— } ( नां० स्त्री० ) चोंटी ( हिं० ) शेंडा शिखर, शेवट ।

अएटना—( अ० क्रि० ) भरून जाणें ।

अएटवाना—( स० क्रि० ) भरविणें ।

अएटा+—( ना० पु० ) बडी गोली ( हिं ) चेंडू, गोळी, एक प्रकारचा खेळ ।

अएटाघर—( ना० पु० ) खेळ खेळण्याची खोली ।

अएटकोडी—( ना० स्त्री० ) गुरे बांधण्याची दोरी ।

अएटाचित्त—( वि० ) झिंगलेला, मस्त, बेशुद्ध ।

अँठलाना—( स० क्रि० ) हातानें पकडणें ( अ० क्रि० ) ऐटींत चालणें ।

अएड—( ना० पु० ) अंडें, वृषण ।

अएडा—( ना० पु० ) अंडें,–देना, अंडी घालणें, –सेना, अंडीं उबविणें ।

अत:— }
अतएव— } (अ०) इसीलिए (हिं०) म्हणून, यास्तव

अतत्ताही*—( ना० पु० ) लुटेरा ( हिं० ) लुटारू, घात्या,–करना, लुटणें, अति करणें ।

अतथा+—( वि०) शक्तिहीन ( हिं० ) निर्बल, सत्ताहीन, शक्त हीन ।

अतन— }
अतनु— } ( ना० पु० ) ज्याला शरीर नाहीं अस काम देवाचे एक नांव ।

अतन्द्रित—( वि० ) चंचल, चपल निरालस्य ( हिं० ) आळस नसलेला, कर्मठ, हुषार, सावध ।

अतफ़—( न० स्त्री ) दया ( हिं० ) दया, कृपा, प्रेम सांधा, नजराणा ।

अतर,इत्र—( ना० पु० ) सुगन्धि ( हिं० ) अत्तर, सार –अतरदान, अत्तरदाणी ।

अतर्पित—( वि० ) असंतुष्ट, बेचैन, अतृप्त ।

अतल—( वि० ) विन बुडाचा, ( ना० पु० ) सात पाताळापैकीं पहिलें पाताळ ।

अतल स्पर्श—( वि० ) अथाह ( हिं ) अत्यंत खोल।

अता—( ना० पु० ) अनुग्रह ( हिं० ) अनुग्रह, दान ।

अताई—( ना० पु० ) दक्ष, कुशल, प्रवीण, धूर्त अर्ध शिक्षित, गवई ।

अतावक—( ना० पु० ) शिक्षक ।

अतालीक—( ना० पु० ) अध्यापक ।

अतालीकी—( ना० स्त्री० ) खाजगी शिकवणी ।

अति—( वि० ) अधिक, पुष्कळ, अत्यन्त मोठा, होऊन गेलेला ।

—उक्ति, फाजिल प्रशंसा ।

—काय, धिप्पाड, प्रशस्त ।

—काल, विलंब, उशीर ।

अतिथि—( ना० पु० ) मिहमान ( हिं० ) पाहुणा, परका, ( ज्याच्या येण्याची तिथि माहीत नाहीं असा )
अतिथिक्रिया—( ना० स्त्री० ) पाहुणचार ।
अतिथिपालक—( ना० पु० ) मेज़बान ( हिं० ) मालक यजमान ।
अतिरिक्त—( वि० ) अतिशय, पुष्कळ ( अ० ) शिवाय, आणखी ।
अतिरोग—( ना० पु० ) क्षयरोग ।
अतिवार—( अ० ) अक्सर ( हिं० ) वारंवार ।
अतिवास—( ना० पु० ) भूखा रहना ( हिं० ) उपोषण, उपवास ।
अतिहास—(ना० पु०) खो खो हसणें, मोठयानें हसणें।
अतीत—( अ० ) बीता हुआ ( हिं० ) भूत, मागें गेलेला, अतिक्रांत ।
अतीव—( अ० ) फार, अतिशय ।
अतीव्र— ( ना० पु० ) धड्डमनुष्य, ढ, (वि०) ढ, मूर्ख ।
अतुल—(वि०) तुलना करितां न येण्या सारखा, अनुपम ।
अत्याचार— (ना० पु०) अपराध । (हिं०) सदाचारा पासून ढळणें ।
अत्युग्र— (वि०) फार कठीण, दु:साध्य, कष्टसाध्य ।
अतेजा*— (ना० स्त्री०) क्षीणता ।
अत्ता*—, अत्तिका— (ना० स्त्री०) माता किंवा बडील बहिण यांचा प्रयोग जुन्यांहिंदी नाटकांमधून येतो।
अत्रय— (वि०) लज्जाहीन (हिं०) निर्लज्ज ।
अत्रभवान्—* (वि०) पूज्य यांचा प्रयोग जुन्या नाटकांत आढळतो ।
अथक— ( वि० ) न थकलेला, न थकतां ।
अथल—( वि० ) डाँवा डोल ( हिं० ) अस्थिर ।
अथवा—( अ ) या ( हिं० ) किंवा ।
अथा, अथाह—( वि० ) गहरा ( हिं० ) अत्यंत खोल ।
अथाई—( ना० स्त्री० ) चौपार ( हिं० ) बैठक, सभा, मित्र-मंडली जमण्याचें स्थान ।
अथित,अस्थित—( वि० ) अस्थिर ।
अथाना—( ना० पु० ) अचार ( हिं० ) लोणचें ।
अद,अ—( वि० ) अधार ( हिं० ) अर्धा ।
अदत्ता×—( ना० स्त्री० ) अविवाहित स्त्री ।
अदन—×( ना० पु० ) खाना ( हिं० ) जेवण ।
अदना—( वि० ) नीच, खालच्या दर्जाचा,क्षुद्र, गरीब ।
अदब—( ना० पु० ) चांगली रीत ।
अदमूआ—( वि० ) अधमरा ( हिं० ) अर्धमेला ।
अदरक—( ना० पु० ) हरी सोंठ ( हिं० ) आलें ।
अदरसा,अदर्सा—( ना० पु० ) एक प्रकारची मिठाई ।
अदवान,अदवायन—(ना० पु०) खाट की रस्सी, ( हिं० ) वाजल्याची दोरी ।
अदा—( ना० स्त्री० ) कामयाबी ( हिं० ) पूर्ण करणें, फत्ते, करना—भरपाई करणें—होना—संपणें, पूर्णता होणें ।
अदात—( ना० स्त्री० ) औज़ार, पैसा ( हिं० ) साधन, धंदा, पूर्वतयारी ।
अदानी—( वि० ) कंजूष, चिक्कू, चिकट, अमुक्त हस्त ।
अदिती—( ना० स्त्री० ) कश्यपांची बायको, देवमाता ।
अदिन—( ना० पु० ) कुदिन ( हिं० ) वाईट दिवस ।
अदिष्ट*—( ना० पु० ) भाग्य ( हिं० ) प्रारब्ध, संकट ।
अदोत*—( वि० ) अद्योत ( हिं० ) प्रकाशहीन ।
अद्यापि—( अ० ) अबतक ( हि० ) आज पर्यन्त, आता पर्यंत, अजून ।
अद्रक—( ना० स्त्री० ) 'अदरक' पहा ।
अध—( वि० ) आधा ( ना० पु० ) ।
अध:—( अव्यय ) खालीं ।
अधकच्चा —, अधकचरा — ( वि० ) अधपका ( हि० ) । अधकिच्चा, अपक्व ।
अर्ध कपाली—, अधकपारी— ( ना० स्त्री० ) अर्धशिषी । ( अर्धे कपाळ दुखण्याचा रोग ) ।
अधगो—( ना० स्त्री० ) गुद-द्वार, मूत्र-द्वार ।
अधङ्ग—( ना० पु० ) अर्धांग ।
अधचक्कर—( ना० पु० ) अर्धवर्तुळ,
अधपका—, अधपक्का— ( वि० ) अर्धवट—शिजलेला, अपक्व ।
अधवना—( वि० ) अर्धवट तयार झालेला, अपूर्त, अपूर्ण ।

अधवर—( अ० ) आधी दूर (हिं०) अर्ध्यांवर, मध्यावर मध्यें।

अधम—(वि०) नीच, कमी दर्जाचा निंद्य (ना० पु०) काळ्या रंगाचा घोडा, जार, उपपति, गुप्त गोष्ट— मृतक, पहारे वाला, हमाल,—कुली में (अ०) मध्यावर, ।

अधमूआ— } (वि०) 'अदमुआ' पहा।
अधमरा— }

अधमर्ण— (ना० पु०) ऋणको (विन) अर्धवट मेलेला।

अधमाई— ( ना० स्त्री० ) नीचता, अधम पणा।

अधर— ( ना० पु० ) नीचे का होट ( हिं० ) खालचा ओठ योनी (वि०) अपकृष्ट, नीच। बुद्धि; अज्ञानी, बेसावध।

अधवन—( हिं० ) अर्धा निम्मा।

अधवाड—( ना० स्त्री० ) अर्धे ठाण, कापड़ा संबंधी हा शब्द वापरतात।

अधाई—अर्धें अर्धें

अधसेरा—( ना० पु० ) अर्ध्या शेराचें वजन।

अधार—(ना० पु०) सहारा ( हिं ) आश्रया आहार, खाणा सकाळचा फराळ।

अधि—( अ० ) वर, अधिक।

अधिकरण—( ना० पु० ) पदवी, हक्क आधिपत्य, सप्तमी विभक्ति।

अधिकाई—( ना० स्त्री० ) बहुतायत ( हिं ) अधिकता, आधिक्य।

अधिकाना—( स० क्रि० ) बढ़ाना ( हिं ) वाढविणें, ।

अधिकृत—( ना० पु० ) देखवैया ( हिं ) तपासनीस, नियोजित मनुष्य, अध्यक्ष।

अधिगत—( वि० ) अवगत, ज्ञात, प्राप्त, मुक्त।

अधिप—( ना० पु० ) स्वामी ( हिं० ) राजा।

अधिपति—प्रभु, मालक।

अधिक मास—( ना० पु० ) लोंद मलमास ( हिं० ) अधिक महिना, धोंडा महिना, ।

अधिया—( ना० ) स्त्री० ( दोन सारखे भाग करणें।

अधियाना—( स० त्रि० बरोवर दोन भाग करणें।

अधियार—( ना० पु० ) पातीदार, हिस्सेदार।

अधिरथ—( ना० पु० ) सारथी ( हिं० ) हांकणारा।

अधिवास—( ना० पु० ) निवास-स्थान सुगंधी-द्रव्य अत्तर, नित्यता, शेजार।

अधिवेदन—( ना० पु० ) एक बायको असतांना दुसरें लग्न करणें।

अधिवेशन—(ना० पु०) बैठक (हिं) विचारार्थ एकत्र झालेला जमाव, सभेची बैठक।

अधिष्ठाता—( ना० पु० ) रक्षक ( हिं० ) रक्षक, पालन करणारा, अध्यक्ष, प्रधान।

अधिष्ठान—( ना० पु० ) ठांव ( हिं० ) स्थान, ठाण,।

अधीत—( वि० ) शिकलेला, म्हटलेला।

अधीन—( वि० ) वशीभूत ( हिं० ) आज्ञाधारक वश झालेला।

अधीनी— } ( ना० स्त्री० ) आज्ञा गुलामी, ।
अधीनता— } ताब्यांत असणें।

अधीर—( वि० ) व्याकुल ( हि ) धैर्यहीन, चंचल, उतावीळ, अस्थिर, अनिश्चित

अधीरज—( ना०पु० ) घबराहट ( हिं० ) घाबरेपणा गोंधळ, तिरपिट, ( वि० ) "अधीर" पहा०।

अधीरता—( ना० स्त्री० ) व्याकुलता ( हिं० ) घाबरेपणा अनिश्चय, गोंधळ।

अधीश—( ना० पु० ) स्वामी ( हिं० ) मालिक, ईश्वर, चक्रवर्ती।

अधुना—( अ० ) इस बेर ( हिं० ) आतां, या वेळेस हल्ली, सांप्रत।

अधूरा—( वि० ) अधबना ( हिं० ) अपूर्ण, अपूर्त।

अधेड—( वि० ) अधबूढा ( हिं० ) वय झालेला।

अधेन*—(ना० पु०)पढाई ( हि० )'अध्ययन' चा अपभ्रंश

अधेली—( ना० स्त्री० ) अर्धा पैसा, अधेल।

अधेला— } ( ना० स्त्री० ) अठन्नी ( हिं० ) अधेली
धेली— } आठ आण्याचें नाणें।

अधैर्य—( वि० ) अस्थिरता ( हिं० ] चंचलता, उतावळपणा।

अधो—[ ना० पु० ] नरक, अध।

अधोभुवन—( ना० पु० ) पाताल।
अध्यत्तर—( ना० पु० ) ॐ।
अध्यवसाय—( ना० पु० ) लगातार उपाय ( हिं० ) उद्यम, यत्न, आस्था।
अध्यारोप—( ना० पु० ) मिथ्या कलङ्क ( हिं० ) खोटा, आरोप, आळ।
अध्यारोहण—( ना० पु० ) वर चढणें, आरोहण।
अध्यास—( ना० पु० ) आरोप ( हिं० ) भ्रम, चूक, भूल एका वस्तूचा दुसरी वर आरोप करणें।
अध्यूढ़ा—( ना० स्त्री० ) विवाहित स्त्री।
अन्—( अ० ) निषेधार्थक अव्यय ( न, नाहीं, शिवाय, सोडून वगैरे )
अनइस*— अनैस ( सं० पु० ) अहित।
अनखाना*—(अ० क्रि० ) चिढ़ना ( हिं० ) क्रोध करना, रागावणें चिडणें।
अनगढ़—, अनगढ़ा—, अनगढ़ी— (वि०) अशिक्षित,असंस्कृत। अपूर्ण,—बात ( ना० स्त्री० ) बे शुमार किंवा मूर्खपणाचें भाषण, विचार शून्य भाषणें, बकणें।
अनगिनत—( वि० ) असंख्य।
अनगिना—( वि० ) न गणिलेला, न मोजलेला ध्यानांत लक्षांत न घेतलेला।
अनघ—( वि० ) निष्पाप पुण्यवान, पवित्र, शुद्ध।
अनचाहत—( वि० ) अनिच्छित ( हिं० ) अनिष्ट, नकोसा झालेला किंवा असलेला।
अनचित—( अ० ) अचानक ( हिं० ) एकदम अकस्मात् दैववशात्।
अनछर—( ना० पु० ) जादूचा मंत्र।
अनछील, अनछिल ( वि० ) अनाड़ी ( हिं० ) अनाड़ी, आडदांड, रानटी।
अनछेड—( वि० ) अस्पृष्ट, न चिडविलेला।
अनजना—( वि० ) न जन्म लेला।
अनजल, अन्नजल—(ना० पु०) अन्नपाणी, हवापाणी।
अनजल—( वि० ) न जळलेला।
अनजस—( ना० पु० ) बेअब्रू, अपमान, बद्नाम।

अनजान, अनजाना ( वि० ) निर्बुद्धि ( हिं० ) अज्ञानी, अपरिचित,अपरिचित अनोळखी, —में ( अ० ) अजाणतां, नकळत, चुकून।
अनजामा+, अनजमा× ( वि० ) नापीक, बरड।
अनजीवत—( वि० ) मेलेला ( रामायणांत याचा प्रयोग होतो।
अनट*—( ना० स्त्री० ) गाँठ, ऐंठ, ( हिं० ) दुराचर, तिढा, अनीति।
अनडवान*—( ना० स्त्री० ) बैल, खोंड, घुळी।
अनत—( ना० स्त्री० ) दूसरी ठौर ( हिं० ) अन्यत्र, सीमा दूसरी जणा।
अनदेखा—( वि० ) नहीं देखा हुआ। (हिं०) न पाहिलेला, गुप्त अदृष्ट, (याच प्रमाणें धातूच्या भूतकालच्या तृतीय पुरुषी एक वचनी रूपाला "अन" उपसर्ग लावितां येईल जसें अनधोया )
अनन्तर—( वि० ) जवळ, लगतचा, नंतर।
अनन्य—( वि० ) तोच, सारखा, तंतोतंत, जुळता।
अनपढ़, अनपढ़ा—( वि० ) मूर्ख, न शिकलेला, अज्ञानी।
अनपराध—( वि० ) निर्दोष ( हिं० ) निरपराधी, दोषशून्य, शुद्ध।
अनपेक्ष—( ना० स्त्री० ) निरपेक्ष, बेफिकीरपणा, उपेक्षा अव्हेर।
अनबन—( ना० स्त्री० ) बिगाड़ ( हिं० ) विरोध, फूट, कलह, बखेडा, कळ, भेंद।
अनब्याहा—( वि० ) अविवाहित।
अनबुझ, अनबूझ—(वि०) समज न पडणारी, अज्ञानी, बुद्धिहीन।
अनबेधा— ( वि० ) अनछेदा ( हिं० ) अछिद्रित।
अनबोल—( वि० ) स्तब्ध, मुका, अस्पष्ट बोलणारा।
अनभल—( ना० स्त्री० ) बुराई, ( हिं० ) वाईटपणा, खोटेपणा।
अनभिगमन—( ना० पु० ) अस्थानीं जाणें, भयंकर ठिकाणीं जाणें।

अनभिज्ञ—( वि० ) अनजान ( हिं० ) अज्ञानी, मूर्ख, निर्बोध।
अनभिप्रेत—( वि० ) अनभिमत ( हिं० ) अभिप्राया विरुद्ध।
अनभिव्यक्त—( वि० ) अस्पष्ट, अव्यक्त, अप्रकाशित।
अनभिमत—( वि० ) असम्मत ( हिं० ) अनिष्ट, मत विरुद्ध।
अनमना—( वि० ) सोची ( हिं० ) सुस्त, उदास, घाबरा, चिंताग्रस्त।
अनायास—( वि० ) बे मिहनत ( हिं० ) सहज।
अनर्गल—(वि०) बेरोक (हिं०) निरर्गल, स्वेच्छाचारी, बंडखोर।
अनर्थ—( ना० पु० ) पाप, जुलूम, मूर्खता, दुर्दैव, दोष, गुन्हा।
अनर्थ, अनर्थक—( वि० ) फुकट, निष्फल, अर्थहीन अनुचित।
अनर्थी—क्रूर, जुल्मी, निर्दय, छलकरणारा।
अनलहक—( ना० पु० ) अहम् ब्रह्मास्मि।
अनलस—( वि० ) उद्योगी।
अनवरत—( अ० ) नेहमीं, सतत, रोज।
अनशन—( ना० पु० ) उपवास, उपास।
अनसमझ, अनसमझा—( वि० ) अक्ल शून्य, मूर्ख, अजाणता, भोळा, साधा, सरळ।
अनसमझे—( अ० ) न समजतां।
अनसोचे—( अ० ) अविचारपणानें, निष्काळजीपणानें।
अनहित—( ना० पु० ) वैरी ( हिं० ) द्वेषी, शत्रु।
अनहोना—नी ( वि० ) अशक्त, असम्भव।
अनागत—( वि० ) अज्ञान, पुढें होणारा।
अनाचार—( ना० पु० ) कुचाल ( हिं० ) वाईट रीत, वाईट चाल।
अनाज—( ना० पु० ) नाज ( हिं० ) धान्य।
अनाड़ी, अनारी—( वि० ) अनाडी, अकुशल, अज्ञानी, निरक्षर।
अनातुर—( वि ) चांगली, धीर, जोमाचा, निरोगी।
अनामय—(ना० पु०) आरोग्य, रोग नसणें, अरोग (हिं०)

अनायक—( वि० ) मालक नसलेला, पुढारी रहित, अरक्षित।
अनार—( ना० पु० ) दाड़िम ( हिं० ) डाळिंब।
अनारीपन, अनाड़ीपन—( ना० पु० ) अनाड़ीपणा, खुळचटपणा, सुस्तपणा।
अनारोग्य—(ना० पु०) अस्वस्थता, रुग्णावस्था, रोगीपणा।
अनाहार—( ना० पु० ) उपवास, लंघन।
अनाहूत—( वि० ) अनिमंत्रित।
अनिद्र—( वि० ) जागृत, जागा।
झोंप नसलेला।
अनिश—( अ० ) निरंतर सतत सर्वदा।
अनी—(ना० स्त्री०) तीर, वर्ची व बाण वगैरे चें टोंक।
अनीक—( ना० पु० ) बल, सेना ( हि ) सैन्य, जमा-गर्दी।
अनीकनी—( ना० स्त्री० ) सेना, फौज,।
अनीस+—( ना० पु० ) साथीदार, मित्र।
अनीह—( वि० ) निरीह, इच्छा रहित ( हि ) आळशी निष्काळजी।
अनुकरण—( ना० पु० ) सहायक, हितकर, प्रसन्न सहकारी।
अनुग—( वि० ) पीछे चलैया ( हि ) मागून येणारा ( ना० पु० ) सेवक, नौकर।
अनुगामी—( ना० पु० ) साथी ( हिं० ) साथीदार अनुयायी।
अनुचरी—अनुचरी ( ना० स्त्री० ) दासी।
अनुचित—( वि० ) गैरवाजिब ( हि० ) अयोग्य, शोभणारें।
अनुजीवी—(वि०) आश्रित, परावलंबी, पराधीन, परतन्त्र
अनुत्तर—( वि० ) ला जबाब ( हि० ) निरुत्तर, स्तब्ध श्रेष्ठ।
अनुदय—( अ० ) पहाटें, सूर्योदयापूर्वी।
अनुद्वाह—( ना०पु० ) ब्रह्मचर्य, कुमारपण।
अनुनय—( ना० पु० ) विनय स्तव, स्तुति नम्रपणा।
अनुप—( वि० ) अनुपम, अतुल, अपूर्व।

अनुपस्थित—( वि० ) गैर हाजिर ( हिं० ) गैरहाज़िर ।
अनुपात—( ना० पु० ) साम्य, प्रमाण ।
अनुपान—( ना० पु० ) पथ्य ।
अनुबन्ध—( ना० पु० ) संबन्ध, नातें, मित्र, लेश, मुख्य अनुयायी ।
अनुभूत—( वि० ) मनाने जाणलेलें, होऊन गेलेलें, निश्चित ।
अनुमत—( वि० ) सहमत (हिं० ) सम्मत, स्वीकृत, अंगीकृत ।
अनुमोदन—( ना० पु० ) सन्तोप प्रकाश (हिं०) प्रशंसा संतोष व्यक्त करणें, आनंदाची सम्मति ।
अनुयायी—( ना० पु० ) सेवक, पाठीमागून येणारा ।
अनुयोग—( ना० पु० ) प्रश्न, जिज्ञासा विचारपूस चौकशी ।
अनुयोजक—( ना० पु० ) उपदेशक चौकशी करणारा
अनुरागना—( अ० क्र० ) स्नेह करणें, मैत्री जोडणें, प्रेम पाशांत आडकणें ।
अनुरागी—( वि० ) दोस्त (हिं०) प्रेमी मित्रत्व, राखणारा लाड करणारा ।
अनुरूप—( वि० ) समान ( हिं० ) तुल्य, सारखा ।
अनुरोध—( ना० पु० ) रुकावट, बाधा; आग्रह विनय पूर्वक केलेला हट्ट ।
अनुरोधक—( वि० ) आग्रह करणारा ।
अनुलोम—( वि० ) अनुकूल, नियमित, सहकारी ।
अनुवाक—( ना० पु० ) ग्रंथविभाग ।
अनुवाद—( ना० पु० ) भाषांतर, निंदा, वारंवार सांगणें ।
अनुवेदना—( ना० स्त्री० ) सहानुभूति, समवेदना ।
अनुशय—( ना० पु० ) पूर्वद्वेप अनुताप ( हिं० ) पश्चात्ताप, द्वेप ।
अनुशयी—( वि० ) पश्चात्तापी, बैरी।द्वेष्टा ।
अनुशासन—( ना० पु० ) आदेश ( हिं० आज्ञा ।
अनुशोक—( ना० पु० ) पश्चात्ताप, खेद, दिलगिरी, दुःख ।
अनुषंग—( ना० पु० ) मिलन ( हिं० ) एकी, करुणा, दया, संबंध, प्रणय ।

अनुष्ठान—( ना० पु० ) उपक्रम (हिं०) आरंभ सूचना, कार्य, आचरण ।
अनुसंधान—( ना० पु० ) तहकीकात ( हिं० ) चौकशी, हुडकणें, शोध ।
अनुसार—(वि०) मुआफ़िक़ (हिं०) तुल्य अनुरूप ।
अनुसारी—* ( ना० पु० ) अनुयायी । प्रमाणें ।
अनुक्षण—( अ० ) क्षणोक्षणीं, सतत ।
अनूठा—( वि० ) नया ( हिं० ) नवा, अपूर्व निराळा, क्वचित दिसणारा ।
अनूढ़ा—( वि० ) अविवाहित ।
अनूप, अनुपम, अनुपमा—( वि० ) बे नजीर ( हिं० ) उत्तम, उपमारहित, अतुल्य ।
अनृत—( वि० ) झूठ ( हिं० ) मिथ्या, खोटें, असत्य ।
अनैसी—( वि० ) अयोग्य न शोभणारी ।
अनैसे—( अ० ) कुदृष्टि से ( हिं० ) वाईट दृष्टीनें, वाईट बुद्धीनें ।
अनोखा—( वि० ) अपूर्व अद्भुत दुर्लभ, आश्चर्य कारक, विलक्षण ।
अनोना—( वि० ) नोन रहित, अलोना, ( हिं० ) आळणी, मीठ न घातलेले ।
अन्त—( ना० पु० ) निदान ( हिं० ) समाप्ति, शेवट, नाश, सीमा ।
अन्तक—( ना० पु० ) मरण, यमराज ।
अन्तकारी—( वि० ) शेवटचा, निर्णायक ।
अन्तकाल—( ना० पु० ) मरणकाल ।
अन्तःपाती—( वि० ) आंतील, समाविष्ट ।
अन्तः सलील+—( ना० पु० ) खाजगी गोष्ट, उघड न केलली गोष्ट ।
अन्ततः—( अ० ) सरते शेवटीं निकृष्टपक्षीं ।
अन्तरंग—( ना० पु० ) नातलग, प्रियमित्र—सभा, कार्यकारी मंडल ।
अन्तरा—( ना० पु० ) चरण, पदाचा अंतरा, ( वि० ) मधल, जवळचा, शिवाय ।
अन्तरातप—( ना० पु० ) अंतरिया ( हिं० ) एक दिवसा आड येणारा ताप ।

अतरायपत्या—( वि० ) सगर्भा ( हिं० ) गर्भिणी ।
अन्तराय—( ना० पु० ) रुकावट ( हिं० ) बाधा, विरोध, विघ्न, आडवणूक ।
अन्तराल—( ना० पु० ) मधली जागा ।
अन्तरिच्छ—( ना० पु० ) आकाश, गगन ।
अन्तरित—( वि० ) अन्दरूनी ( हिं० ) आंतील, आंतल्या बाजूची ।
अन्तरिया—( ना० स्त्री० ) तिजारी ( हिं० ) एक दिवसा आड येणारा ताप ।
अन्तरीप—( ना० पु० ) रास, द्वीप ( हिं० ) भुईचेंउंच टोंक, भूशलाका ।
अन्तरीय—( ना० पु० ) अंगावर घेण्याचें वस्त्र ।
अन्तरे दिन—( अ० ) एक दिवसा आड ।
अन्तर्मनस—( वि० ) रञ्जदिह ( हिं० ) उदास व्याकुल, घाबरा; दुःखी ।
अन्तर्लापिका—( ना० स्त्री० ) ज्याचें उत्तर त्यांतच सांपडणारा उखाणा ।
अन्तर्वत्नी—( ना० स्त्री० ) द्विजीवा ( हिं० ) गर्भिणी ।
अन्तर्वेद—( ना० पु० ) ब्रह्मावर्त देश ।
अन्तर्हित—( वि० ) ग़ायब ( हिं० ) लपविलेला, गहाळ झालेला ।
अन्तिक—( वि० ) जवळ, लागूनचा,
अन्तिम—( वि० ) आख़िरी ( हिं० ) शेवटचा ।
अन्तेवासी—( ना० पु० ) शिष्य, चेला, शागिर्द ।
अन्त्य—(वि०) आख़िरी (हिं०) शेवटचा, सर्वांत खालचा ।
अन्दाजन—( अ० ) अनुमान से, ( हिं० ) अंदाजानें, जवळजवळ ।
अन्देशा—( ना० पु० ) संदेह, संशय ।
अन्देशनाक—( वि० ) विचारी, ध्यानस्त, दुःखी ।
अन्देशनाकी—( ना० स्त्री० ) सोच विचार ( हिं० ) विचारीपणा, दुःख, काळजी, दिलगिरी ।
अन्देशमन्द—(वि०) विचारपूस करणारा, संशयी, दुःखी ।
अन्देशह—( ना० पु० ) ख्याल ( हिं० ) विचार, कल्पना, शंका, काळजी, त्रास, भय, संकट;—करना, कांकूं करणें, विचार करणें, भिणें ।
अन्दोह—( ना० पु० ) विचार, काळजी, दुःख, शोक ।
अन्दोहनाक—( वि० ) दुःखी, उदास, त्रस्त ।
अन्धकार—( ना० पु० ) अंधेरा ( हिं० ) अंधार ।
अन्धकूप—( ना० पु० ) कोरडी विहीर, अंधारी विहीर ।
अन्धतमस—( ना० पु० ) अन्धियारी ( हिं० ) काळाकभिन्न अन्धार ।
अन्धड़—( ना० पु० ) आंधी ( हिं० ) वादळ, वावटळ, जोराचा पाऊस ।
अन्धला—( वि० ) आंधळा
अन्धापन—( ना० पु० ) आंधळेपणा ।
अन्धा—( वि० ) आंधळा, अंधुक ( ना० पु० ). आंधळा अन्ध खर्च, उधळपट्टी, फाजिल खर्च ।
अन्धियारा, अन्धियारी—(ना० पु०) (ना० स्त्री०) अंधार; आंधळेपणा ।
अन्धिसन्धि—( ना० पु० ) छिद्र, छेद, भोंक ।
अन्धेरिया—( ना० स्त्री० ) अंधार, अंधेरी रात्र ।
अन्धेरी—(ना० स्त्री०) घोड्याच्या डोळ्याला घालण्याची झांकणी ।
अन्नी—( ना० स्त्री० ) एकन्नी ( हिं० ) एक आण्याचें नाणें ।
अनमोल—( वि० ) अमूल्य, उत्तम ।
अन्यगामी—( लि० ) व्यभिचारी ।
अन्यथा—( वि० ) प्रतिकूल, विरुद्ध ।
अन्यथाचरण—( ना० पु० ) जिद्द ( हिं० ) हट्ट, अयोग्य आचरण ।
अन्यदेशी—( वि० ) परकीय ।
अन्यमनस—( वि० ) चंचल, अधीर, अस्थिर ।
अन्याई, अन्यायी—( वि० ) बेइन्साफ़ ( हिं० ) अन्यायी जुलमी ।
अन्यान्य, अन्योन्य—( वि० ) और और ( हिं० ) परस्पराचा एकमेक ।
अन्याय—( ना० ग० ) उपद्रव, अविचार ।
अन्वय—( ना० पु० ) वंश, कुल, संतति, पदक्रम ।
अन्वयी—( ना० पु० ) मित्र, नातलग, संबंधी ।
अन्वह—( अ० ) रोजोना ( हिं० ) रोज सतत, अनुदिन

अन्वित—(वि०) संबंधित, युक्त, जुळलेला।
अन्वेषण—( ना० पु० ) पता लगाना, तहक़ीकात (हिं२) तपास, शोध।
अन्हवाना॥—( स० क्रि० ) धुवविणे, स्नान घालणें।
अन्हाना॥—(स० क्रि०) स्नान करणें, धुणें।
अपठ—( वि० ) अनपढ ( हिं० ) मूर्ख, अशिक्षित।
अपडर—( ना० पु० ) खोटी भीति, निष्कारण भीति।
अपत॥—( वि० ) पापी, अप्रतिष्ठित, पत्रहीन।
अपति—( ना० स्त्री० ) विधवा, दुर्गति दुर्दशा।
अपत्रप—( वि० ) लज्जाहीन, निर्लज्ज।
अपंथ—( ना० पु० ) कुमार्ग, मार्ग रहित।
अपक, अपक्व—( वि० ) कच्चा, न पिकलेला अप्रौढ।
अपकर्म्म—( ना० पु० ) ना मुनासिब काम ( हिं० ) अनुचित कार्य, नीच कर्म।
अपकृष्ट—( वि० ) ख़राब ( हिं० ) वाईट, कमी दर्जाचा, अवनत।
अपक्रम—( ना० पु० ) भाग, लौट ( हिं० ) पळ, माघार।
अपगत—( वि० ) गेलेला, मेलेला।
अपचय ( ना० पु० ) नुकसान, तोटा।
अपचार—( ना० पु० ) बद हज़्मी ( हिं० ) अपचन।
अपदस्थ—( वि० ) बेकार, बैठा, ( हिं० ) रिकामा बेरोज़गार।
अपदेवता—( ना० स्त्री० ) भूत, पिशाच वगैरे नीच देवता।
अपदेश—( ना० पु० ) बहाना ( हिं० ) कपट, बहाणा, सोंग, ढोंग।
अपनाना—( स० क्रि० ) आपलासा करणें, सम्बन्ध जोडणें।
अपनीत—( वि० ) अपसरित, दूरीकृत।
अपभाषा—( ना० स्त्री० ) गंवारी बोली ( हिं० ) गांवढळ भाषा।
अपमान—( ना० पु० ) बेइज़्ज़ती, बेक़दरी ( हिं० ) तिरस्कार, अनादर।
अपमृत्यु—( ना० स्त्री० ) बेमौत मरण ( हिं० ) अकालीं मरण, अपघात।
अपरग—( वि० ) व्यभिचारी, अन्यगामी, ( हिं० ) भ्रष्ट भटकलेला, व्यभिचारी।
अपरञ्च—( अ० ) और भी, फिर भी।
अपरम्पार—(वि०) अथाह ( हिं० ) अपार, अनन्त, खोल।
अपराध—( ना० पु० ) तक़सीर ( हिं० ) गुन्हा, उल्लंघन, पाप।
अपराधी—( वि० ) गुनहगार ( हिं० ) दोषी, गुन्हेगार पापी।
अपरिग्रह—( ना० पु० ) अप्रतिग्रह, अस्वीकार।
अपरिचित—( वि० ) अज्ञात, अनोळखी।
अपरिणीत—( वि० ) अविवाहित।
अपरिपाटी—( ना० स्त्री० ) कुरीत, रूढी विरुद्ध वर्तन।
अपरिमित—( वि० ) असीम, बेहद ( हिं० ) पुष्कळ, प्रमाणा बाहेरचा अमर्याद, न मोजलेला।
अपरिष्कार—( वि० ) ग़लीज़ ( हिं० ) घाण, अपवित्र, अशुद्ध, मलिन।
अपरिसर—( वि० ) तंग ( हिं० ) संकुचित दूरचा।
अपरुद्ध—( वि० ) नाराज़, दिक ( हिं० ) भासलेला, दुःखी, उदास।
अपरोक्ष—( अ० ) प्रत्यक्ष, समोर।
अपर्याप्त—स्वल्प, थोडा, न्यून।
अपलज्ज—बेहया, बेशर्म ( हिं० ) निर्लज्ज, फाजिल, आडदांड।
अपलज्जा—( ना० स्त्री० ) निर्लज्जपणा, धार्ष्ट्य।
अपलक्षण—( ना० पु० ) बदशकुन, कुलक्षण।
अपलाप—( ना० पु० ) असत्य, असत्य बोलणें, लपविणें।
अपवर्ग—( ना० पु० ) रिहाई ( हिं० ) मोक्ष, मुक्ति, सुटका।
अपवर्तन—(ना० पु०) पलटा व उलट फेर (हिं०) संक्षेप, स्थलांतर।
अपवाद—( ना० पु० ) कलङ्क ( हिं० ) निंदा, दोष।
अपवादी, अपवादिन—( ना० पु० ) नालिशी ( हिं० ) वादी, फिर्यादी।
अपवाहन—( ना० पु० ) फसवून आणणें, पळविणें एका-राज्यातून उठून दुसऱ्या राज्यांत बसविणें।

अपवित्र—( वि० ) अशुद्ध ( हिं० ) मलिन, दूषित ।
अपवित्रता—( ना० स्त्री० ) अशौच (हिं०) घाणेरडेपणा, अशुद्धपणा, अस्वच्छपणा, अपावित्र्य ।
अपशब्द—( ना० पु० ) गाली ( हिं० ) शिवी, निंदा, परभाषेंतील शब्द, अपान-वायु ।
अपशरण×—( ना० पु० ) वियोग, स्थलांतर करणें ।
अपसव्य—( ना० पु० ) शरीराची उजवी बाजू ( वि० ) विरुद्ध, समोरचा ।
अपहनन—( ना० पु० ) घात ( हिं० ) वध, हत्या ।
अपहरण—( ना० पु० ) चोरी, लूट, काढून घेणें ।
अपहर्ता, अपहा—( ना० पु० ) लुटेरा ( हिं० ) चोर, अपहारक, लुटारू ।
अपच्छ—(वि०) बग़ैर बाजू (हिं०) पंख नसलेला, अरक्षित निराश्रित ।
अपाक—( वि० ) कच्चा, अप्रौढ़, न पिकलेला ।
अपांग—( ना० पु० ) डोळ्याचा शेवटचा भाग ।
अपाटव—(ना० पु०) मूर्खपणा, अपटुता ।
अपात्र—( वि० ) नालायक, अयोग्य ( ना० पु० ) अयोग्य मनुष्य, कुपात्र ।
अपादान—( ना० पु० ) पंचमी विभक्ति, ग्रहण, स्थानांतर करणें ।
अपान—( ना० पु० ) पाद, अपान वायु ।
अपाप—( वि० ) बेगुनाह ( हिं० ) निर्दोष, निष्पाप ।
अपाय—( ना० पु० ) तबाही ( हिं० ) नाश, तोटा, अडथळा, ईजा ।
अपार—( वि० ) बेहद ( हिं० ) अनन्त अनुल्लंघ्य ।
अपावन—( वि० ) अशुद्ध, अपवित्र, अशुचि ।
अपाश्रय—( वि० ) लाचार ( हिं० ) दीन निराश्रित, अनाथ, निराधार ।
अपाहज, अपाहिज—( ना० पु० ) (वि०) लूला, लंगड़ा, आळशी ।
अपिधान—( ना० पु० ) ढकना (हिं०) झांकण, आवरण ।
अपीड़, अपीर—( वि० ) बेदद ( हिं० ) व्यथा-रहित, निर्दय, कठोर अंत:करणाचा क्रूर ।
अपीनस×—( ना० पु० ) नाकाचा एक रोग ।

अपुच्छ—( वि० ) बे-दुम ( हिं० ) शेपटी नसलेला, बिनशेपटीचा ।
अपुण्य—( वि० ) दुष्ट, वाईट कर्म ।
अपुनपो—( ना० पु० ) आपल्याला ।
अपेख—( वि० ) अदृश्य, अलक्ष, अदृष्ट ।
अपेल—( वि० ) अचल, अपरिहार्य ।
अपोशान—( ना० पु० ) आपोष्णी ।
अप्रतिष्ठा—( ना० स्त्री० ) बेइज्ज़ती ( हिं० ) अनादर, अपमान ।
अप्रतिहत—( वि० ) अकुंठित ( हिं० ) बेरोक, अपराजित
अप्रतीति—( ना० स्त्री० ) अननुभव, अविश्वास, अज्ञा
अप्रत्यय—(ना० पु०) संदेह ( हिं० ) अविश्वास ।
अप्रथा—( ना० स्त्री० ) रूढी-च्युत, गुप्तपणा, अनियमितपणा, अप्रसिद्धि ।
अफरना—( अ० क्रि० ) जेऊन संतुष्ट होणें; श्रीमंत होणे, गर्व करणें ।
अफराई—( ना० स्त्री० ) परितृप्ति, समाधान ।
अफरा—( वि० ) सुजलेला, गर्विष्ट, पेट फूलने का रोग ।
अफराना—( स० क्रि० ) एखाद्यास आग्रहानें जे[illegible] घालणें ।
अफला—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें झाड ।
अफीम—( ना० स्त्री० ) अफू ।
अफीमची—( ना० पु० ) अफूखाऊ ।
अफुल्ल—(वि०) उदास, पुष्प-रहित ।
अफेण्डा—( वि० ) मनमौजी ( हिं० ) गर्विष्ट, हट्टी ।
अब—(अ०) अभी ( हिं० ) आतां, सध्यां, तक, आतां पर्यंत;—तई, आतां पर्यन्त,—तब, बारंबार ।
अबकेशा*—( वि० ) फल रहित, (झाड़)
अबच* (वि०) न बचावलेलें ।
अब्ज—(ना० पु०) कमल, चंद्र, शंख ।
अबतर—( वि० ) ज्यादा ख़राब ( हिं० ) अधिक वाईट, उध्वस्त, उजाड़, चांड ।
अबतरी—( ना० स्त्री० ) अव्यवस्था, नाश, हलकेपणा ।
अबतें, अबसे—( अ० ) आतां पासून, यावेळे पासून, आज पासून ।

अवध्य—(वि०) अवध्य;
अवना—(ना० पु०) मुलें; लोक, (इन्न याचे अनेक वचन)
अवनी—(ना० स्त्री०) पृथ्वी, अवनी।
अवड़-धवड़+—(वि०) ओवड धोबड।
अवरक—(ना० पु०) अभ्रक।
अवरीक—(ना० पु०) मालक, पाण्याचें भांडे, मुताचें भांडे किंवा तस्त।
अवलक, अवलख—(वि०) काळा पांढरा काळाबाळा, टिपक्याटिपक्याचा, नानारंगी, कबरा।
अवलाई, अवलया—(ना० स्त्री०) कमज़ोरी (हिं०) दुबळेपणा।
अवली—(ना० स्त्री०) रांग, ओळ, अवली।
अववाव—(ना० पु०) सरकारानें लावलेला जादा कर।
अवस—(वि०) स्वैर, निराश्रित, निरुपयोगी, सत्ताहीन।
अवसन—(वि०) नङ्गा (हिं०) नागडा, वस्त्रहीन।
अवीर—(ना० पु०) बुक्का।
अवुद्धि—(वि०) अज्ञानी, निर्बुद्धि।
अवुध—(वि०) मूर्ख, अज्ञानी।
अवूझ (वि) मूर्ख, अज्ञानी।
अवूझा—(वि०) न कळलेला, अज्ञेय।
अवे—(अ) अरे।
अवेर*—(ना० स्त्री०) विलम्ब, उशीर, कुसमय।
अवोध—(ना० पु०) खुळेपणा, मूर्खपणा। अज्ञान (वि०) अज्ञानी, मूर्ख—अगम्य;—नीय, न समजण्या सारखा।
अबोल (वि०) स्तब्ध, चुप।
अब्द—(ना० पु०) वर्ष, साल, संवत्सर।
अब्बा—(ना० पु०) बाबा, बाप—जान, बाप।
अभक्त—(वि) (हिं०) भक्ति शून्य; शठ;
अभय—(वि०) निडर, बेखौफ़ (हिं०) निर्भय निडर, धैर्यवान, शूर।
अभरन+—(ना० पु०) आभूषण, अलंकार।
अभाग, अभाग्य—(ना० पु०) बद किस्मती (हिं०) विपत्ति, दुर्दशा, दुर्दैव।

अभागा—पु०
अभागी—पु०
अभागिना—स्त्री० } (वि०) बद किस्मत (हिं०) दुर्दैवी; निराश्रित; निराधार।
अभाजन—(ना० पु०) नालायक; कुपात्र।
अभिक—(ना० पु०) कामुक, लम्पट; लुच्चा।
अभिगमन—(ना० पु०) संगत; जवळजाणें, सहवास करणें।
अभिघात (ना० पु०) आघात; दांतानें चावणें।
अभिचार—(ना० पु०) अथर्व वेदांत सांगितल्या प्रमाणें जारण मारण करणें; चेटुक; हिंसा करणें।
अभिजन—(ना० पु०) खानदान (हिं) घराणें, वंश पालक।
अभिजात—(वि०) कुलीन; सुंदर।
अभिधान—(ना० पु०) नाम (हिं०) नाव।
अभिनव (वि०) नया (हिं०) नवा।
अभिभव—(ना० पु०) हार (हिं०) पराभव, पराजय।
अभिमत—(वि०) संमत, इष्ट, मनोनीत, अनुमत।
अभिमुख—(वि०) समक्ष, समोर, पुढें, संमुख।
अभिमुखता—(ना० स्त्री०) मौजूदगी (हिं) हजरी।
अभियुक्त—(वि०) मुलज़िम (हिं०) ज्याच्यावर खटला चालला आहे असा, आरोपी।
अभियोग—(ना० पु०) खटला, फ़िर्याद।
अभिराम—(वि०) प्यारा (हिंदी) सुंदर, मनोहर, रमणीय।
अभिरुचि—(ना० स्त्री०) चाह, ख्वाहिश (हिं०) इच्छा; आकांक्षा।
अभिलाष—(ना० पु०)
—भिलाषा—(ना० स्त्री०) } चाह (हिं०) इच्छा, कल, प्रवृत्ति।
अभिवादन—(ना० पु०) नमस्कार, वन्दन।
अभिशाप—(ना० पु०) शाप; आळ घेणे तळतळाट।
अभिसंताप—(ना० पु०) क्रोध, संग्राम, शाप।
अभिसर—(ना० पु०) साथी (हिं०) मित्र; स्नेही अनुयायी।
अभिसार—(ना० पु०) मिलण्याचें ठिकाण, युद्ध।
अभिसारिका—(ना० स्त्री०) संकेता प्रमाणें ठरलेल्या ठिकाणीं जाणारी स्त्री।
अभिसारी—
अभिसारिणी— } (ना० स्त्री०) 'अभिसारिका' पहा।

कौशल्य—( ना० पु० ) सुदैव, सौभाग्य ।
कौशेय—( वि० ) रेशमी ।
क्या—( स० ना० ) काय ?—जानें, कोणास ठाऊक ? असें असेल,—चीज है, त्याची काय किंमत ।
क्यारी—( ना० स्त्री० ) चौकट, जमीनीचा भाग, फुल झाडांची ओळ ।
क्यों—( अ० ) कशासाठीं, कां ? कसा ।
क्योंकि—( अ० ) कारण, कां कीं ।
क्रमुक—( ना० पु० ) कसैली ( हिं० ) सुपारी, नागरमोथा, कापसाचें बोंड ।
क्लिष्ट—( वि० ) दुःखी, त्रस्त ।
क्वाथ—( ना० पु० ) काढा ।

---

## ख

ख—( ना० पु० ) स्वर्ग, आकाश ।
खई—( ना० स्त्री० ) तक्रार, भांडण ।
खंक—(वि०) कमज़ोर (हिं०) अशक्त; दुर्बल, (ना०स्त्री०) तुफान, वावटळ ।
खंकड—( वि० ) वाळला खडखडीत, ताठ ।
खंखा—( ना० स्त्री० ) वटीक; रांड ।
खंखार—( ना० पु० ) खाकरा; बडका; थुंकी ।
खंखारना—( अ० क्रि० ) खाकरणें, थुंकणें ।
खंखाव—( ना० पु० ) घोड्याचा एक दोष ।
खंगल—, खंगैल— ( वि० ) सुळयादांताचा ।
खंगालना—( स० क्रि० ) धुणें ।
खंजन—( ना० पु० ) खंजरीट, पक्षी ।
खंजर—( ना० पु० ) कट्यार, खंजीर ।
खंजरी—( ना० स्त्री० ) एक हातानें वाजविण्याचा, बाजा; लहान तंबोरी ।
खंडर—, खंडहर— उध्वस्त गांव, पडकें घर, भग्नावशेष ।
खंडोर—( वि० ) गढूळ, दुधी ।
खंती—( ना० स्त्री० ) हातवल्हें, कुदळ ।
खंदक—( ना० पु० ) खड्डा, गार ।
खंदाना—( ना० पु० ) पाँचर, ( स० क्रि० ) खालविणें ।
खंवा—, खंभा—, खंभ— ( ना० पु० ) खांब, स्तंभ ।
खकेड़—( ना० स्त्री० ) दुःख, कष्ट, संकट ।
खकेड़ना—(अ० क्रि० ) जल्दी करणें ।
खखोड़ल—( ना० स्त्री० ) खोखल ( हिं० ) पोकळी ।
खखेरना, खखोड़ना—( अ० क्रि० ) शोधून काढणें, छिलणें, तासणें ।
खग्ग—( ना० स्त्री० ) तलवार, खड्ग ।
खचना—( स० क्रि० ) जोडणें, रेखणें, सांधणें ।
खचा—, खचित—, खचाखच— ( वि० ) जोडलेलें, दाट, खेंचाखेंच ।
खचाई—( ना० स्त्री० ) बनविणें, लावणें ।
खचीना—( ना० स्त्री० ) रेखा, लकीर ।
खज़ाना—, खज़ीना— ( ना० पु० ) कोष, खजीना ।
खजूरा—( ना० पु० ) कीट विशेष ।
खजूरिया—( ना० स्त्री० ) खजूर ।
खञ्ज—( वि० ) लँगड़ा, पांगळा ।
खट्—( वि० ) पट् सहा । ( ना० स्त्री० ) चारपाई ( हिं० ) बाजलें ।
खटकना—( अ० क्रि० ) भांडणें, झगडणें, शंका घेणें, तड़ाका देणें, अन्याय करणें ।
खटका—, खटक— ( ना० पु० ) भय, शंका, चिंता ।
खटकाना—( स० क्रि० ) चाहूल देणें ।
खटखटाना—( स० क्रि० ) ठोठावणें ।
खटगीर—( ना० पु० ) खटमल ( हिं० ) ढेंकूण ।
खटछप्पर—( ना० पु० ) मसहरी (हिं०) छप्पर पलंग ।

खटना—(अ० क्रि०) टिकणें।
खटपट—( ना० स्त्री० ) तंटा, भांडण।
खटबुना—( ना० पु० ) बाजलें विणणारा।
खटमल—( ना० पु० ) "खटगीर" पहा।
खटमीठा—( वि० ) मधुर, आंबट-गोड।
खटला—( ना० पु० ) परिवार।
खटवा—( ना० स्त्री० ) खाट, पलंग, बाजलें।
खटवारा—( ना० पु० ) उकिरडा।
खटाई—( ना० स्त्री० ) आंबटपणा।
खटाका—( ना० पु० ) धडाका, खट्का।
खटाव—( ना० पु० ) नाव बांधण्याचा खुण्टा।
खटास—( ना० स्त्री० ) "खटाई" पहा।
( ना० पु० ) केसाळ मांजर।
खटियाना+—( स० क्रि० ) विश्वास ठेवणें, सलोख्यानें रहाणें।
खटोला—( ना० पु० ) लहान बाजलें, पाळणा।
खट्टू—( ना० पु० ) मज़दूर ( हिं० ) मजूर।
खड़—( ना० पु० ) गवत।
खड़क+—( ना० पु० ) गोशाळा, गोठा।
खड़खड़िया—( ना० स्त्री० ) पालखी, डोली।
खड़ा—(वि०) उभा; तयार, ताठ;—खेत ( ना० पु० ) उभें पीक, खड़े खड़े ( अ० ) उभाउभी, आतांच।
खड़ाऊ— } ( ना० पु० ) खडावा, पादुका।
खड़ांव— }
खड़ुआ—( ना० वा० ) वाळा, कडें।
खड़ेंच—( ना० स्त्री० ) ओरखड़ा, चीर, चुरस,—निकालना, दोष काढणें, सूड़ घेणें, ओरखाड़ा घेणें।
खढ़—(ना० स्त्री०) खर ( हिं० ) वाळलेलें गवत।
ख़त—( ना० पु० ) लेख, पत्र, ओळ,—किताबत ( ना० स्त्री० ) पत्र-व्यवहार, —शिकस्त ( ना० पु० ) धावताहात।
ख़तम—(ना० पु०) अन्त, शेवट।
खतर+—( ना० पु० ) भय, संकट, आपत्ति, खतरनाक; धोक्याचा।
ख़तरा—( ना० पु० ) भय, धोका, संकट।
खतरानी—( ना० स्त्री० ) क्षत्रियाणी।
खतवारा—( ना० पु० ) उकिरडा।
ख़ता—( ना० स्त्री० ) भूल, गलती।
खतान—( ना० स्त्री० ) खाते वही।
खतियाना—( ना० पु० ) हिशेबाची वही; ( स० क्रि० ) खात्यावर चढविणें।
खतौनी—( ना० स्त्री० ) खतावणी।
खत्ता—( ना० पु० ) धान्यागार, पेव।
खदबदाना—( स० क्रि० ) उकळविणें।
खदाना—( ना० पु० ) खाण, खाच।
खदेड़—( ना० स्त्री० ) पीछा ( हिं० ) पाठलाग।
खदेड़ना—( स० क्रि० ) पीछा करना ( हिं० ) पाठलाग करणें।
खन—( ना० पु० ) क्षण, कहाणी, गार।
खनना—( स० क्रि० ) खणणें, खोदणें।
खपटा—( ना० पु०) खापरी, विटेचा तुकडा।
खपत— } ( ना० स्त्री० ) विक्री; खर्च: अवकाश।
खपती— }
खपाना—( अ० क्रि० ) खपणें; उपयोगाला येणें, विकणें।
खपरा—( ना० पु० ) कौल, तुकडा।
खपरी—( ना० स्त्री० ) लहान कौल।
खपरैल—( ना० स्त्री० ) शाखारणी।
खपाना—( स० क्रि० ) उपयोगांत आणणें; खचणें, नाश करणें, विकविणें।
खपुआ—( वि० ) डरपोक ( हिं० ) भित्रा।
खुपुर—( ना० पु० ) खुपारीचें झाड़।
खप्पर—( ना० पु० ) खोपड़ी ( हिं० ) डोक्याची कवटी।
ख़फ़गी—( ना० स्त्री० ) क्रोध, नाखुषी।
ख़फ़ा—( वि० ) क्रुद्ध, रागावलेला।
ख़फ़ीफ़—( वि० ) थोड़ा, लहान,—अदालत ख़फ़ीफ़ा ( ना० स्त्री० ) किरकोळ खटलें चालविण्याची कचेरी।
ख़बर—( ना० स्त्री० ) समाचार, बातमी खबरदार (वि०) व्यवस्थित—खबरगीर ( ना० पु० ) बातमी देणारा, हेर, पालक,—गीरी ( ना० स्त्री० ) काळजी, पुष्टी, सूचना करणें।

खवसा—( ना० पु० ) गाळ, रेवड ।
खबीस—(ना० पु०) कंजूप, कृपण, खविस, एक पिशाच ।
खब्बा—( वि० ) डावा, डाव्या हातानें काम करणारा ।
खभ—( ना० पु० ) ताल, दंड ।
खम—( ना० पु० ) खांब ।
खमस—( वि० ) उष्ण, उकाडयाचा ।
खमसाई—( ना० स्त्री० ) उकाडा ।
खमीर—( ना० पु० ) ताडी, आंवचण, शाड्र ।
खमीलन—( ना० पु० ) थकवा, पेंग ।
ख़याल—( ना० पु० ) विचार, कल्पना, कल्पकता, मत, दूरदृष्टी, दिव्य दृष्टी, से बाहर ( वि० ) कल्पनातीत ।
ख़यालात—( ना० पु० ) कल्पना, विचार, ( "खयाल" चें अनेक वचन )
ख़याली—( वि० ) आदर्शभूत, काल्पनिक ।
खर—( ना० पु० ) गधा, खचर, बगला, कौआ ( ना० स्त्री० ) "खड़" पहा, ( वि० ) गर्विष्ठ, चिडखोर ।
ख़रख़शा—( ना० पु० ) भांडण, झगडा, दंगा ।
ख़रगोश—( ना० पु० ) खरहा ( हिं० ) शसा ।
खरचना—( स० क्रि० ) खर्चणें ।
खरछरा—( वि० ) खड़बीहड़ (हिं०) खर बरीत ।
खरतल—(वि०) खरा, स्पष्टवक्ता, शुद्ध अंतःकरणाचा ।
खरव—( वि० ) खर्व, संख्या विशेप ।
खरबूजा—( ना० पु० ) खरबूज ।
खरल—( ना० पु० ) खल, ( औपधें कुटण्याचा खल )
खरसा—( ना० पु० ) उन्हाळा, कोरडी हवा ।
खरसैल—( वि० ) खवड्या, खवडेल ।
खरह—( ना० स्त्री० ) गवत ।
खरहरा—(ना० पु०) खरारा,—करना, खरारा करणें ।
खरहा—( ना० पु० ) ससा ।
खरहारना—( स० क्रि० ) झाडणें, लोटणें ।
खरही—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें गवत ।
खराई—( ना० स्त्री० ) सत्यता; सचाई ।
खरादना—(स० क्रि०) चरक्यावर लावणें, जिल्हई देणें ।



खराब—( वि० ) वाईट, गरीब, नष्ट, विघडलेला ।
खराबा—( ना० स्त्री० ) बरबादी ( हिं० ) नाश, उध्वस्तता ।
खराहन्द—( ना० स्त्री० ) जळके गवत ।
खरी—( ना० स्त्री० ) पेंड, खड्ड; शाड्र सच्ची ।
ख़रीता—( ना० पु० ) थैली; पैशाची पिशवी, खिसा ।
ख़रीद—(ना० स्त्री०) क्रय—का मोल, मूळची किंमत ।
ख़रीदना—( स० क्रि० ) विकत घेणें ।
खरैरा—( ना० पु० ) "खरहरा" पहा ।
खरोंचना—
खरोंटना—
खरोटना— ( स० क्रि० ) ओरखडणें, ओरबडणें, खुरचटणें ।
ख़र्चना—( स० क्रि० ) "खरचना" पहा ।
ख़र्चा—( ना० पु० ) व्यय; खर्च, दांत कोरणें ।
ख़र्चीला—( वि० ) उधळया; खर्चिक ।
खर्व—( ना० पु० ) "खरब" पहा ।
खर्रा—( ना० पु० ) मसविदा ( हिं० ) मसूदा ।
खर्राच-
खर्चू — (वि०) खर्चीला ।
खर्राटा—( ना० पु० ) घोरणें ।
खलंगा—( ना० पु० ) बाग; उपवन ।
खलड़ा, खलड़ी—( ना० पु० ) चामडें; कातडें, साल ।
खलाड़ी—( ना० स्त्री० ) मीठ तयार करण्याची जागा ।
खलार—( ना० स्त्री० ) नीचान ( हिं० ) सखल जमीन; तळ ।
खलास—( ना० पु० ) सुटका; मुक्तता ।
खलासी—( ना० स्त्री० ) रिहाई ( हिं० ) सुटका । ( ना० पु० ) कुली, मजूर ।
खलारू—( ना० पु० ) "खलार" पहा ।
खलियान, खलिहान—( ना० पु० ) खळें; कोठार ।
खलियाना—(स० क्रि०) तासणें; मोकळें करणें, सोलणें । कातडें काढणें ।
खलिश, खलेश—( ना० पु० ) एक जातीचा मासा; ( ना० स्त्री० ) दर्द, टोंचणीं; दुःख; संशय ।

खलीता—( ना० पु० ) हातांत धरण्याची लहान पेटी; थैली; झोळी ।

खलीफ़ा—( ना० पु०) अध्यक्ष, अधिकारी; मुसलमानांचा राजवंश ।

खलेल—( ना० पु० ) सुवासिक तेल; लहान मुलांचा खेळांतील खड्डा ।

खल्ला—( ना० पु० ) जातें, खल, चामड्याची मशक ।

खल्ला—( ना० पु० ) जुना जोड़ा ।

खल्लिट—( वि० ) टकल्यां, खल्वाट ।

खवा—( ना० पु० ) स्कन्ध; खांदा ।

खवाना+*—( स० क्रि० ) चारणें, खावविणें ।

ख़श—( ना० पु० ) सुगंधित तेल ।

खसकान्त—( ना० स्त्री० ) प्रयाण, पलायन ।

खसकना—( अ० क्रि० ) हटणें; पडणें; स्थलांतर करणें ।

खसकाना—( स० क्रि० ) हटविणें; बाजूला सारणें; मागें खेंचणें; पुढें रेटणें ।

खसखसा—( ना० पु० ) जिसके कण दबाने से बालू की तरह अलग अलग हो जायँ ।

खसखसाना—( अ० क्रि० ) दांत खाणें ।

खसना—( अ० क्रि० ) खाली येणें; घसरणें, गळणें; जुनें होणें ।

खसाना—( अ० क्रि० ) ढिले करणें; मागें खेंचणें ।

खसीस—( वि० ) कंजूस; कृपण ।

खसोटना—( स० क्रि० ) हिसकावून घेणें; खुडणें; फाडणें ओठणें ।

खसोटी—( ना० स्त्री० ) शिवी, शिवीगाळ ।

ख़स्ता—( वि० ) घायाळ, जखमी, भुरभुरा ।

खस्फटिक—( ना० पु० ) स्फटिक ।

ख़ाँ—( ना० पु० ) पठाण, सरदार ।

ख़ाँखर—( ना० पु० ) सुका पदार्थ, खांच ।

खाँग—( ना० पु० ) सुळादांत, अणकाचीदार वस्तु ।

खाँचा—( ना० पु० ) टोकड़ा ( हिं० ) बुट्टीपाटी, टोकरी ।

खाँची—( ना० स्त्री० ) लहान बुट्टी ।

खाँड—( ना० स्त्री० ) साखर, खडी साखर ।

खाँड़ा—( ना० पु० ) दुधारी तलवार ।

खसना—( अ० क्रि० ) खोकणें, खाकरणें ।

खाँसी—( ना० स्त्री० ) खोकला ।

खाई—( ना० स्त्री० ) किल्ल्याची किंवा नगरच्या भोवतीचा खंदक, खड्डा ।

खाऊ—( वि० ) खादाड, पोटार्थी, आळशी, खाऊ, उडाऊ ( ना० पु० ) उधळ्या ।

ख़ाक—( ना० स्त्री० ) माती, धूळ, राख ।

खाका—( ना० पु० ) रूपरेखा, मसूदा,—उतारना=मागलावणें ।

खाजा—( ना० पु० ) एक प्रकारची मिठाई ।

खाजी—( ना० स्त्री० ) अन्न, साधें अन्न ।

खाट—( ना० स्त्री० ) बाजलें, पलंग ।

ख़ात—( ना० स्त्री० ) शेण, खात, खळगा, पेव ।

खाता—(ना० पु०) हिशोबाची वही; देणें घेणें, रोजखर्डा ।

ख़ातिर—( ना० स्त्री० ) आदर; कृपा; सन्मान—जमा (ना० स्त्री० ) समाधान, खात्री, हमी ।

खादक—( ना० पु० ) खवैया ( हिं० ) खादाड ।

खादर—( ना० स्त्री० ) भाताच्या गाद्या, मळीची जमीन ।

खादिम—( ना० पु० ) नोकर, चाकर ।

खादिमा—( ना० स्त्री० ) मोलकरीण ।

खादी—( ना० स्त्री० ) वस्त्र विशेष, खादी, ( हात सुताचें हातमागावर विणलेलें कापड )

खान—( ना० स्त्री० ) खाण, विपुलता ।

खानखर—( ना० पु० ) खळगा, गार, गर्त ।

खानगी—( वि० ) घराऊ ( हिं० ) घरगोती, खाजगी, —रखेली ( ना० स्त्री० ) रखाऊ ।

खाना—( स० क्रि० ) भोजन करणें; खाणें;—खातापीता ( वि० ) खाऊन पिवून सुखी, ( ना० पु० ) भोजन, रहाण्याचें ठिकाण, खण,—सुमारी ( ना० स्त्री० ) खाने सुमारी ।

खानि—
खानी— } ( ना० स्त्री० ) "खान" पहा ।

ख़ान्दान—( ना० पु० ) वंश, कुल ।

ख़ान्दानी—( वि० ) कुलीन, कुला संबंधी ।

ख़ान्हारा—( ना० पु० ) खादाड मनुष्य, खाणारा ।
खाप—( ना० पु० ) जात; पक्ष; पंथ, म्यान ।
खाबड़—( वि० ) उँच सखल; एकापातळींत किंवा एकसारखें नसलेलें ।
ख़ामोशी—( ना० स्त्री० ) स्तब्धता, शांतता ।
खार—( ना० पु० ) क्षार; लोणा ।
खारा—( वि० ) खारट ।
खारिज—(वि०) काढून टाकलेला, फेटाळलेला, बहिष्कृत ।
खारुवा—( ना० पु० ) खारवें ।
खाल—( ना० स्त्री० ) कातडें, चर्म ।
खालसा—( वि० ) पवित्र; शुद्ध, ( ना० पु० ) शिखांची एक जात ।
खाला—( ना० स्त्री० ) मावशी ।
खालिस—( वि० ) शुद्ध, पवित्र, मुळचें ।
खालिसा—( ना० पु० ) सरकारच्या ताब्यांतील प्रांत ।
खाली—( वि० )रिता; रिक्त, शून्य ।
खालू—( ना० पु० ) मावसा ।
खाविन्द—( ना० पु० ) पति; स्वामी ।
खास—( ना० स्त्री० ) ओझें; पुडकें ।
ख़ास—( वि० ) विशेष; खाजगी; मुख्य; खासकर ( अ० ) विशेषतः ।
खासा—( वि० ) उदार; चांगला; सुरेख ।
ख़ासियत—( ना० स्त्री० ) गुण विशेष; वैशिष्ट्य; वडिलोपार्जित मिळकत ।
खिचड़ी—( ना० स्त्री० ) खिचडी ।
खिंचना—( स० क्रि० ) ओढणें; ताणणें ।
खिंचाना—( स० क्रि० ) ताणविणें ।
खिंचावट } ( ना० स्त्री० ) ताण; ओढ ।
खिंचाव
खिजलाना—( अ० क्रि० ) चिडणें; खिजणें ।
खिजाना—( स० क्रि० ) खिजविणें; चिढविणें ।
खिड़ना—( अ० क्रि० ) पसरणें; विखरणें ।
खिड़ाना—( स० क्रि० ) विखरविणें ।
ख़िताब—( ना० पु० ) पदवी, मानपत्र ।

ख़िदमत—( ना० स्त्री० ) सेवा; कर्तव्य;-गार (ना० पु०) सेवक;—गुज़ारी ( ना० स्त्री० ) सेवा ।
खिन—( ना० पु० ) क्षण ।
खियानत—( ना० स्त्री० ) दगा; विश्वासघात ।
खियाना—( अ० क्रि० ) खरचटणें ।
खिलखिलाना—( अ० क्रि० ) पोट धरून हंसणें; थट्टा करणें; खोखो हंसणें ।
खिल जाना—( अ० क्रि० ) प्रफुल्लित होणें; विकसित होणें; आनंदित होणें ।
खिलना—( अ० क्रि० ) फुलणें; कळी येणें; आनंदित होणें ।
खिलवाड़—( ना० पु० ) खेळ; मौज ।
खिलवाड़ी—( वि० ) खेळाडू; खेळकर ।
खिलाऊ—( वि० ) खावयास घालणारा; आश्रय देणारा; अपव्ययी ।
खिलाड़ } ( वि० ) "खिलवाड़ी" पहा ।
खिलाड़ी
खिलाना—( स० क्रि० ) जेवविणें; ( शपथ ) घेवविणें; चारणें; सोसविणें ।
खिलाफ़—( वि० ) प्रतिकूल, विरुद्ध,—बयानी ( ना० स्त्री० ) वचन विरोध ।
खिलाल—( ना० पु० ) पराजय, मात, दांत कोरणें ।
खिलौड़—( वि० ) "खिलवाड़ी" पहा ।
खिलौना—( ना० पु० ) खेळणें, खेळ ।
खिल्ली—( ना० स्त्री० ) हँसी ( हिं० ) हंशा, विनोद, थट्टा,—बाज ( वि० ) थट्टेखोर, विनोदी ।
खिल्लू—( वि० ) "खिलवाड़ी" पहा ।
खिसक जाना } ( अ० क्रि० ) निसटणें, चोरून जाणें, हलणें ।
खिसकना
खिसकाना—( स० क्रि० ) हटविणें, हलविणें ।
खिसना—( अ० क्रि० ) नम्र होणें, नमणं, झुकणें, शरण येणें ।
खिसलना—( अ० क्रि० ) सरकणें, फिसकटणें, पडणें, मागें पडणें ।
खिसलहा—(वि०) गुळगुळीत, घसरगुंडीचा, निसरडा ।

खिसलाव—( ना० पु० ) } निसरडें, क्रोध, कोप।
खिसलाहट—( ना० स्त्री० ) }
खिसाना } ( अ० क्रि० ) अप्रसन्न होणें, कच खाणें,
खिसाय रहना } मागें घेणें, लाजणें।
खिसारी—( ना० स्त्री० ) एक प्रकारची डाळ।
खिसियाना—( वि० ) रागिट, चिडखोर, लाजाळू।
खिसियानी—( ना० स्त्री० ) लाज, लज्जा।
खिसियानपन ( ना० पु० ) } चिडखोरपणा, रागिटपणा।
खिसियाहट ( ना० स्त्री० ) }
खींच—( ना० पु० ) हट्ट, विरोध भाव, प्रातिकूल्य, प्रतिकूलता।
खीज—( ना० स्त्री० ) गुस्सा ( हिं० ) क्रोध।
खीजना—( अ० क्रि० ) त्रासणें, रागावणें।
खीझ—( ना० स्त्री० ) "खीज" पहा।
खीन—( वि० ) दुर्बल; क्षीण; दुबळा।
खीर—( ना० स्त्री० ) खीर; पायस;—चटाई (ना० स्त्री०) उष्टावण; लहान मुलास अन्न खालण्याचा पहिला दिवस।
खीरा—( ना० पु० ) काकडी, वाळूक।
खीरी—( ना० स्त्री० ) कास; पिस्ता।
खील—( ना० स्त्री० ) अक्षत; तांदुळाची कणी, उटी।
खीली—( ना० स्त्री० ) पान की बीड़ी ( हिं० ) विड़ी।
खीस—( ना० स्त्री० ) दाँत विचकणें; मानभावी हँसणें; तोटा।
खीसना—( उ० क्रि० ) दाँत विचकणें; दाँत खाणें; रागावणें।
खीसा—( ना० पु० ) थैली; खिसा; पत्र।
खीह—( ना० स्त्री० ) उपधातु; क्षार।
खुख—( वि० ) मोकळा; रिता; गरीब;—मुख (ना० पु०) एक प्रकारचा खेळ।
खुजलाना—( अ० क्रि० ) खाजविणें; ओरखडणें।
खुजलाहट—(ना० स्त्री०) खाज।
खुजली—( ना० स्त्री० ) खरूज।
खुजाना—( अ० क्रि० ) "खुजलाना" पहा।
सिर—डोकें खाजविणें; शिक्षा ओढून घेणें।

खुझराहा—( वि० ) हाताचा जड; कृपण।
खुटकना—( स० क्रि० ) शंका घेणें; चोंच मारणें।
खुटाई—( ना० स्त्री० ) दुष्टपणा; वांडपणा; दोष; फसवणूक।
खुट्टी—( ना० स्त्री० ) खजीना; सांठा; पूँजी।
खुड़ला—( वि० ) भद्दा ( हिं० ) खरबरीत; बोजड; ( ना० पु० ) कोंबडीचें घर किंवा घरटें।
खुड़्डी—( ना० स्त्री० ) पायखान्याचे दगड; दांतामधील फट।
खुएडला—( ना० पु० ) झाडांतील पोकळी।
खुन्ती—( ना० स्त्री० ) थैली; पैसा ठेवण्याची कोथळी।
खुन्दलना—( स० क्रि० ) तुडविणें; चेचणें।
खुद—( वि० ) स्वयं; स्वतः; वैयक्तिक; खाजगी;—बखुद ( अ० ) स्वतः; आपोआप, आपणहून; स्वाभाविक रीत्या;—ग़र्ज ( वि० ) आप्पलपोट्या; स्वार्थी;—गर्जी ( ना० स्त्री ) स्वार्थ; आप्पलपोटेपणा।
खुदनी—( ना० स्त्री० ) खोदणी।
खुदरा—( वि० ) लहान; फुटकर।
खुदवाना, खुदाना—(स० क्रि०) खोदविणें; उकरविणें।
खुदा—( ना० पु० ) ईश्वर; देव, खुदापरस्त ( वि० धार्मिक; ईश्वरपूजक।
खुदाताला—( ना० पु० ) परमेश्वर।
खुदावन्द—( ना० पु० ) मालक; ईश्वर।
खुदी—(ना० स्त्री०) अहंभाव, अभिमान; घमंड शेखी।
खुधा—( ना० स्त्री० ) क्षुधा; भूक।
खुनकी—( ना० स्त्री० ) थंडी; सर्दी।
खुनस, खुनुस—( ना० पु० ) क्रोध; कोप; लाग।
खुनसाना—( अ० क्रि० ) रागावणें; दंश करणें।
खुनसी—( वि० ) रागावलेला; रागीट।
खुबना—( स० क्रि० ) प्रभाव पाडणें, भेदणें; विंधणें।
खुभी—( ना० स्त्री० ) कर्णालंकार; लवंगा।
खुमार—( ना० पु० ) } मद; निशा; रात्रभर जागरण
खुमारी—( ना० स्त्री० ) } झाल्याचा थकवा; थकवा।
खुर—( ना० पु० ) } खूर; गाई बैल वगैरेंचें नख।
खुरी—(ना० स्त्री०) }

खुर–( ना० स्त्री० ) खाँसी ( हिं० ) खोकला ।

खुरचन–( ना० स्त्री० ) दुधाच्या कढईची खरवड काढून त्याची बनविलेली एक प्रकारची मिठाई ।

खुरचना—( स० क्रि० ) छीलना ( हिं० ) खरवडणें, खोडून, काढणें ।

खुरचनी—( ना० स्त्री० ) खुरपें ।

खुरजी—( ना० स्त्री० ) थैला, पडशी ।

खुरदरा—( वि० ) ओबड-धोबड, असमान, असंस्कृत, झिपरा ।

खुरण्ड—( ना० पु० ) खपली, पापुद्रा ।

खुरपा—( ना० पु० ) खुरपें ।

खुरपी—( ना० स्त्री० ) "खुरपा" पहा ।

खुरमा—( ना० पु० ) एक प्रकारची मिठाई ।

खुराक—( ना० स्त्री० ) रोजचा खाण्याचा रतीब, आहार, औषधाची एकवेळची मात्रा, खाणें पिणें ।

खुराफ़ात—( ना० स्त्री० ) व्यर्थ बडबड ।

खुरिया—( ना० स्त्री० ) जानुफलक, गुडघ्याची वाटी ।

खुरेदना—( स० क्रि० ) पाठलाग करणें, पकडणें, सतविणें ।

खुर्द—( वि० ) लहान, छोटा ।

खुर्राट—(वि०) फारजुना, जीर्ण, अनुभवी, कावेबाज, धूर्त ।

खुलखेलना—( अ० क्रि० ) उघडपणें, व्यसनांत रमणें, एकादें कृत्य उघडपणें करणें ।

खुलजाना—( अ० क्रि० ) उघडें होणें ।

खुलना—( अ० क्रि० ) प्रकट होणें, स्वतंत्र होणें, विखरणें, उघडे पडणें, व्यक्त होणें ।

खुलवाना—( स० क्रि० ) खुले करविणें, मुक्त करविणें ।

खुला—( वि० ) प्रकट, निरभ्र, मोकळा, व्यक्त, मुक्त, स्वतंत्र, खुले खजाना, खुले मैदान, खुले खुले, खुल्लम खुल्ला, ( अ० ) उघड-उघड; सार्वजनिकरीत्या; दिवसा ढवळ्या ।

खुलाना—( स० क्रि० ) उघडविणें ।

खुलासा—( ना० पु० ) संक्षेप, सार रूपरेखा; सारांश; नकाशा ।

खुलेबन्द—( अ० ) उघडपणें ।

खुश—( वि० ) प्रसन्न, आनन्दी, सुखी; राजी । —नसीब ( वि० ) सुदैवी ।—नवीस(ना० पु०) उत्तम लेखक । —बयान या तकरीर (वि०) वक्ता, बोलका, वाक्पति ।

खुशबू—( ना० स्त्री० ) सुवास, सुगंधदार ( वि० ) सुवासिक, सुगंधित ।

खुशामद—( ना० स्त्री० ) तोंडपुजेपणा, स्तुतिवाद ।

खुशामदी—( वि० ) मिथ्या स्तुतिकरणारा ।

खुशी—( ना० स्त्री० ) हर्ष; सुख; आनन्द; खुशी या खुशी से ( अ० ) आनंदानें; संतोषानें; स्वेच्छेनें ।

खुश्क—(वि०) वाळलेला; कोमेजलेला—साली (ना०स्त्री०) दुष्काळ ।

खुश्की—( अ० ) जमिनीच्या मार्गानें ।

खुसर फुसर—( ना० स्त्री० ) कानाकानी ( हिं० ) कानगोष्टी ।

खूँट—( ना० पु० ) कोन, कोपरा, दिशा, भाग; कानांतील मळ ।

खूँटला—( ना० पु० ) औषध विशेष ।

खूखी, खोखी—( ना० स्त्री० ) लहान मुलगी ।

खूटना—( स० क्रि० ) तोडणें, खुडणें संपणें ।

खूठी, खूथी—( ना० स्त्री० ) पापुद्रा, खपली ।

खूड़—( ना० पु० ) खोबण; नळकांडी ।

खूद—( ना० स्त्री० ) "कूड़ा" पहा ।

खुद्राना, खुदराना—( अ० क्रि० ) दुडक्या चालीवर चालणें ।

खून—( ना० पु० ) रक्त; वध—खराबा (ना० पु०) रक्तपात ।

खूब—( वि० ) अच्छा; प्रिय; सुखदायक,—सूरत (वि०) सुन्दर; सुरेख;—सूरती ( ना० स्त्री० ) सौंदर्य ।

खूबी—( ना० स्त्री० ) चांगलेपणा; सुन्दरता ।

खूमना—( अ० क्रि० ) जुनें होणें; जीर्ण होणें ।

खूसट—( ना० पु० ) म्हातारा; गलित अंगें झालेला ।

खेंटना—( स० क्रि० ) परतविणें; उलटविणें; लवंडणें ।

खेकसा—( ना० पु० ) अंगावर उठलेला; करकोचा; एक प्रकारची भाजी ।
खेचर—( ना० पु० ) आकाशांत रहणारा पक्षी; तारा ।
खेटक—( ना० पु० ) शिकार; मृगया ( ना० स्त्री० ) अस्त्रविशेष; ढाल ।
खेटकी, खेटिक—(ना० पु० ) शिकारी व्याध ।
खेड़ा—( ना० पु० ) पुरवा ( हि० ) खेडें, ग्राम; लहान-खेडें ।
खेड़ी—( ना० स्त्री० ) लोह-विशेष ।
खेत—( ना० पु० ) क्षेत्र; मैदान; पीक ।
खेतीहर—( ना० पु० ) किसान ( हि० ) शेतकरी ।
खेती—( ना० स्त्री० ) काश्तकारी ( हि० ) शेती; पीक; —बारी ( ना० स्त्री० ) शेतीवाडी ।
खेद—( ना० पु० ) रंज ( हि० ) दुःख; त्रास ।
खेदना—( स० क्रि० ) हाकालणें; पाठलाग करणें; त्रास-देणें; च्या मागें लागणें ।
खेदा—( ना० पु० ) हत्ती पकडण्याचें स्थान; शिकार ।
खेना—( स० क्रि० ) वल्हविणें; सोसणें; कंठणें ।
खेप—( ना० स्त्री० ) खेप; एक बोझा ।
खेपना—( स० क्रि० ) वेळ गमाविणें ।
खेपा—( वि० ) उन्मत्त; पागल; वडबड्या; मूर्ख ।
खेपिया—( ना० पु० ) सफरी; समुद्रांत सफर करणारा ।
खेम—( वि० ) क्षेम ।
खेमा—( ना० पु० ) तम्बू ; डेरा ।
खेमागाह—( ना० स्त्री० ) तळ; छावणी; मुक्काम ।
खेरा—( ना० पु० ) "खेड़ा" पहा ।
खेलना—( अ० क्रि० ) खेळणें ।
खेवक, खेवट—( ना० पु० ) अंबी; नावाडी, नाविक ।
खेवठ—( ना० पु० ) जमिनदाराची व जमिनीची नोंद असलेली पाटिलाची वही;—दार (ना० पु०) हिस्सेदार पट्टीदार ।
खेवटिया—( ना० पु० ) "खेवक" पहा ।
खेवना—( स० क्रि० ) "खेना" पहा ।
खेवा—(ना० पु०) नावेंतून नदी ओलांडणें; नावेचें भाडें ।
खेवाई—( ना० स्त्री० ) नांव वल्हविणें ।
खेवैया—( ना० पु० ) आंबी; नावाडी ।
खेस—( ना० पु० ) एक प्रकारचें कापड ।
खैंच—( ना० स्त्री० ) ताण, ओढ; लक्ष वेधणें;—तान—( ना० पु० ) तन्टा; भांडण ।
खैंचना—( स० क्रि० ) "खिंचना" पहा ।
खैंचवाना—( स० क्रि० ) ओढविणें ।
खैंचाखैंची, खैंचाखैंच—( ना० स्त्री० ) ओढाताण; भांडण; रस्सीखेंच ।
खैंचातानी—( ना० स्त्री० ) झगडा; संकटें ।
खैर—( ना० पु० ) खैरसार; कात ।
खैर—( वि० ) ठीक; बरें; कुशल; ( अ० ) अस्तु; फार उत्तम; ( ना० पु० ) चांगुलपणा; कल्याण; आरोग्य ।
खैरा—( ना० पु० ) कबूतर; ( वि० ) पिंगट; तपकिरी ।
ख़ैरात—(ना० स्त्री०) शिक्षा, धर्मादाय—खाना (ना० पु०) भिक्षाग्रह ।
ख़ैराती—( वि० ) धर्मार्थ ।
खला—( ना० पु० ) खोंड, घुळी ।
खोआ—
खोया— } ( ना० पु० ) खवा, मावा ।
खोआना—( स० क्रि० ) हरविणें, फसले जाणें; चुकणें ।
खोई—(ना० स्त्री०) उसाची वाळलेली, चोयटी, कांबळ्याची कुंची ।
खोंखना—( अ० क्रि० ) खोकणें ।
खोंखी—( ना० स्त्री० ) खांसी ( हिं० ) खोकला ।
खोंच—( ना० स्त्री० ) कापडावरील भोंक, कापडाचा खोंबारा ।
खोंचना—( स० क्रि० ) खुपसणें, रेटणें ।
खोंचा—( ना० पु० ) ठेचून भरणें, कापडाची, ... भर ।
खोंटा—( ना० पु० ) घोंसला ( हिं० ) पक्ष्याचें घरटें ।
खोंडला—( वि० ) खोखला, थोथा ( हिं० ) बोदा, पोकळ ।

खोंता—
खोंथा— ( ना० पु० ) घोंसला (हिं०) "खोटा" पहा।
खोंधा—

खोंपा—( ना० पु० ) वेणी, बुचड़ा।

खोंसना—( स० क्रि० ) भरणें, खुपसणें, आंत ढकलणें शिरविणें।

खोखला—( वि० ) "खोंडल" पहा।

खोखा—( ना० पु० ) रुपये चुक्ते केलेली हुंडी, बालक, बच्चा।

खोचड़—( ना० पु० ) दुष्ट मनुष्य।

खोज—( ना० पु० ) तलाश ( हिं० ) तपास, शोध, चौकशी, माग ( ना० स्त्री० ) चौकशी, झडती।

खोजना—( स० क्रि० ) हुडकणें; शोधणें, चौकशी करणें, शोध लावणें।

खोजी, खोजिया—( ना० पु० ) शोधणारा, शोध लावणारा, चौकशी, करणारा।

खोट—( ना० स्त्री० ) दुर्गुण, अवगुण, दोष।

खोटा—( वि० ) असत्य, अपवित्र।

खोडस—( वि० ) सोलह ( हिं० ) सोळा १६।

खोड़—( ना० स्त्री० ) दोष, खोड, वाईट वेळ।

खोड़ा—( ना० पु० ) हथकड़ी ( हिं० ) हातकड़ी।

खोदना—( स० क्रि० ) उकरणें; कोरणें; खोदणें, शोधणें।

खोदनी—( ना० स्त्री० ) शोध, कुदळ।

खोना—( स० क्रि० ) गमाविणें, खर्चणें, उधळणें हरविणें।

खोप—( ना० स्त्री० ) गुहा, छिद्र, चीर।

खोपड़ा, खोपरा—( ना० पु० ) नारळांतील खोबरें, श्रीफल, आडपडदा।

खोपा—( ना० पु० ) "खोंपा" पहा।

खोवार—( ना० पु० ) रानडुकरें रहाण्याचें ठिकाण, किंवा झुडुप।

खोर—( ना० स्त्री० ) ढक्कन ( हिं० ) झांकणी, झांकण, ईश्वरी कोप किंवा शाप, भूत बाधा।

खोरी—( ना० स्त्री० ) दोष, दुगुर्ण, संकुचित मार्ग।

खोल—( ना० पु० ) म्यान, घर, पोकळी, तागड़ी।

खोलप—( ना० पु० ) झाडाची पोकळी।

खोलना—( स० क्रि० ) मोकळा करणें, उघडणें, पसरविणें, उघडा करणें।

खोह—( ना० पु० ) खळगा, खांच, गुहा।

खोरू—( ना० पु० ) खोंडाची, डरकाळी, भांडण।

खौलना—( अ० क्रि० ) उकळणें, खवळणें।

ख़्याल—( ना० पु० ) विचार।

ख़्वाहिश—( ना० स्त्री० ) इच्छा, आकांक्षा।

---

## ग

गंगाल—( ना० पु० ) घंगाळ; पाणी साठविण्याचें एक भांडें।

गंज—( ना० पु० ) ख़ज़ाना (हिं०) खजीना; साठा, ढीग बाजार; पेठ; उतार पेठ; टक्कल।

गंजन—(ना० पु०) नाशक, नाश करणारा।

गंजनी—( ना० स्त्री० एक सुगंधित गवत।

गंजिया—( ना० स्त्री० ) गवतकापणाराची झोळी, कानांतील बाळी।

गंजीफा—( ना० पु० ) पत्यांचा एक खेळ।

गंझेडी, गंझैल—( वि० ) गांजेकस, गांजापिऊ।

गंठकटा ( ना० पु० ) चोर, खिसेकापू।

गंठा—( ना० पु० ) लवंग, फुणगी।

गंडा—(ना० पु०) चार कवड्या किंवा पैसे।

गंडासा, गंड़ासा—( ना० पु० ) कडबा, किंवा वैरण कापण्याची लहान कुऱ्हाड।

गंडी—( ना० स्त्री० ) वर्तुळ, चक्र।

गंडेरी—( ना० स्त्री० ) उसाचे करवे।

गंदगी—( ना० स्त्री० ) घाणेरडेपणा, घाण।

गंदा, गंदी—( वि० ) घाणेरडी, घाण, घाणेरडा।

गंध—( ना० पु० ) वास

गंधराज—( ना० पु० ) चन्दन।

गंधी—(ना० पु०) अत्तर विकणारा ।
गंधीला - (वि०) मैला, गन्दा ।
गंवार—(ना० पु०) मूर्ख, ढ मनुष्य ।
गंवारू—(वि०) देहाती (हि०) खेडवळ अडाणी ।
गंवी—(वि०) खेड्यांत रहाणारा ।
गइया- (ना० स्त्री०) गाय, धेनु ।
गईबहोर—(वि०) बिघडलेली गोष्ट सुधारणारा ।
गगनभेड—(ना० पु०) गिधाड ।
गगर, गगरी—(ना० स्त्री०) घागर, गडा ।
गच—(ना० पु०) गारा ।
गचगीना+—(वि०) गांठयाळ, गिडाव, लठ्ठ ।
गज़क—(ना० स्त्री०) एक प्रकारची मिठाई ।
गजगौनी—(वि०) गजगामिनी ।
गजनाल—(ना० पु०) मोठी तोफ किंवा बन्दूक ।
गज़ब—(ना० पु०) संकट, अत्याचार, जुलुम, राग, शाप,-नाक (वि०) रागावलेला ।
गजर—(ना० पु०) एक मूल विशेष, गाजर ।
गजरा—(ना० पु०) गाजराची पानें, मोठया फुलांची माळा, हार,-हार, (ना० पु०) हार, माला ।
ग़ज़ल—(ना० स्त्री०) एक छन्द विशेष ।
गंजाना—(स० क्रि०) मिसळणें ।
गज़ी—(ना० स्त्री०) जाडें भरडें कापड ।
गझा—(ना० पु०) ढेर (हिं०) ढीग, सांठा ।
गझिन—(वि०) दाट, निबिड ।
गट—(ना० पु०) / गटी—(ना० स्त्री०) झुंड, समूह, तांडा ।
गट्टा—(ना० पु०) एक मिठाई, गुल्फ ।
गठ—(ना० स्त्री०) गिरह (हि०) गांठ, बन्धन ।
गठकटा—(ना० पु०) "गंठकटा" पहा ।
गठकटी—(ना० स्त्री०) खिसे कापूचा धंदा ।
गठना—(अ० क्रि०) मिसळणें, एकत्रित होणें, एकमेकावर प्रेम करणें ।
गठर—(ना० पु०) गठीला (हि०) मोठी गांठ ।
गट्टर—मोठा गठ्ठा ।
गठरी—(ना० स्त्री०) लहान गट्ठा किंवा गांठ, बोचकें ।
गठवाना (स० क्रि०) गाठविणें, बांधविणें ।
गठाना—(स० क्रि०) जोडणें, लावणें ।
गठाव—(ना० पु०) जोड, सम्बन्ध, सांध ।
गठिया—(ना० स्त्री०) गाठोडें, बोचकें, पोत, गांठ,—या गठिया वाव (ना० स्त्री०) संधिवात, रोगविशेष
गठिहा—(वि०) गांठयाळ, ग्रंथियुक्त ।
गठील—(वि०) धष्ट पुष्ट, दांडगा, पुष्ट ।
गड़न्त—(ना० स्त्री०) एक प्रकारचा खेळ ।
गड़गूदड़—(ना० पु०) जुनें कपडे, चिंध्या ।
गड़न—(ना० पु०) मूर्त्ति, आकार, घडण ।
गड़ना—(अ० क्रि०) शिकरणें, बसणें, पुरले जाणें ।
गड़प—(ना० पु०) घोट, घुटका अदृश्य ।
गड़पंख—(ना० पु०) एक प्रकार चा पक्षी ।
गड़बडाना—(अ० क्रि०) परेशान होना (हि०) धळणें, घोटाळा होणें ।
गड़बड़ाहट— / गड़बड़ी— (ना० स्त्री०) गड़बड, धांदल, गों
गडमड—(वि०) मिश्रित, अव्यवस्थित ।
गड़रिया—(ना० पु०) धनगर ।
गड़वाना—(स० क्रि०) जमीनींत खुपसविणें पुरविणें ।
गड़हा—(ना० पु०) खन्दक (हिं०) खाच, भगदाड, विवर ।
गड़ाना—(स० क्रि०) "गड़वाना" पहा ।
गडुआ— / गडुवा— / गड़वा— (ना० पु०) पाणी पिण्याचा लहान किंवा लोटा ।
गड़ियार—(वि०) हट्टी, दृढ, बळकट ।
गड़ियारी—(ना० स्त्री०) हट्ट, दाढ्य ।
गड़ेरिया—(ना० पु०) 'गड़रिया' पहा ।
गड़ोना—(स० क्रि०) खुपसणें, छेदणें, विंधणें ।
गड्डामी—(ना० पु०) काफिर (हि०) धर्मलंड, धर्मश्रद्धाहीन मनुष्य ।
गड्डी—(ना० स्त्री०) पुडकें, दहा दस्ते कागद ।

गढ़—
गढ—
} ( ना० पु० ) दुर्ग, कोट, किल्ला, गढ़ी राजमहल

गढ़त—
गढ़न—
} ( ना० पु० स्त्री० ) घडण, आकार, रचना, बांधणी ।

गढ़ना—( स० क्रि० ) निर्माण करणें, बनविणें, रचणें, सुधारणें ।

गढ़वार—( वि० ) स्थूल, जाडा; गाढ ।

गढ़वाल—( ना० पु० ) किल्ल्याचा रक्षक; किल्लेदार; एका नगराचें नांव ।

गढ़ा—( ना० पु० ) 'गड़हा' पहा ।

गढ़ाई—( ना० स्त्री० ) घडणावळ; बनविण्याची मजूरी ।

गढ़ाना—( स० क्रि० ) बनाविणें; घडविणें ।

गढ़िया—( ना० स्त्री० ) भाला; बरची; गढ़नेवाला ।

गढ़ी—( ना० स्त्री० ) लहान गड; किल्ला ।

गढ़ेला—( ना० पु० ) खांच; लहान खळगा ।

गढ़ैया—( ना० पु० स्त्री० ) लहान तलाव; तळें ।

गणक—( ना० पु० ) ज्योतिषी; गणिती; दैवज्ञ ।

गणकी—( ना० स्त्री० ) ज्योतिषाची पत्नी ।

गणराऊ—( ना० पु० ) गणराज; गणनाथ ।

गणिका—( ना० स्त्री० ) वारांगना; वेश्या; स्वैरिणी; कुलटा ।

गण्ड—( ना० पु० ) गाल; कपोल; गेंडा ।

गण्डक—( ना० पु० ) गेंडा ।

गण्डमूर्ख—( ना० पु० ) महामूर्ख; पढतमूर्ख ।

गत—( ना० स्त्री० ) चाल; राग; दशा; शेवट ।

गदका—( ना० पु० ) पट्टा; दांडकें ।

गदकारी—( वि० ) रोग उत्पन्न करणारा ( पदार्थ )

गदगरा+—( ना० पु० ) नाहमवार जमीन ( हिं० ) उंच सखल जमीन ।

गदबदा—( वि० ) स्थूल; तुन्दिल ।

ग़दर—( ना० पु० ) उपद्रव, बंड ।

गदर, गदरा—( वि० ) अधपका ( हिं० ) अर्धवट पिंकलेला ।

गदराना—( अ० क्रि० ) अधकिचा पिकणें ।

गंदला—( वि० ) घाण; पंकमय; गढूळ, मळकट, मलिन ।

गंदलापन—( ना० पु० )
गंदलाई—( ना० स्त्री० )
} घाणेरडेपणा; मलिनता ।

गदह—( ना० पु० ) गाढव, मूर्ख ।

गदहा—( ना० पु० ) वैद्य, रोग घालविणारा ।

गदाल—( ना० पु० ) हत्तीवर घालण्याची मोठी गादी ।

गदेला—( ना० पु० ) बालक, मूल गादी ।

गद्दर—( वि० ) अधपका ( हिं० ) कच्चा ।

गधी, गधैया—( ना० स्त्री० ) गाढवीण ।

गन—( ना० पु० ) गण, यूथ, समूह ।

ग़नीम—( ना० पु० ) दुश्मन ( हिं० ) शत्रु, लुटारू ।

ग़नीमत—( ना० स्त्री० ) लूट, मिळकत, बरकत ।

गन्दा—( वि० ) मैला ( हिं० ) घाण ।

गन्धसार( ना० पु० ) चंदन ।

गन्धाना—( अ० क्रि० ) वास येणें ।

गन्धील—( वि० ) मैला ( हिं० ) घाण ।

गन्ना—( ना० पु० ) ऊख ( हिं० ) ऊस ।

गप—( ना० स्त्री० ) मजाक, गपोड़ा ( हिं० ) गप्पा; निरर्थक बोलणें; गप्पा-गोष्टी ।

गपकना—(स० क्रि० ) गिळणें; गडप करणें ।

गपड़चौथ—(ना० स्त्री०) गडबड; अव्यवस्था, गोंधळ ।

गपशप—(ना० स्त्री०) बकवाद, मिथ्यावाद; गप्पाशप्पा ।

गप्पी—( ना० पु० ) मिथ्यावादी; गप्पीदास; बकवादी । असत्यवादी ।

ग़फ़लत—( ना० स्त्री० ) लापरवाही ( हिं० ) सुस्ती, निष्काळजीपणा, बेपर्वाई ।

गफ़—( वि० ) घना ( हिं० ) दाट विणलेलें ।

ग़फ़लती—(वि०) लापरवाह (हिं०) निष्काळजी, गाफिल, बेसावध, विसराळू ।

गबदा—( वि० ) गोश्तदार ( हिं० ) लठ्ठ, वातुळ, फोपसा ।

गबन—( ना० पु० ) पैसे खाणें ।

गबरू—( ना० पु० ) जवान ( हिं० ) पट्टा, युवक ।

गबी—( वि० ) विसराळू, ढिल्या मनाचा, अदूरदर्शी, हीन विचार, विचार हीन।

गब्बर—( वि० ) श्रीमंत; गर्विष्ट।

गभीर*—( वि० ) गहरा ( हिं० ) गंभीर: खोल।

ग़म—( ना० पु० ) शोक, दुःख; पीड़ा।

—ख़ोर ( वि० ) सोशिक, गरीब।

—ख़्वारी ( ना० स्त्री० ) सहानुभूति।

—गीन ( वि० ) दुःखी; पीड़ित।

—गीनी (ना० स्त्री०) दुःख, दुर्मुखलेपणा।

—नाक़ ( वि० ) दुर्मुखलेला,—दुःखी।

गमकील—( वि० ) सुगन्धित, सुवास।

गमछा—( ना० पु० ) अंगोछा (हिं०) पंचा, आंगपुसणी, टॉवेल।

गमाना—( स० क्रि० ) खोना ( हिं० ) गमाविणें।

गमार—( वि० ) गँवार ( हिं० ) खेडवळ।

गयन्द—( ना० पु० ) हाथी ( हिं० ) हत्ती।

गयाली—( ना० पु० ) गयावाल ( हिं० ) गयावळ।

ग़रज़—( ना० स्त्री० ) मतलब ( हिं० ) काम, जरूरी; हेतु; उद्देश, उपयोग, अर्थ, संबंध।

गरदन—( ना० पु० ) गळा; मान।

गरदनियाँ—( ना० स्त्री० ) अर्धचंद्र।

गरदा—( ना० स्त्री० ) धूल, घूर; धूळी।

गरवता—( ना० स्त्री० ) } गर्व; दर्प।
गरब—( ना० पु० ) }

गरबीला—( वि० ) घमण्डी ( हिं० ) अभिमानी।

गरभ—( ना० पु० ) गर्भ; पोट; अहंकार, अभिमान।

गरम—( वि० ) उष्ण, तप्त, क्रुद्ध।

गरमी—( ना० स्त्री० ) उष्णता, ताप।

गरल—( ना० पु० ) ज़हर ( हिं० ) विष।

गरली—( वि० ) ज़हरीला ( हिं० ) विषारी।

गरवा*—( वि० ) भारी ( हिं० ) जड, धीर, प्रतिष्ठित।

गरा—( ना० पु० ) गला ( हिं० ) गळा।

गरारी—
गराड़ी— ( ना० स्त्री० ) गडगडा, फिरकी, मणका।

गरियाना—(स० क्रि० ) गाली देना ( हिं० ) शिवी देणें, अपशब्द बोलणें।

गरी—( ना० स्त्री० ) खोपरा, गोला (हिं०) नारळाचें खोबरें किंवा गर।

गरूर—( ना० पु० ) घमेंड, गर्व; पोकळ डौल।

गर्द—( ना० स्त्री० ) धूळ।

गर्दन—( ना० स्त्री० ) "गरदन" पहा।

गर्दनी—( ना० स्त्री० ) कुस्तींतील एक पेच।

गर्दिश—( ना० स्त्री० ) परेशानी ( हिं० ) चक्कर; फे

गर्भदास—( ना० पु० ) दासीपुत्र।

गर्मागर्म—( वि० ) ताजा, ऊनऊन।

गर्माना—( स० क्रि० ) तापणें, रागावणें।

गलका+—(ना० पु०) फोड़ा ( हिं० ) एक रोग विशे

गलगण्ड—( ना० स्त्री० ) गंडमाळा।

ग़लत—( वि० ) अशुद्ध, चूक, असत्य, सदोष, अयथार्थ

गलतनी—( ना० स्त्री० ) गळबंधन, दावें।

ग़लती—( ना० स्त्री० ) चूक प्रमाद, दोष, नजरचूक।

गलना—( स० क्रि० ) वितळणें; एकरस होणें; झिज खर्च होणें।

गलतंस—( वि० ) ( हिं० ) निपुत्रिक, बे औलाद।

गलन्दा—(वि ) मुखर ( हिं० ) कटुभाषी, फटकळ।

गलफटाकी—( ना० स्त्री० ) बढ़ाई, घमंड, आ च आपल्या तोंडानें स्तुती करणें।

गलफड़ा—( ना० पु० ) गालफाड, गाल, कपोल।

गलफट—( वि० ) बकवादी ( हिं० ) वितंडवादी।

गलबही—( ना० स्त्री० ) गळ्याभोंवती हात घा मिठी मारणें।

गलबाँह—( ना० स्त्री ) आलिंगन।

गलसुई—( ना० स्त्री० ) लहान तक्क्या, उशी।

गला—( ना० पु० ) "गर्दन" पहा, गळा।

गलाऊ—( वि० ) द्रवकरण्या जोगा।

गलाना—( स० क्रि० ) द्रव करणें।

गलाव—
गलावट— } ( ना० पु० ) द्रव।

गलासी—( ना० पु० ) दावें; गुरें बांधण्याची दोरी।
गलिया—(ना० पु०) काम करतां-करतां मध्येंच बसणारा। बैल।
गलियाना—( स० क्रि० ) शिवी देणें, शाप देणें, जेवणावर जेवण करणें।
गलियर—( वि० ) काहिल ( हिं० ) सुस्त, आळशी।
गलियारा—( स० क्रि० ) लहान गल्ली।
गली—( ना० स्त्री० ) बोळ,
—गली (क्रि०) गल्ली गल्लींतून।
गलीचा—( ना० पु० ) गालिचा।
ग़लीज़—( वि० ) मैला ( हिं० ) घाण, गलिच्छ।
गलौश्रा—( ना० पु० ) गाल, माकडाच्या गलांतील थैली।
गल्प—( ना० स्त्री० ) उपन्यास (हिं०) कादंबरी, कहाणी, उपकथा, कल्पित गोष्ट।
ग़ल्ला—( ना० पु० ) अनाज ( हिं० ) धान्य, दाणागोठा।
—फ़रोश( ना० पु० ) धान्याचा व्यापारी।
गवना—( नां० पु० ) गौना ( हिं० ) वधू-प्रवेश।
गवाख—
गवाछ—
गवाक्ष— } (ना० स्त्री०) रोशनदान(हिं०)झरोका,सार्णें।
गवाना—( स० क्रि० ) गावविणें।
गवारा—( वि० ) सहन करण्यासारखें।
गवासा—( ना० पु० ) गोभक्षक, कसाई।
गवाह—( ना० पु० ) साक्षीदार, चश्मदीद गवाह ( ना० पु० ) चक्षुर्वैसत्यं साक्षीदार।
गवाही—( ना० स्त्री० ) साक्ष।
गवैया—( ना० पु० ) गवई; गायक।
गवैहाँ—( वि० ) देहाती ( हिं० ) खेडवळ।
गश्त—( ना० पु० ) चक्कर, फेरा।
गश्ती—( ना० पु० ) पहारेकरी, घस्त घालणारा।
ग़श—( ना० पु० ) बेहोशी ( हिं० ) मूर्छा।
गहक—( ना० स्त्री० ) उत्साह, अम्मळ उन्मत्तता।
गहकना—( अ० क्रि० ) संतुष्ट होणें, झिंगणें।
गहकी+—(ना० पु०) खरीददार।

गहगहाना—(अ० क्रि०) हिलना ( हिं० ) हलणें, हेलकावे खाणें; अत्यन्त प्रसन्न होणें।
—गहगहे ( क्रि० अ० ) आनंदानें मस्त झाले।
गहन—( ना० पु० ) ग्रहण, गम्भीर विपत्ति।
गहना—( ना० पु० ) अलंकार, दागिना।
गहरा, गहरी—( वि० ) खोल; गंभीर, अगाध।
गहरी नींद—( ना० स्त्री० ) गाढ झोंप।
गहवा+—( ना० पु० ) संडासी ( हिं० ) चिमटा।
गहवारा—( ना० पु० ) पाळणा, झोपाळा।
गाँजना—(स० क्रि०) जमा करणें, एकवठणें; ढीग करणें।
गाँजा—
गाँझा— } ( ना० पु० ) एक नशीली पत्ती ( हिं० ) गाँजा।
गाँठ—( ना० स्त्री० ) गिरह ( हिं० ) गांठ, जोड़; संधी; सांधा।
—गठीली—(वि०) गाठ्याळ।
गाँठना—( स० क्रि० ) जोडणें; बांधणें, वश करणें; प्रभुत्व गाजविणें।
गाँडा—( ना० पु० ) उस; इक्षु विशेष।
गाँथना+—( अ० क्रि० ) भित उठविणें, बनविणें।
गाँसा—( ना० पु० ) हाताच्या किंवा पायाच्या दोन बोटा मधील त्रिकोण।
गागर—
गागरी— } ( ना० स्त्री० ) घड़ा ( हिं० ) घागर।
गाछ—( ना० पु० ) झाड; वृक्ष।
गाज—( ना० स्त्री० ) विद्युत, फेस, गर्जना।
गाजना—( अ० क्रि० ) गरजणें; सिंहनाद करणें।
गाटा, गाठा—( ना० पु० ) जमीनीचा एक तुकड़ा; जमीनीचा तक्ता।
गाड़ना—( स० क्रि० ) दफ़न करना ( हिं० ) पुरणें; माती देणें, लपविणें।
गाड़र—( ना० स्त्री० ) भेड़ ( हिं० ) शेळी; बकरी।
गाड़रू—( ना० पु० ) गारुडी; सापाचें विष उतरविणारा।
गात—( ना० स्त्री० ) गात्र; देह;।
गाथक—( ना० पु० ) गवैया ( हिं० ) गायक।
गाद—( ना० स्त्री० ) तलछट ( हिं० ) गाळ, गदळ।

गादड़,+—( ना० पु० ) गीदड़, बुज़दिल (हिं०) गिधाड; भित्रा ।

गाध—( ना० पु० ) स्पृहा; अभिलाषा ।

गान्धिक—( ना० पु० ) सुगन्धी; अत्तर विकणारा, एक प्रकारचा किडा ।

ग़ाफ़िल—( वि० ) बेखबर ( हिं० ) बेसावध; आळशी; बेपर्वा ।

गाभना—( स० क्रि० ) धमकावणें; दटावणें ।

गाभा—( ना० पु० ) केळीचें कोंवळें पान; रजईंतील जुना कापूस; कच्चें अन्न ।

गाभिन, गाभिनी—( ना० स्त्री० ) गर्भिणी ।

गाम—( ना० पु० ) गाँव ।

गायब—( वि० ) लुप्त, गैरहजर; हरवलेला ।

गार—( ना० स्त्री० ) गाली ( हिं० ) शिवी; अभिशाप ।

ग़ार—( ना० स्त्री० ) गढ़ा ( हिं० ) खड्डा, खांच ।

ग़ारत—( ना० स्त्री० ) लूट; विधाड़, नष्ट, बरबाद मटियामेट, ध्वस्त ।

ग़ारतगर—( ना० पु० ) डाकू ( हिं० ) लुटारू ।

ग़ारतमरी—( ना० स्त्री० ) तबाही ( हिं० ) लूट ।

गारद—( ना० पु० ) पुलिस के पहरेदार ( हि० ) पहाऱ्याचा शिपाई, गार्ड ।

गारना—( स० क्रि० ) पिळणें; दूध काढणें, धार काढणें, रस काढणें ।

गारा—( ना० पु० ) चिखल, गिलाव्याची माती, चाळलेली माती ।

गाल—( ना० पु० ) कपोल, गाल ।
—बजाई ( ना० स्त्री० ) बकवाद करणें, व्यर्थ बडबड करणें ।

गाली—( ना० स्त्री० ) शिवी ।
—गलौज शिवी गाळ ।

गावकुशी—( ना० स्त्री० ) गोवध ।

गावधप+—( ना० स्त्री० ) धोखा ( हिं० ) फसवणूक, फुसलांवणे ।

गावधप्पू—( वि० ) स्वार्थी, फसव्या ।

गावदी—( ना० पु० ) बेवकूफ ( हिं० ) भोळा, अज्ञानी, नादान ।

गाहक—( ना० पु० ) 'गहकी' पहा ।

गाहना—( स० क्रि० ) हुडकणें, दावणें, पकडणें ।

गाहा—( ना० स्त्री० ) गाथा, कथा, कहाणी ।

गाही—( ना० स्त्री० ) पंजा, पांचाची संख्या ।

गिंडुरी—( ना० पु० ) चुंबळ ।

गिटकारी+—( ना० स्त्री० ) गाण्यांतील एक आवाज, तान ।

गिटकौरी—( ना० स्त्री० ) गोटा, गोटी, खडा, गुंडा ।

गिध—, गीध— ( ना० पु० ) गिधाड ।

गिनती—, गिन्ती— ( ना० स्त्री० ) शुमार ( हिं० ) गणना; मोजदाद—के ( वि० ) कांहीं थोडे ।

गिनना—( स० क्रि० ) शुमार करना ( हिं० ) मोजणें, गणती करणें, मानणें ।

गिनाना—( स० क्रि० ) मोजविणें ।

गिरजा—, गिरजाघर— ( ना० पु० ) चर्च । इसाईलोकांचे देऊळ ।

गिरथापन+—( ना० पु० ) काटकसर ।

गिरना—( अ० क्रि० ) पडणें ।

गिरपड़ना—( अ० क्रि० ) खालीं पडणें ।

गिरफ्तार—( वि० ) पकड़ा हुआ ( हिं० ) पकडलेला ।

गिरफ्तारी—( ना० स्त्री० ) कैद, बन्धन ।

गिरवाना—, गिराना— ( स० क्रि० ) लवंडणें, पाडणें ।

गिरिर+—( ना० पु० ) तरस ।

गिर्द—( अ० ) चारों ओर ( हिं० ) चोहों बाजूनीं ।

गिलगिला—( वि० ) मुलायम ( हिं० ) मऊ ।

गिलगिलाहट—( ना० स्त्री० ) मऊपणा ।

गिलटी—( ना० स्त्री० ) मांसग्रंथी विशिष्ट, घट्ट, कधीला न वांकणारी सूज ।

गिलहरा—( ना० पु० ) पानाचा डबा ।

गिलहरी—( ना० स्त्री० ) खार, गलोरी ।

ग़िलाफ़—( ना० पु० ) खोल ( हिं० ) आच्छादन, झांकण ।
गिलियर—( वि० ) काहिल ( हिं० ) आळशी ।
गिलोय— } ( ना० स्त्री० ) एक प्रकारची वनस्पति ।
गिलो— }
गिलौंदा—( ना० पु० ) महूचें फूल ।
गिल्ला—( ना० पु० ) शिकायत, शोर ( हिं० ) तक्रार, दंगा ।
गिल्ली—( ना० स्त्री० ) चिन्नी, विटी ।
गींज—( ना० स्त्री० ) मुसलमानांचें मोहरमांतील भोजन विशेष ।
गींजना—( स० क्रि० ) मलना ( हिं० ) चोळणें, मर्दन करणें ।
गीदड़—( ना० पु० ) सियार ( हिं० ) कोल्हा ।
—भभकी ( ना० स्त्री० ) फुशारकी ।
गील—( वि० ) ओला, भिजलेला ।
गुइयाँ—( ना० पु० स्त्री० ) सखा, सखी, साथी ।
गुंज—( ना० स्त्री० ) प्रतिध्वनि, गुंजा ।
—हार-कंठी ।
गुंजान—( वि० ) दाट, निविड, गाढ ।
गुंजानी—( ना० स्त्री० ) निविडता, दाटपणा ।
गुंजायश—( ना० स्त्री० ) स्थान, समाई, लाभ, फायदा ।
गुंजायशी—( वि० ) फायदेशीर, योग्य ।
गुंडा—( ना० पु० ) नीच, दुष्ट, उडाणटप्पू ।
गुंथवाना—( स० क्रि० ) गुन्तविणें ।
गुंदेला—( वि० ) चिकाचा, डिकाचा, गोंदाचा ।
गुच्छा—( ना० पु० ) गुच्छ, तुरा, एक दागिना, कणीस ।
गुज़रना—( अ० क्रि० ) गुजरणें, जाणें, मरणें, आटोपणें ।
गुजरानना+—( स० क्रि० ) पेश करना ( हिं० ) हरज करणें, पुढें मांडणें ।
गुजारिश—( ना० स्त्री० ) अर्ज, विनंति ।
गुजिया—( ना० स्त्री० ) कर्णफूल, कानांत घालण्याचा अलंकार ।
गुझन+—( वि० ) दाट, निबिड ।
गुझिया—( ना० स्त्री० ) एक मिठाई ।
गुटकवा—( स० क्रि० ) गिळणें, कबूतरा सारखा आवाज करणें ।
गुटका—( ना० पु० ) एक लहान पुस्तक, हस्तपत्रिका, औषधविशेष ।
गुट्ट—( ना० पु० ) समूह, मंडळी, यूथ ।
गुठलाना—( ना० पु० ) फळांमध्यें कोय होणें, दांत आंबणें ।
गुठली—( ना० स्त्री० ) कोय; बी. आठळी ।
गुड़—( ना० पु० ) गूळ ।
गुड़म्वा—( ना० पु० ) गुळंबा ।
गुड़गुड़ी—( ना० स्त्री० ) छोटा हुक्का ( हिं० ) लहान. हुक्का, चिमुकली चिलीम ।
गुड़ाखू—( ना० पु० ) ओढण्याची तंबाखू ।
गुड़ाना—( स० क्रि० ) खोदविणें ।
गुड़िया—( ना० स्त्री० ) चिंध्याची बाहुली ।
गुड़ी— } (ना० स्त्री० ) कनकावळा, पतंग, गांठ, गोली,
गुड्डी— } कपट की गांस, मनमुटाव ।
गुड्डा—( ना० पु० ) चिंध्यांचा बाहुला ।
गुणखान—( वि० ) गुणी, लायख ।
गुणनफल—( ना० पु० ) गुणाकार ।
गुणना—( स० क्रि० ) गुणणें ।
गुणागुण—( ना०पु० ) गुणदोष, बरें वाईट ।
गुणा—( ना० पु० ) पट ।
गुणी—( वि० ) होशियार, हुनरमन्द ( हिं० ) कुशल, गुणवान, गुणसागर ।
गुत+—( ना० पु० ) मौन, गम्भीरता ।
गुदकलिक— } ( ना० पु० ) बवासीर ( हिं० )
गुदांकुर— } मूळ व्याध ।
गुदगुदा—( वि० ) मुलायम ( हिं० ) मऊमऊ ।
—बिस्तर ( ना० पु० ) मऊ बिछाना ।
गुदगुदाना—( स० क्रि० ) गुदगुल्या करणें ।
गुदगुदाई— }
गुदगुदाहट— } ( ना० स्त्री० ) गुदगल्या ।
गुदगुदा— }

गुदड़िया—( वि० ) फाटके कपडे घातलेला।
गुदड़ी—( ना० स्त्री० ) कन्था, वाकळ।
गुदरना—( स० क्रि० ) त्यागणें, टाळणें।
गुदाम—( ना० पु० ) गोला ( हिं० ) वखार।
गुदारा*—( ना० पु० ) खेवानाव ( हिं० ) होडी, नौका।
गुद्दा—( ना० पु० ) झाडाची मोठी डहाळी।
गुनगुना—( वि० ) कोमट, थोडे से ऊन।
गुनगुनाना—( अ० क्रि० ) गुणगुणणें।
गुना—( ना० पु० ) 'गुणा' पहा।
गुनाह—( ना० पु० ) पाप, अपराध, अन्याय।
गुनाहगार—( ना० पु० ) पापी, अपराधी।
गुनाहगारी—( ना० स्त्री० ) पापीपणा।
गुनिया—( ना० पु० ) सुताराचा गुण्या।
गुप्तार—( ना० पु० ) लपणें; लपवालपव।
गुप्तगति—( ना० पु० ) भेदिया, जासूस ( हिं० ) गुप्त पोलीस।
गुप्ती—( ना० स्त्री० ) आंत तरवार असलेली काठी।
गुफा—( ना० स्त्री० ) खोह ( हिं० ) गुहा, कन्दर।
गुफ्तगू—( ना० स्त्री० ) बातचीत ( हिं० ) गप्पा, संभाषण, संवाद।
गुब्बारा—( ना० पु० ) आकाशयान, विमान।
गुभाना—, गुभोना— ( स० क्रि० ) टोंचणें, खुपसणें, घुसविणें।
गुभीला—( ना० पु० ) खडे, कुपित्थ।
गुम—( वि० ) ग़ायब ( हिं० ) हरपलेला, चुकलेला, गोंधळलेला।
गुमटा—( ना० पु० ) मोठा फोड, सूज, व्रण, कापूसखाणारा एक किडा।
गुमटी—, गुम्मट— ( ना० स्त्री० ) कलस, घुमट, शिखर, लहान खोली।
गुमड़ा—( ना० पु० ) सूज, टेंगुळ, गांध।
गुमरी—(ना० स्त्री०) घेरी, भोंवळ, भोवंड।
गुमसना—( अ० क्रि० ) कुजणें, सडणें, दुर्गन्धित होणें।
गुमसा—( वि० ) सडलेला, कुजलेला।
गुमान—( ना० पु० ) अभिमान, मान, अहंकार, शंका, कल्पना।
गुमानी—( वि० ) अहंकारी, अभिमानी।
गुमाश्ता—( ना० पु० ) मुख्तार ( हिं० ) मुखत्यार, बातमीदार।
गुम्फ—( ना० पु० ) गुम्फणें, गुंतविणें।
गुम्मा—( ना० पु० ) एक प्रकारची वीट।
गुर—( ना० पु० ) पद्धति, रीति, वह साधन या क्रिया जिसके करते ही कोई काम तुरन्त हो जाय।
गुरगा—( ना० पु० ) शिष्य, नोकर, अनुचर, चेला, चाकर।
गुरजना—( अ० क्रि० ) गुरगुरणें।
गुराई—( ना० स्त्री० ) सोज्वळपणा, गोरेपणा।
गुरिया—( ना० स्त्री० ) मनिया ( हिं० ) मणी, माळेचे दाणे।
गुरु—( ना० पु० ) उस्ताद ( हिं० ) आचार्य ( वि० ) भारी, जड, महत्त्वाचें।
—घंटाल—( ना० पु० ) पक्का लुच्चा।
गुरुपाक—( वि० ) पचण्यास कठीण।
गुरुवाइन—( ना० स्त्री० ) आचार्यांची पत्नी, धर्मगुरूची स्त्री।
गुर्गा—( ना० पु० ) "गुरगा" पहा।
गुर्गाबी—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें पादत्राण।
गुर्गुरी—( ना० स्त्री० ) संधिवात।
गुर्राना—( अ० क्रि० ) गरजणें, गुरगुरणें, रागावणें, डोळे वटारणें।
गुर्री—( ना० स्त्री० ) भाजलेले जव।
गुर्विनी, गुर्वी ( ना० स्त्री० ) गर्भवती स्त्री।
गुर्सी+—( ना० स्त्री० ) निखारा ठेवण्याचें भांडें।
गुल—( ना० पु० ) फूल, निखारा, दिव्याच्या वातीचें जळकें टोंक।
—फूलना ( अ० क्रि० ) मोहोर येणें।

गुल—( ना॰ पु॰ ) शोर ( हिं॰ ) दंगा, गडबड।
गुलगुला—(ना॰ पु॰) तेल किंवा तूप या मध्यें तळलेल्या गोड पुऱ्या।
गुलगुलाना—( स॰ क्रि॰ ) मऊ करणें, मृदु करणें।
गुलचला—( ना॰ पु॰ ) बंदुक वाला, बंदुक्या।
गुलचा—( ना॰ पु॰ ) गालावर चपाटी मारणें।
गुलझट—( ना॰ स्त्री॰ ) अंगावरील सुरकुती।
गुलझडी—(ना॰ स्त्री॰) गाठ, गुंतागुंत झालेलें जाळें।
गुलाई—( ना॰ स्त्री॰ ) गोलाई ( हिं॰ ) गोलपणा।
गुलाब—( ना॰ पु॰ ) सुवासिक फूल।
—जल, गुलाबाचें पाणी।
—जामुन ( ना॰ स्त्री॰ ) मिठाई विशेष।
—पाश ( ना॰ स्त्री॰ ) गुलाबदाणी।
गुलाम—( ना॰ पु॰ ) नोकर, गुलाम, दास।
गुलामी—( ना॰ स्त्री॰ ) दास्यत्त्व।
गुलू—( ना॰ पु॰ ) "गर्दन" पहा।
—बन्द ( ना॰ पु॰ ) गळपट्टी।
गुलूगा—( ना॰ पु॰ ) गालफट, गालफड ( माकडाचें )
गुलेल } गुलैल } ( ना॰ स्त्री॰ गोफण, एक धनुष्य विशेष।
गुलेलची—( वि॰ ) गोफण चालविणारा।
गुल्ला—( ना॰ पु॰ ) गोफणीची गोळी, दगड।
गुवा—( ना॰ पु॰ ) सुपारी।
गुवाक—( ना॰ पु॰ ) सुपारीचें झाड।
गुसल, गुस्ल—( ना॰ पु॰ ) स्नान।
—करना ( अ॰ क्रि॰ ) स्नान करणें।
गुसलखाना—( ना॰ पु॰ ) न्हाणीघर।
गुसाईं—( ना॰ पु॰ ) स्वामी, संन्यासी।
गुस्ताख—( वि॰ ) ढीठ ( हिं॰ ) हुंब्या, उद्दाम, उद्धट।
गुस्ताखी—( ना॰ स्त्री॰ ) ढिठाईं ( हिं॰ ) उद्दामपणा, धीटपणा, उद्धटपणा।
गुहर—( वि॰ ) गुप्त, झाकलेला, लपविलेला।
गुहराना—( स॰ क्रि॰ ) हाकमारणें, जवल बोलावणें, मदत करणें।
गुहांजनी—( ना॰ स्त्री॰ ) गुहेरी ( हिं॰ ) डोळ्यावर येणारा फोड।
गुहाना—( स॰ क्रि॰ ) ग्रंथित करणें।
गुहार—( ना॰ स्त्री॰ ) पुकार, मदतीची याचना।
गुहारी—( ना॰ पु॰ ) मदतीची याचना करणारा।
गुहेरी—( ना॰ स्त्री॰ ) "गुहाजनी" पहा।
गूँगा—( वि॰ ) अनबोल ( हिं॰ ) मूक, मौनी।
गूँज—( ना॰ स्त्री॰ ) प्रतिध्वनी, आवाज।
गूँजना—( अ॰ क्रि॰ ) प्रतिध्वनी करणें, गर्जना करणें, आरोळी ठोकणें।
गूँझा—( ना॰ पु॰ ) एक प्रकारची मिठाई।
गूँठना— } गूथना— } (स॰ क्रि॰ ) ओवणें, गाठणें, शिवणें।
गूँथवाना—( स॰ क्रि॰ ) ओवविणें, गाठविणें, शिवविणें।
गूँदना— } गूँधना— } (स॰ क्रि॰ ) सांदना ( हिं॰ ) एकत्रित करणें, विणणें, वेणीघालणें।
गूगल—( ना॰ पु॰ ) धूप, गुग्गुळ।
गूगली—( ना॰ स्त्री॰ ) शिंप।
गूजी—( ना॰ स्त्री॰ ) दण्डा, काठी, सोटा।
गूढ़—( वि॰ ) कठीण, गुप्त, लुप्त।
गूथ—( ना॰ पु॰ ) कापसाचा गोळा।
गूदड़—( ना॰ पु॰ ) जुने कपडे।
गूदड़ी—( ना॰स्त्री॰ ) दुलई, रजई, लेप कन्था।
गूदर—( ना॰ पु॰ ) "गूदड़" पहा।
गूदा—( ना॰ पु॰ ) मगज, गाभा।
गूदिया+—( वि॰ ) लोभी; हावरा; अभिलाषी।
गूमड़ा—( ना॰ पु॰ ) फोड; सूज; व्रण।
गूमड़ी—( ना॰ स्त्री॰ ) गांठ; पुळी; पुटकुळी।
गूलर—( ना॰ पु॰ ) उंबर; एक फळ।
गूहड़िया—( ना॰ पु॰) उकिरडा; घाण टाकण्याची जागा।
गेंठ—( ना॰ स्त्री॰ ) माशाचें नांव।
गेंडक—( ना॰ पु॰ ) मखमल।
गेंडली—( ना॰ स्त्री॰ ) वेंटाळें;—मारना वेटाळें करणें।

गेंडुआ+ —
गेंड़ुआ+— } (ना०पु०) तकिया (हिं०) तक्क्या; उशी।
गेंद—(ना० पु०) चेंडू; खेळण्याची गोटी।
—बल्ला—(ना० पु०) चेंडूफळीचा खेळ।
गेंदी—(ना० स्त्री०) लहान चेंडू, गोटी।
गेगली—(ना० स्त्री०) मूर्खी; मूर्ख स्त्री।
गेडी—(ना० स्त्री०) एक प्रकारचा खेळ।
गेदया—(वि०) मूर्ख, साधा, भोळा अज्ञानी।
गेदा—(ना० पु०) पंखें न फुटलेला पक्षी; बचा।
गेपा—(ना० पु०) ढेपुनी (हिं०) बोंडी; स्तनाग्र; कुचाग्र; चूचुक।
गेबर—(ना० पु०) एक प्रकारचा पक्षी।
गेरु—(ना० पु०) काव; सोनकाव।
गेरुआ—(वि०) भगवी; काव्हेच्यारंगाचा।
गेला—(वि०) साधा; साधाभोळा।
गेलड़—
गैलड— } (ना० पु०) प्रथमपति पासून झालेलें मूल।
गेहूँ—(ना० पु०) गहू।
गेंहुआ—(वि०) गव्हाच्या रंगाचा; गव्हाचा; एक प्रकारचें गवत।
गैना—(ना० पु०) नाटा बैल (हिं०) लहान बैल; एक झाडी।
गैनी—(ना० स्त्री०) बैल गाडी।
ग़ैब—(वि०) छिपा (हिं०) गुप्त, अदृश्य; अव्यक्त; गैर हजर।
ग़ैबत—(ना० स्त्री०) ओड़ (हिं०) गैरहाज़िरी।
ग़ैर—(वि०) अन्य, दुसरा, भिन्न।
—आबाद (वि०) गैर वस्तीचा।
—मामूल (वि०) विन रिवाजाचा, गैर वहिवाटीचा, अव्यावहारिक।
—मुमकिन (वि०) अव्यवहार्य, अशक्य, असंभाव्य।
—मुनासिब (वि०) अयोग्य, न शोभण्या सारखा।
—शख़्स (ना० पु०) परका मनुष्य।
—वाजिब (वि०) अयोग्य, चूक, गैरवाजवी, अ-मंजस।
—हाज़िर (वि०) गैर हजर।
ग़ैरत—(ना० स्त्री०) शरमिन्दगी (हिं०) लाज; ... विनय।
गैरा—(ना० पु०) कवळी, पेंडका, पेंडकी।
गैल—(ना० पु०) मार्ग, रस्ता, गल्ली।
गैहरी—(ना० स्त्री०) हर्जा (हिं०) दंड।
गोंइठा—(ना० पु०) जाळण्या करितां वाळवून ठेवलें शेण, शेणी।
गोंठा—(ना० पु०) उपली (हिं०) गोवऱ्या, शेणी।
गोंद—(ना० पु०) डिंक।
—दानी (ना० स्त्री०) डिंकदाणी, डिंकाचें भांडें।
गोंदा—(ना० पु०) लभेरा (हिं०) पक्ष्यानां पकडण्या करितां लालूच दाखविण्याचा पदार्थ।
गोआल—(ना० पु०) गोप; गोपाळ; गवळी।
गोखरू—(ना० पु०) एक औषधी, कानांत घालण्याचें एक आभरण, भूषण।
गोंचना—(स० क्रि०) पकडणें, धरणें।
गोचारण—(ना० पु०) गो-पालन।
गोज़ल—(ना० पु०) गोमूत्र।
गोट—(ना० पु०) कापडाचा कांठ, खेळण्याची गोटी, किनारा।
गोटा—(ना० पु०) किनारा, कोर।
गोटी—(ना० स्त्री०) चेचक (हिं०) देवी, शीतला।
गोड़+—(ना० पु०) टांग, पाय, तंगडी।
गोड़ना
गोड़्ना } (स० क्रि०) खोदणें, उकरणें, खरडणें, ...सणें।
गोड़ी—(ना० स्त्री०) फायदा, लाभ, प्राप्ति।
गोढर—(ना० स्त्री०) खेत का कूड़ा (हिं०) शेतांतील सड।
गोण—(ना० पु०) बोरा (हिं०) पोतें, थैला।
ग़ोत—(ना० पु०) बुडी, गूढ विचार, ध्यान।

ग़ोता—( ना० पु० ) बुडी, मज्जन।
—खोर ( ना० पु० ) पाण बुड्या।
गोती—( वि० ) नातलग।
गोतिया—( ना० पु० ) परिवार, जात भाई, संबंधी।
गोतीत—( वि० ) इन्द्रियातीत।
गोथ—( ना० पु० ) नांगराचें जू।
गोद } ( ना० स्त्री ) मांडी, दत्तक घेणें।
गोदी }
गोदना—( स० क्रि० ) छेदणें, गोंदणें, देवी काढणें।
गोदाम—( ना० पु० ) भटार खाना, कोठार।
गोदोहनी—( ना० स्त्री० ) घूंचा, दुधेंडी ( हिं० ) धारेचें भांडें, दुधाचें भांडें।
गोधड़ा—( ना० पु० ) शाखा, डहाळी।
गोधा—( ना० स्त्री० ) चमड़े की ढाल ( हिं० ) धनुष्या-ची दोरी न लागावी म्हणून डाव्या हातावर बांधण्याचें चामडें।
गोधूली—( ना० स्त्री० ) } सायंकाल, संध्या।
गोधौरा—( ना० पु० ) }
गोन—( ना० स्त्री० ) "गोग" पहा।
गोपी—( ना० स्त्री० ) ग्वालिन ( हिं० ) गवळीण।
गोप, ग्वाल— ( ना०पु० ) गोआल, अहीर (हिं०) गवळी, गोपालक।
गोप्रकाण्ड—( ना० स्त्री० ) श्रेष्ठ गाय।
गोफन } ( ना० पु० ) गोफण, पाखरें उडविण्याची दोरी।
गोफिया }
गोवर—( ना० पु० ) गाईचें शेण।
—गनेश ( वि० ) लट्ट।
गोवरी—( ना० स्त्री० ) सारवण।
गोवरैला—
गोवरौंदा— } (ना० पु० ) शेणांतील किडा।
गोवरौंधा—
गोभी—( ना० स्त्री० ) कोबी; एक भाजी।
गोमूढ़—( वि० ) अत्यन्त अज्ञानी, मूर्ख।
गोरख़र—( ना० पु० ) एक जंगली गाढव।

गोरसहा—( वि० ) लहान मूल, गाईच्या दुधावर जगणारे।
गोरसी—( ना० स्त्री० ) दूध तापविण्याची शेगडी।
गोरा—( वि० ) सुंदर, पांढरा।
गोरू—( ना० पु० ) गाय बैल वगैरे शिंगाचें जनावर।
गोल—( वि० ) गोलाकार, मण्डलाकार।
गोलक—( ना० पु० ) संदूक, जार-पुत्र ( हिं० ) पेटी, विधवापुत्र; बुबुळ; धार्मिकफंडाची पेटी।
गोलंदाज—( ना० पु० ) गोळा फेकणारा, तोपखाना चाल-विणारा।
गोलई— } (ना० पु०) वाटोळेपणा, गोलपणा।
गोलर— }
गोली( ना० स्त्री० ) गोळी; बंदूकीची गोळी।
—मारना; गोळी घालणें।
गोवना—( स० क्रि० ) लपविणें; छपविणें।
गोशवारा—( ना० पु० ) हिशेबाची चिट्ठी।
गोश्त—( ना० पु० ) मांस।
गोष्ट—( ना० पु० ) कट; संगनमत कूट।
गोसा—( ना० पु० ) सूखा गोबर ( हिं० ) वाळलेलें शेण; शेणी।
गोसाईं—( ना० पु० ) ईश्वर; साधु।
गोसैंया—( ना० पु० ) परमेश्वर।
गोह—( ना० पु० ) सरडा;।
गोंहरा—( ना० पु० ) शेळी; गोवऱ्या।
गोहराना—( स० क्रि० ) पुकारना ( हिं० ) हाक मारणें; पाचारणें।
गोहार—( ना० पु० ) पुकार ( हिं० ) मदतीची याचना।
गोहूँ—( ना० पु० ) गहूं।
गोक्षुर—( ना० पु० ) 'गोखरू' पहा।
गौंडा—( ना० पु० ) गांव; रस्ता।
ग़ौग़ा—( ना० पु० ) शोर ( हिं० ) गडबड; दंगा; गोंगाट; गलका।
गौछई—( ना० स्त्री० ) शाखा; रोपटें; मुळी।
गौछी—( ना० पु० ) सूराख़ ( हिं० ) खांच; खळगा।

गौन्हार—( ना० पु० ) सुनेला घरीं आणतांना नवऱ्या मुला बरोबर जाणारी मंडळी।

गौना—लग्नानन्तर नवरीला सासुरवाडीं दुसऱ्यांदा आणणें, द्विरागमन।

गौपत्ता—( ना० पु० ) एक लता।

ग़ौर—( ना० पु० ) विचार; खोल विचार; बारीक लक्ष।

गौरव—( ना० पु० ) बडप्पन ( हिं० ) मोठेपणा।

गौरिका—( ना० स्त्री० ) आठ वर्षांची मुलगी।

गौरिया—ना० स्त्री० ) मिट्टी का हुक्का ( हिं० ) मातीचा हुक्का किंवा चिलीम।

गौरिला+—( ना० स्त्री० ) धरती ( हिं० ) पृथ्वी।

गौसाला—( ना० स्त्री० ) गोशाला; गोठा।

गौहान—( ना० पु० ) देश।

ग्याभिन—( वि० ) हामिला ( हिं० ) गाभिण।

ग्यारह—( वि० ) अकरा।

ग्वार—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें धान्य।

ग्वाल—, ग्वाला— (ना० पु०) अहीर (हिं०) गवळी; दूधवाला।

ग्वालिन—( ना० स्त्री० अहीरिन ( हिं० ) गोपी; गवळीण; दूधवाली।

---

## घ

घंगोलना—, घंघोरना—, घंघोलना— ( अ० क्रि० ) मलिन करणें; कलुषित करणें गढळ करणें, पानी को हिलाकर उसमें कुछ मिलाना, पानी को हिलाकर मैला करना।

घंघोर—( वि० ) मेघाच्छन्न, आभाळ आलेला, ढगाळ, अभ्राच्छादित

घंटा—( ना० पु० ) मोठें घडयाळ, घंटा।

घंटाली—( ना० स्त्री० ) लहान घंटा।

घंटी—( ना० स्त्री० ) झांगट।

घघरी—( ना० स्त्री० ), घघरा—( ना० पु० ) चंद्रकळ, चौकटी लुगडें।

घचाघच—( अ० ) ठसाठस, मचामच।

घट—( ना० पु० ) कलस; कुम्भ; घागर; देह; मन।

घटक—( ना० पु० ) योजक; दूत; मध्यस्थ।
—ता ( ना० स्त्री० ) योजकता )

घटती, घटन्त—( ना० स्त्री० ) कमी ( हिं० ) कमतरता, उणीव।

घटन—( ना० पु० ) वाकआ ( हिं० ) अढळणें, घडू-मयेणें।

घटना—( अ० क्रि० ) कमी होणें, उतरणें।

घटनीय—( वि० ) कमी करण्यासारखें।

घटवार, घटवाल—( ना० पु० ) घाटवाल; घाट॰ महसूल लेने वाला मल्लाह; केवट, घाट पर बैठकर दा॰ लेने वाला ब्राह्मण।

घटहा+—( ना० पु० ) पापी; अपराधी; दोषी; नदीच्या अलीकडून पलीकडे, घेऊन जाणारी, नांव घाल॰ ठेकेदार।

घटा—( ना० स्त्री० ) बादल ( हिं० ) मेघ ( वि० ) कमी झालेला; न्यून।

घटाटोप—( वि० ) अभ्राच्छादित; (ना० पु०) पालखीचें आच्छादन, पडदा; अभिमान।

घटाना—( स० क्रि० ) कमी करणें, न्यून करणें; अपमा॰ करणें।

घटाव—( ना० पु० ) कमीपणा; उणेंपणा; न्यूनता।

घटावना—( स० क्रि० ) कमी करविणें।

घटिक +—(ना० पु०) तास संपतांच घंटा वाजविणा॰

घटिका—( ना० स्त्री० ) घटका; मुहूर्त।

घटित—( वि० ) मिश्रित; संयुक्त; बनविलेला; रचलेला।

घटिया—( वि० ) सस्ता ( हिं० ) स्वस्त; अधम; निकृ॰ कमी किंमतचा।

घड़घड़ाना—( अ० क्रि० ) गडगडणें; गरजणें।

घड़त—( ना० स्त्री० ) सांचा; आकृति; घडण; कारागिरी

घड़ना—( स० क्रि० ) बनाना ( हिं० ) करणें; बनवि॰ घडणें; ठोकणें।

घड़ा—( ना० पु० ) गगरा ( हिं० ) घागर।

घड़िया—( ना० स्त्री० ) मातीचें लहान भांडें; गर्भाशय।

घड़ियाल—( ना० पु० ) मगर; घंटा; घाट।

घड़ियाली—( ना० पु० ) घंटा; वाजविणारा किंवा बनविणारा।

घड़ी—( ना० स्त्री० ) घड्याळ।

—भर में ( अ० ) क्षणार्धांत।

घड़ौंचा, घडौंवा—( ना० पु० ) घडवंचीं; तिपाई।

घण्टिका—( ना० स्त्री० ) पडजीभ।

घतिया—( ना० पु० ) क़ातिल ( हिं० ) घातक; नृशंस; क्रूरकर्मा।

घनगरज—( ना० पु० ) बादल की आवाज़ ( हिं० ) मेघगर्जना।

घनघनाना—( अ० क्रि० ) वाजविणें।

घनघोर—( वि० ) अभ्राच्छादित; ढगाळ।

घनज्वाला—( ना० स्त्री० ) विजली ( हिं० ) वीज।

घनसार—( ना० पु० ) कपूर; कापूर।

घनेरा—( वि० ) वहुत ( हिं० ) पुष्कळ।

घन्नई—( ना० स्त्री० ) घाघरींना लाकूड बांधून तयार केलेला ताफ़ा।

घपची—( ना० स्त्री० ) दोन हातांची मिठी।

घपला—( ना० पु० ) गोल माल ( हिं० ) गड़बड़।

घबराना—, घबड़ाना—( स० अ० क्रि० ) परेशान होना ( हिं० ) घाबरणें; घाबरविणें; क्षुब्ध होणें; गडबडणें; उद्विग्न होणें।

घबराहट—, घबडाहट—( ना० स्त्री० ) घाबरेपणा; गोंधळ; भीति; क्षोभ; धांदल।

घमण्ड—( ना० पु० ) गरूर ( हिं० ) दर्प; अभिमान; अहंकार; गर्व।

घमण्डी—( वि० ) अभिमानी; अहंकारी; दाम्भिक; गर्विष्ट।

घमरौल—( ना० स्त्री० ) भीड़ ( हिं० ) गर्दी; दाटी; कोलाहल।

घमस—( ना० स्त्री० ) उकाडा; गर्मी; उष्मा।

घमसान—, घमासान—( ना० पु० ) तुमुल लढाई, युद्ध।

घमाना+—( स० क्रि० ) उन्हाला दाखविणें; तापविणें; उन्हांत बसणें; उन्ह घेणें।

घरऊ—( वि० ) घरेल ( हिं० ) घरचा; घरा संबंधी।

घरत—( ना० स्त्री० ) बनावट ( हिं० ) घडण; आकार।

घरनई—( ना० स्त्री० ) "घन्नई" पहा।

घरना—( स० क्रि० ) बनाना ( हिं० ) घडणें; करणें; बनविणें।

घरनी—( ना० स्त्री० ) बायको; भार्या।

घरबार—( ना० पु० ) कुटुंब; परिवार।

घरबारी—( वि० ) गृहस्थ; कुटुंबी।

घराऊ—( वि० ) आपला; घरचा।

घराती—( ना० पु० ) बायकोचे नातलग।

घराना—( ना० पु० ) वंश; घराणें; कुटुंब।

घरामी—( ना० पु० ) छाने वाला ( हिं० ) शेकारणारा।

घरिक—( अ० ) एक घड़ी भर; थोडया वेळांत।

घरिया—( ना० स्त्री० ) मूस।

घरेला—, घरेलू—( वि० ) पालतू ( हिं० ) घरचा; पाळलेला; गृह संबंधी।

घरौंदा—, घरुआ—( ना० पु० ) लहान मुलांच्या खेळांतील; घर मुलींचा एक खेल।

घर्रा—( ना० पु० ) मृत्यु घटका; घोर।

घर्राटा—( ना० पु० ) घोरणें; घोरण्याचा आवाज।

घलुआ—, लुवा—( ना० पु० ) वह अधिक वस्तु जो खरीदार को उचित तौल के अतिरिक्त दी जाय; घेलौना।

घसन—( ना० स्त्री० ) रगड़ ( हिं० ) घर्षण; घासणें।

घसना—, घिसना—( अ० क्रि० ) रगड़ना ( हिं० ) घर्षण करणें; घासणें।

घसिटना—, घसीटना—( स० क्रि० ) फरपटणें; जमीनी वरून ओढत नेणें।

ढेरा—( ना॰ पु॰ ) भैंगा ( हिं॰ ) रीळ; दोरा गुंडाळ-ण्याचें रीळ।

ढेला—( ना॰ पु॰ ) ढेंकुळ।

—चौथ–( ना॰ स्त्री॰ ) भाद्रपद शुद्ध चतुर्थी ( चंद्र दर्शन त्या दिवशीं झाल्यास त्याचा दोष घाल-विण्या करितां दुसऱ्याच्या घरावर ढेंकुल (ढेला) मारून शिव्या खाण्याची कित्येक ठिकाणीं रूढी आहे, म्हणूनच हिंदी मध्यें याला 'ढेला चौथ' असें नांव पडलें आहे, अर्थात् याची प्रतिक्रिया म्हणून किंवा यांतील मौज अथवा मर्म जाणून त्या दिवशीं उलट शिव्या देण्याचें कोणी ही शक्य तों टाळतच असतो।

ढेना+—( अ॰ क्रि॰ ) नष्ट होणें, नाहींसे होणें।

ढैया—( ना॰ पु॰ ) २½ शेराचें माप।

—ढेकर—( वि॰ ) जन शून्य, उजाड़।

ढोआ—( ना॰ पु॰ ) भेंट ( हिं॰ ) उपहार, भेंट, नज-राणा।

ढोंग—( ना॰ पु॰ ) पाखंड ( हिं॰ ) कपट; धूर्तता; आव-डम्बर; ढोंग।

—धत्तूर—( ना॰ पु॰ ) ढोंग।

—बाजी—( ना॰ स्त्री॰ ) लुच्चेगिरी।

ढोंगी—( वि॰ ) पाखण्डी ( हिं॰ ) धूर्त, लुच्चा।

ढोंगिया—( वि॰ ) धोखेबाज़ ( हिं॰ ) फसव्या।

ढोंचा—( ना॰ पु॰ ) साडेचारीचा पाढा।

ढोंड—( ना॰ पु॰ ) बीज कोश, पडकीं किंवा उध्वस्त घरें।

ढोक+—( ना॰ स्त्री॰ ) बन्दगी ( हिं॰ ) प्रणाम; अभि-वादन; नमस्कार; दंडवत, ( राजपुतान्यांत हा शब्द नमस्कार या अर्थीं प्रचारांत आहे )।

ढोकना—( स॰ क्रि॰ ) निकलना ( हिं॰ ) गिळणें; पिणें; गट्ट करणें, ढोसणें।

ढोका—( ना॰ पु॰ ) दगडाचा मोठा तुकड़ा, फुटका दगड़।

ढोटा—( ना॰ पु॰ ) सन्तान ( हिं॰ ) पुत्र; मुलगा, बालक, अपत्य, वंशज।

ढोना—( स॰ क्रि॰ ) उठा कर ले जाना ( हिं॰ ) घेऊन जाणें, वाहणें, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणें।

ढोर—( ना॰ पु॰ ) गाय, भैंस वगैरे जनावरें, पशु, गुरें।

ढोरा—( ना॰ पु॰ ) एक प्रकारचा किडा।

ढोरी—( ना॰ स्त्री॰ ) ताप, लय, तंद्री, संवय, गुंगी, गुह्यपणा, निमग्नता, तत्परता, तल्लीनता, ग्रस्तता, सन्निवेश।

ढोल—( ना॰ पु॰ ) ढोलक ( हिं॰ ) ढोलगें।

ढोलक—( ना॰ पु॰ ) लहान ढोलगें।

ढोलकिया—( ना॰ पु॰ ) ढोल वाजविणारा।

ढोलकी—( ना॰ स्त्री॰ ) लहान ढोलगें, स्त्रियांनीं वाज-विण्याचा डफ।

ढोलना—( ना॰ पु॰ ) जेवर ( हिं॰ ) ढोलण्याच्या आकाराचें एक यन्त्र।

ढोलिया—( ना॰ पु॰ ) ढोल वजानेवाला।

ढोली—( ना॰ स्त्री॰ ) २०० पानाचा गुडा।

ढोलैत—( ना॰ पु॰ ) "ढोलकिया" पहा।

ढौंचा—( ना॰ पु॰ ) ढोंचा पहा।

ढौकन—( ना॰ पु॰ ) मोह, लालूच, दाखवून कांम करवून घेणें।

ढौरी—( ना॰ स्त्री॰ ) "ढोरी" पहा।

—०—

# त

तअज्जुब —( ना॰ पु॰ ) अचरज ( हिं॰ ) आश्चर्य।

तअल्लुक—( ना॰ पु॰ ) संबंध ( हिं॰ ) संबंध, नातें; आस्था; अगत्य।

तअल्लुका—( ना॰ पु॰ ) इलाक़ा ( हिं॰ ) प्रांत, प्रान्त-चा भाग।

दार—( ना॰ पु॰ तालुकदार।

तईं—( अ॰ )—( तक ) (हिं॰) पर्यन्त करितां, कडे पावेतों।

अपने—स्वतः।

तंग—( वि॰ ) चुस्त ( हिं॰ ) घट्ट, आवळलेला, दुःखी, अपुरा, कोता।

—दिल—( वि० ) कृपण; कद्रू ।

—दस्त—( वि० ) दरिद्री, गरीब ।

- दस्ती—( ना० स्त्री० ) दारिद्र्य, गरीबी ।

तंगी—( ना० स्त्री० ) चुस्ती ( हिं० ) अडचण, गरीबी, ओढाताण; दारिद्र्य, कष्ट ।

तई—( ना० स्त्री० ) लोखंडी लहान कढई ।

तऊ+—( अ० ) तो भी ( हिं० ) तथापि, तदपि ।

तक—( अ० ) पर्यन्त, पावेतों ।

( ना० पु० ) पासंग, तागडीचें पारडें ।

तकना—( अ० क्रि० ) ताक लगाना ( हिं० ) टक लावणें ।

तक़दीर—( ना० स्त्री० ) भाग ( हिं० ) भाग्य; नशीब; भागधेय, भोक्तृत्व ।

तकमील, तकमिला—( ना० पु० ) पूर्ती ( हिं० ) पूर्ती, पूर्णता ।

- —दस्तावेज़ या तमस्सुक—(ना०पु०) कराराप्रमाणें वागणें ।

तकरार—( ना० स्त्री० ) झगड़ा ( हिं० ) भांडण ।

तकरारी—( वि० ) झगड़ालू ( हिं० ) भांडखोर ।

तकरीर—( ना० स्त्री० ) बहस ( हिं० ) व्याख्यान; विवेचन, संभाषण, संवाद ।

तकला—( ना० पु० ) तकुआ, चरख्यांतील सूत कातणारी सुई ।

तक़लीफ़—( ना० स्त्री० ) कष्ट ( हिं० ) दुःख, कष्ट, गैरसोय ।

तकल्लुफ—( ना० पु० ) व्यवहार, वागण्याचा शिष्टाचार, बे—( वि० ) परिचयाचा; साधा भोळा ।

तकवाहा+—( ना० पु० ) पहरुआ ( हिं० ) पहारेकरी, रक्षक; चौकीदार, टक लावणारा ।

तकवाही—( ना० स्त्री० ) पहाणें, निरीक्षण, देख-रेख चौकीदारीण ।

तक़सीम—( ना० स्त्री० ) विभाग ( हिं० ) भाग, पोटभाग, वांटणी ।

तक़सीर—( ना० स्त्री० ) कुसूर ( हिं० ) अपराध, चूक, दोष ।

—वार—( वि० ) अपराधी, दोषी ।

तक़ाज़ा—( ना० पु० ) हक्काची, मागणी ।

तकाना—( स० क्रि० ) नेम धरणें; दृष्टी ठेवणें ।

तक़ावी—( ना० स्त्री० ) शेतकऱ्यांना दिलेली आर्थिक मदत ।

तकार+—(ना० पु०) दही घुसळण्याची रवी ।

तकि+—( अ० ) पाहून ।

तकिया—( ना० पु० ) उसें, उशी, आधार, फकीरानें पुरलेली जागा ।

—कलाम—( ना० पु० ) एकाद्याचा बोलण्या मध्यें वारंवार व निरर्थक येणारा शब्द, बोलण्याची लकब, पाद-पूरक, शब्द, पालुपद ।

तकीनी—( ना० स्त्री० ) छोटा उसीसा ( हिं० ) लहान तक्या ।

तकुआ—( ना० पु० ) चरखा, चाती ।

तखड़ी—, तखरी— ( ना० स्त्री० ) तराजू, तागडी ।

तख्त—( ना० पु० ) राज्यासन ।

—नशीन—( वि० ) राज्य करणारा ।

—नशीनी—( ना० स्त्री० ) राज्यावर येणें ।

तख़्ता—( ना० पु० ) फळी, बाक, पाटी, कागदाचा एक तुकड़ा ।

तख़्ती—( ना० स्त्री० ) मुलांची लिहिण्याची पाटी ।

तख़्फ़ीफ—( ना० स्त्री० ) कमी ( हिं० ) कमी करणें ।

तख़मीनन—( अ० ) अंदाज़न ( हिं० ) अदमासें, जवळ जवळ, अंदाजानें ।

तख़मीना—( ना० पु० ) अन्दाजा ( हिं० ) अंदाज ।

तर्खान+—( ना० पु० ) बढई (हिं०) सुतार ।

तगना—( अ० क्रि० ) सीना ( हिं० ) शिवणें; टाका घालणें, दंड घालणें ।

तगर—( ना० पु० ) एक वृक्ष विशेष ।

तगाई—( ना० स्त्री० ) सिलाई ( हिं० ) शिवणावळ ।

तगाना—( स० क्रि० ) "तगना" चें प्रयोजक रूप ।

तग्गी—( ना० स्त्री० ) तागा ( हिं० ) सूत ।

तचना+—( अ० क्रि० ) संतप्त होणें, दु:खी होणें, तापणें, अडचणींत असणें ।

तचा—( ना० स्त्री० ) चाम ( हिं० ) चामड़े, त्वचा ।

तचाना—( स० क्रि० ) "तचना" चें प्रयोजक रूप ।

तज—( ना० पु० ) एक वृक्ष विशेष ।

तजन्न—( ना० पु० ) परित्याग, त्याग ।

तजना—( स० क्रि० ) छोड़ना ( हिं० ) सोडणें, त्याग; करणें; संबन्ध, तोडणें ।

तजरुबा, तजरुबत—( ना० पु० ) पारख, प्रयोग; अनुभव; संधी; अजमाव, कसोटी ।

—कार—( वि० ) अनुभवी ।

—कारी—( ना० स्त्री० ) अनुभव ।

तजवीज़—( ना० स्त्री० ) राय, फैसला ( हिं० ) मत, निकाल; निवाडा ।

तट—( ना० पु० ) किनारा ।

तड़—( ना० पु० ) तरफ़ ( हिं० ) बाजू; माग ।

तड़कना—( अ० क्रि० ) टूटना ( हिं० ) तुटणें; फुटणें; रागाला येणें ।

तड़का—( ना० पु० ) बिहान; भिनसार ( हिं० ) सकाळ पहाट; प्रात: काल ।

तड़तड़ाना—( अ० क्रि० ) रीसाना ( हिं० ) रागावणें, चिडणें ।

तड़प—( ना० स्त्री० ) चमक, उडी, स्फुरण, विजेची, चकाकी ।

—दार—( वि० ) चकचकीत, स्फूर्तीचा ।

तड़पना—( अ० क्रि० ) परेशान होना ( हिं० ) दु:खाणें तडफडणें, इवळणें ।

तड़पाना—( स० क्रि० ) दु:ख देणें ।

तड़पीला—( वि० ) जल्द बाज़ ( हिं० ) स्फूर्तीचा प्रभावशाली; तड़फदार ।

तड़फ—( ना० स्त्री० ) "तड़प" पहा ।

तड़फना—( अ० क्रि० ) "तड़पना" पहा ।

तड़ा—( ना० पु० ) द्वीप ।

तड़ाक—( वि० ) चमत्कारी, दीप्तिमान ।

—पड़ाक—( अ० ) अति शीघ्र, अत्यंत जलदीनें ।

तड़ाका—( ना० पु० ) किनारा, नदीचा तीर ।

तड़ाग—( ना० पु० ) हौज, तालाब, ( हिं० ) हौद, तलाव, तळें ।

तड़ाड़ा—( ना० पु० ) जोरानें पाणी पडणें ।

तड़ावा—( ना० पु० ) दर्प, अभिमान, डौल, कपट, दगा ।

तड़ित्—( ना० स्त्री० ) विद्युत, वीज ।

—पति—( ना० पु० ) ढग, मेघ ।

—वान्—( ना० पु० ) मेघ, ढग ।

—समाचार—( ना० पु० ) टेलिग्राफ ।

तड़िया—( ना० स्त्री० ) समुद्र तटचा वारा ।

तड़ी—( ना० स्त्री० ) दगा, कपट, चपेटा ।

ततबीर—( ना० स्त्री० ) तदबीर ( हिं० ) उपाय ।

ततरी+—, तेतरी— ( ना० स्त्री० ) खिलाड़ी लड़की ( हिं० ) खेळकर मुलगी, एक वृक्ष विशेष ।

ततहरा—, ततैरा— ( ना० पु० ) पाणी तापविण्याचा हंडा ।

तताड़ी—( ना० स्त्री० ) उष्णवाऱ्याची झळ ।

ततार—( ना० पु० ) शेक, गरमपाण्यानें, शेकणें, धोळ्याचें औषध ।

ततारना—( स० क्रि० ) शेकणें, शेक देणें ।

तताल+—( वि० ) धोखे बाज ( हिं० ) कपटी, लुच्चा ।

तताली—( ना० स्त्री० ) धोखा ( हिं० ) कपट, दगा ।

तत्ता+—( वि० ) गर्म ( हिं० ) उष्ण, गरम ।

तत्तार्थंबो—( ना० पु० ) दम-दिलासा, बहलाव, बीच बचाव ( हिं० ) ढवळा ढवळ, एकाद्या कामांत उगाच, हात घालणें ।

तदबीर—( ना० स्त्री० ) उपाय, व्यवस्था, धोरण ।

तदारुक+—( ना० पु० ) सज़ा ( हिं० ) शिक्षा; उपाय, इलाज ।

तन—( ना० पु० ) जिस्म ( हिं० ) शरीर, तनु ।

—तनहा—( वि० ) एकटा, एकांतवासी ।

मन से—( अ० ) मनापासून ।

तनक—( वि० ) थोड़ा ( अ० ) थोड़ा ।

तनकीह—( ना० स्त्री० ) जांच, खोज ( हिं० ) शोध, चवकशी ।

तनख़्वाह—( ना० स्त्री० ) वेतन; पगार ।

—दार—( ना० पु० ) पगारदार ।

तनना—( स० क्रि० ) "तन्ना" पहा ।

तनहा—( वि० ) अकेला ( हिं० ) एकटा, एकाकी ।

तनहाई—( ना० स्त्री० ) एकान्तता, एकटेपणा ।

तनाज़ा—( ना० पु० ) झगड़ा ( हिं० ) भांडण ।

तनापा+—( ना० पु० ) जवानी ( हिं० ) तारुण्य; तरुणपणा ।

तनिक—( वि० ) "तनक" पहा ।

तनिया+—( ना० स्त्री० ) लंगोटी, कौपीन, काछा ।

तनिष्ट—( वि० ) क्षुद्र, क्षीण, अत्यल्प ।

तनी—( ना० स्त्री० ) अंगरख्याचा बंद ।

तन्त—( ना० पु० ) जरूरी; व्यवस्था, आणी बाणीची वेळ, प्रसंग ।

तन्तना+—( ना० पु० ) गर्व, अभिमान; थाट, पोकळ राग, वांझ राग ।

तन्तनाना—( अ० क्रि० ) तणतणणें, रागानें बडबडणें ।

तन्तनाहट—( ना० स्त्री० ) ताण बसणें, दुखणें ।

तन्ति—( ना० पु० ) जुलाहा ( हिं० ) विणकर, कोष्टी । गाय, गौ ।

तन्त्रि—( ना० स्त्री ) निद्रा, झोंप, डुलकी ।

तन्बी—( ना० पु० ) गायक ( हिं० ) गवई, बीन वगैरा; तंतु वाद्य ।

तन्दिही—( ना० स्त्री० ) लगावट ( हिं० ) लक्ष, लय-परिश्रम; मेहनत ।

तन्दुरुस्त—( वि० ) निरोगी, स्वस्थ, क्षेम

तन्दुरुस्ती—( ना० स्त्री० ) स्वास्थ्य ।

तन्दूर—( ना० पु० ) तवा; भट्टी ।

तन्द्रालु—( वि० ) सुस्त, आळशी ।

तन्ना—( अ० क्रि० ) फैलाना ( हिं० ) पसरणें ।

तन्नना—( अ० क्रि० ) सीधा होना ( हिं० ) सरल होणें, कल येणें ।

तन्नाना—( अ० क्रि० ) अडून बसणें, मन कठोर करणें, रागाला येणें ।

तप—( ना० स्त्री० ) ज्वर, ताप; तपस्या ।

तपकना—( अ० क्रि० ) धड़कना ( हिं० ) ठणकणें ।

तपन—( ना० पु० ) सूर्य ।

तपना—( अ क्रि० ) तेजस्वी होणें, रागाला येणें, प्रभावान होणें ।

तपरी—( ना० स्त्री० ) टीला ( हिं० ) लहान वारुळ, लहान टेकडी ।

तपसाल—( ना० पु० ) तपस्वी, तपी ।

तपाना—( स० क्रि० ) उष्ण करणें, तापविणें ।

तपिश—( ना० स्त्री० ) गर्मी ( हिं० ) उष्णता ।

तफ़सील—( ना० पु० ) विवरण; बारीक सारीक सर्व गोष्टी ।

—वार—( अ० ) समग्र, काना कोपरा सहित ।

तफ़ावत—( ना० पु० ) फ़र्क़ ( हिं० ) अन्तर; फरक, भिन्नता ।

तब—( अ० ) उस समय ( हिं० ) त्या वेळी तेव्हां ।

तक—( अ० ) तो पर्यन्त ।

—भी—( अ० ) तथापि, तरी ।

—से—( अ० ) त्यावेळी पासून ।

—ही—( अ० ) त्याच वेळी ।

तबदील—( ना० स्त्री० ) परिवर्तन (हिं०) बदल, फाड, फेर ।

तबलची—( ना० पु० ) तबला वाजविणारा ।

तबाख़ीर— } ( ना० स्त्री० ) तवकील ।
तबाशीर— } तवकीर ।

तबाह—( वि० ) बरबाद ( हिं० ) नष्ट, वाईट, टाकाऊ, खराब ।

—हाल—( वि० ) नष्ट किंवा उजाड ।

तबाही—( ना० स्त्री० ) बरबादी ( हिं० ) नाश ।

तबीयत—( ना० स्त्री० ) दिल ( हिं० ) मन, स्वभाव, वृत्ति, प्रकृति, चित्त ।

तबीब—( ना० पु० ) हकीम ( हिं० ) वैद्य ।

तवेला—( ना० पु० ) घोडे बांधण्याची जागा ।
तवै+—( अ० ) तब ( हिं० ) तेव्हां ।
तभी—( अ० ) त्याच वेळी ।
तमंचा—( ना० पु० ) पिसतौल ( हिं० ) लहान बंदूक; पिस्तुल ।
तमक—( ना० स्त्री० ) दर्प, जोर, उद्वेग, क्रोध ।
तमकना—( अ० क्रि० ) रागावणें, रागानें लाल होणें ।
तमका+—( ना० पु० ) अत्यंत उष्णता ।
तमग़ा—( ना० पु० ) पदक, सनद ।
तमतमाना—( अ० क्रि० ) चकाकणें लालबुंद होणें ।
तमन्ना—( ना० स्त्री० ) अर्ज ( हिं० ) विनंति, इच्छा ।
तमस्सुक—( ना० पु० ) कर्जरोखा, दस्तावेज ।
तमस्विनी—( ना० स्त्री० ) रात ( हिं० ) रात्र ।
तमाखू—( ना० पु० ) सुरती ( हिं० ) तंबाखू ।
तमा—( ना० स्त्री० ) लालच (हिं०) लालूच, लोभ; मोह ।
तमाचा—( ना० पु० ) चपत ( हिं० ) थप्पड ।
तमादी—( ना० स्त्री० ) मियाद ( हिं० ) मर्यादा, काळ मर्यादा ।
तमाम—( वि० ) सर्व, शेवट, शेवटचा ।
तमामी—( ना० स्त्री० ) पूर्ति, समाप्ति ।
तमाशा—( ना० पु० ) मेळा; नाटक, नाटक, नाच; तमाशा ।
—गाह—( ना० पु० ) नाटक गृह ।
तमाशी—( ना० पु० ) तमाशा पहाणारा ।
तमीज—( ना० स्त्री० ) विवेक, ओळख, बुद्धि ।
—दार—( वि० ) बुद्धिवान, शिष्ठ ।
तमूरा—( ना० पु० ) तंबोरा, सतार ।
तमोलिन—( ना० स्त्री० ) तांबोळीण ।
तमोला—( ना० पु० ) तांबोळी ।
तम्बू—( ना० पु० ) खीमा ( हिं० ) तंबू ।
तर—( वि० ) नम ( हिं० ) ओल दलदल ।
—बतर—( अ० ) अगदीं ओला ।
तरई—( ना० स्त्री० ) तारा, चांदणी ।
तरक—( ना० स्त्री० ) तुळी; फळी; ( ना० पु० ) तर्क विचार ;
तरकना—( अ० क्रि० ) तर्क करणें; अनुमान करणें ।
तरकारी—( ना० स्त्री० ) साग ( हिं० ) भाजी ।
तरकी—( ना० स्त्री० ) कानांतील दागिना ।
तरकीब—( ना० स्त्री० ) उपाय; योजना ।
तरक्की—( ना० स्त्री० ) उन्नति; बाढ; बढती ।
तरग़ीब—( ना० स्त्री० ) लालूच; उत्तेजन ।
तरखा—( ना० स्त्री० ) पाण्याची ओढ; पाण्याचा जोराचा प्रवाह ।
तरण—( ना० पु० ) नांव; उद्धार; बचाव; स्वर्ग; मुक्त होणारा ।
तरणी—( ना० स्त्री० ) किश्ती ( हिं० ) नाव ।
तरजुई—( ना० स्त्री० ) छोटी तराजू ( हिं० ) लहान ताजवा ।
तरजुमा—( ना० पु० ) अनुवाद ( हिं० ) भाषांतर ।
तरतरा—( ना० पु० ) एक प्रकारचें भोजन ।
तरन—( ना० पु० ) "तरण" पहा ।
तरना—( अ० क्रि० ) पार होणें; तरून जाणें; उद्धार होणें ।
तरतराना—( अ० क्रि० ) शेखी हाँकना ( हिं० ) थापा मारणें; घमेंड करणें ।
तरन्ती—( ना० स्त्री० ) नौका, नांव ।
तरपन—( ना० पु० ) तर्पण; तृप्ति, मनाची प्रसन्नता ।
तरफ़—( ना० स्त्री० ) ओर ( हिं० ) बाजू, पक्ष ।
—दारी—( ना० स्त्री० ) पक्षपात; पक्षाभिनिवेश ।
तरफ़ैन—( ना० पु० ) दोन्हीं पक्षकिंवाबाजू ।
तरबतर—( वि० ) सराबोर ( हिं० ) भिजलेला ।
तरल—( वि० ) अव्यवस्थित, अस्थिर ।
तरलाई—( ना० स्त्री० ) चंचलता, द्रवत्व ।
तरवरिया—( ना० पु० ) खड्गधारी; तलवार चालविणारा ।
तरवार+—( ना० स्त्री० ) शमशेर ( हिं० ) तरवार; खड्ग ।
तरस—( ना० स्त्री० ) तट, तीर, रोग, वेग, बल ।
तरस—( ना० पु० ) रहम ( हिं० ) दया ।

तरसना—( अ० क्रि० ) अत्यंत इच्छा करणें; उत्कंठित होणें; दया करण्याची इच्छा असतांही न करूं शकणें, निराशा सहन करणें ।

तरसाना—( स० क्रि० ) "तरसना" चें प्रयोजक ।

तरसों—( अ० ) तेरवां

तरह—( ना० स्त्री० ) भांति ( हिं० ) प्रकार ।

तलहटी- } ( ना० स्त्री० ) डोंगराचा पायथा ।
तराई— } सखल भूमि ।

तराजू—( ना० स्त्री० ) तागडी, तुला ।

तरान+—( ना० पु० ) वसूल, वर्गणी, कर ।

तराना—( स० क्रि० ) वाचविणें, पाठ करविणें, एक प्रकार का चलता गाना जैसे ताना दिर ताना दिर ताना ना ना आदि ।

तराबोर—( वि० ) सराबोर ( हिं० ) भिजलेलें ।

तरार—( वि० ) तेज़, जल्द ( हिं० ) जलदीचा ।

तरारा—( ना० पु० ) जल्दी ( हिं० ) घाई, वेग, उछाळ, छलांग, कूद ।

तरावट—( ना० स्त्री० ) ठंढक, नमी ( हिं० ) थंडी, ओल, दमटपणा ।

तरास—( ना० पु० ) त्रास, भय, शंका, तृष्णा ।

तराशना—( स० क्रि० ) कापणें, तासणें; आकार देणें ।

तरी—( ना० स्त्री० ) तळ, नांव, ओल ।

तरीक़ा—( ना० पु० ) प्रकार, रीत, चाल ।

तरुणाई— } ( ना० स्त्री० ) जवानी ( हिं० ) तारुण्य ।
तरुनाई— }

तरे+—( वि० ) नीचे ( हिं० ) खाली ।

तरेड़ा+—( ना० पु० ) पाणी पडत रहाणें ।

तरैया—( ना० स्त्री० ) सितारा ( हिं० ) तारा ।

तर्कीब—( ना० स्त्री० ) "तरकीब" पहा ।

तर्छट—( ना० स्त्री० ) तलछट ( हिं० ) गाळ, गदळ ।

तर्ज़—( ना० स्त्री० ) तरह ( हिं० ) तऱ्हा, रीति, ढव, शैली, ढंग ।

तर्जुमा—( ना० पु० ) "तरजुमा" पहा ।

तर्तपता—( वि० ) स्निग्ध, अति गुळगुळीत ।

तर्तराना—( अ० क्रि० ) रागावणें; घमेंड करणें ।

तर्तराहट—( ना० स्त्री० ) राग, क्रोध, घमेंड ।

तर्तीब—( ना० स्त्री० ) सिलसिला ( हिं० ) व्यवस्था वर्गीकरण ।

तर्ब—( ना० स्त्री ) वाद्याचा लय, स्वर, ध्वनि ।

तर्मीम ( ना० स्त्री० ) सुधारणा; पुस्ती; उपसूचना; कमी ज्यास्त ।

तर्राना—( अ० क्रि० ) गुस्सा होना ( हिं० ) रागावणें, बड बडणें; चिडणें ।

तर्रारा—( ना० पु० ) तेज़ी ( हिं० ) वेग; शीघ्रता ।

तर्स—( ना० पु० ) "तरस" पहा ।

तर्वरिया—( ना० पु० ) खड्गधारी ।

तल—( ना० पु० ) नीचाई ( हिं० ) खोली; तक पायाचा तळवा ।

तलक—( अ० ) तब तक ( हिं० ) तों पर्यन्त ।

तलछट—( ना० स्त्री० ) घाण; गंदक ।

तलपट—( वि० ) नष्ट भ्रष्ट, + हिशेब पत्रक ।

तलफना—( अ० क्रि० ) परेशान होना ( हिं० ) बेचैन होणें; व्याकुल होणें ।

तलब—( ना० स्त्री० ) तनख्वाह ( हिं० ) वेतन; पगार ।

तलबाना —( ना० पु० ) समन वगैरे घेऊन जाण्याकरितां बेलिफाला दिली जाणारी फी किंवा वेतन ।

तलमाना—( अ० क्रि० ) "तलफना" पहा ।

तलमली—( ना० स्त्री० ) बेसबरी ( हिं० ) तळमळ ।

तलवरिया—( ना० पु० ) 'तर्वरिया' पहा ।

तलवा—( ना० पु० ) "तल" पहा ।

तला—( ना० पु० ) पेंदा ( हिं० ) तळ; जोड्याचा तळ; पडदा ।

तलातल—( ना० पु० ) चौथें पाताळ ।

तलाश—( ना० स्त्री० ) खोज ( हिं० ) शोध; हुडकून काढणें, तपास ।

तलाशी—( ना० स्त्री० ) खोजी ( हिं० ) झडती ।

तलुआ—( ना० पु० ) "तलवा" पहा ।

तले—( वि० ) नीचे ( हिं० ) खालीं ।

तलैया—( ना० स्त्री० ) लहान तळें ।
तल्प—( ना० पु० ) शय्या; पलंग; आंथरूण ।
कीट—( ना० पु० ) ढेंकूण ।
तवा—( ना० पु० ) तवा ।
तवाना ( स० क्रि० ) तापविणें किंवा वितळविणें ।
तवायफ़—( ना० स्त्री० ) नाचणाऱ्या वेश्या ।
तवारिख़—( ना० स्त्री० ) तारीख; इतिहास, बखर ।
तश्तरी—( ना० स्त्री० ) } लहान थाळी,
तश्त—( ना० पु० ) } लहान भांडें ।
तशरीफ़—( ना० स्त्री० ) हजीरी; विद्यमानता,
तसदीक़—( ना० स्त्री० ) सही ( हिं० ) समर्थन ।
तलफ़िया—( ना० पु० ) निश्चय, फैसला (हिं०) निश्चय, निकाल, निर्णय ।
तसर—( ना० पु० ) एक प्रकारचा रेशमी कपड़ा ।
तसल—( ना० पु० ) तसराणें ।
तसलीम—( ना० स्त्री० ) नमस्कार, स्वीकार, कबूली ।
तसल्ली—( ना० स्त्री० ) आसूदगी ( हिं० ) समाधान, शांति, सुख, खुषी ।
तसमा—(ना० पु०) चामडया चा तुकडा, चमडयाची पट्टी ।
तसवीर—( ना० स्त्री० ) चित्र; तसवीर ।
तह—( ना० स्त्री० ) पृष्ठ भाग, तळ चुणी, पट्टी, निरी ।
—बतह—करना (स० क्रि०) एकावर एक रचणें ।
—खाना—( ना० पु० ) तळघर ।
तहस नहस—( वि० ) बरबाद ( हिं० ) नष्ट, नाश पावलेला, वाटोळें ।
तहसील—( ना० स्त्री० ) वसूली, खजीना ।
—दार—(ना०पु०) कर वसूल करणारा ।
तहाँ—( अ० ) तेथें, जहाँ—( अ० ) चोहोंकडे ।
तहाना—( स० क्रि० ) पर्त करना ( हिं० ) गुंडाळणें, झाकणें, मिटणें, लपेटणें, मढविणें ।
तहियां + ( अ० ) त्या दिवशी ।
तहीं—( अ० ) वहीं ( हिं० ) तेथें, तेथेंच ।

ताईं—+ ( अ० ) नाईं ( हिं० ) प्रमाणें ।
तांगा—( ना० पु० ) घोड्याची गाडी ।
ताँत—( ना० स्त्री० ) तांत, चमडयाची दोरी ।
ताँती—( ना० पु० ) जोलाहा ( हिं० ) विणकर ।
तांबा—( ना० पु० ) तांबें, एक धातु ।
ताई—( ना० स्त्री० ) चाची ( हिं० ) काकी ।
ताऊ—( ना० पु० ) ताया ( हिं० ) बापाचा वडील भाऊ
ताक़—( ना० पु० ) फली, कोनाडा, पुस्तकें ठेवण्याची फळी, तक्ता+विषम संख्या, अधिक संख्या ।
ताक—( ना० स्त्री० ) नज़र ( हिं० ) दृष्टी, नजर अवलोकन ।
ताक़त—( ना० स्त्री ) बल, शक्ति, योग्यता सामर्थ्यं,
—वर—( वि० ) सामर्थ्यवान ।
ताकना—( अ० क्रि० ) देखना ( हिं० ) पहाणें, टक लावणें ।
ताकीद—( ना० स्त्री० ) सूचना, कडकपणा, खरमरेपण, हुकूम, आज्ञा ।
ताकीदी—( वि० ) जरूरीचे, आग्रहाचे ।
तागना—( स० क्रि० ) शिवणें, दोरा घालणें, टांका घालणें सुई मध्यें दोरा घालणें ।
ताग } ( ना० पु० ) सूज; दोरा,
तागा }
ताज़गी—( ना० स्त्री० ) नवीनता, सरळपणा, चांगुलपणा ।
ताज़ा—( वि० ) नवा० ताजा, हिरवा, सुखी, नवीन ।
ताज़ी—( ना० स्त्री० ) कुत्र्याची किंवा घोड्याची एक जात ।
ताज़िया—( ना० पु० ) कागज़ की कब्र ( हिं० ) डोला, कागदाची कबर ।
ताज़ीम—( ना० स्त्री० ) इज़्ज़त ( हिं० ) अब्रू, मान, आदर ।
ताड़ना—( स० क्रि० ) समझना, सजा देना ( हिं० ) कल्पना करणें, दंड देणें, समजणें ।

तातार्थेई—( ना० स्त्री० ) नाचाचा एक बोल।
तातील—( ना० स्त्री० ) छुट्टी ( हिं० ) सुटी।
तादाद—( ना० स्त्री० ) संख्या (हिं०) संख्या, गणति, मोजदाद।
तान—( ना० स्त्री० ) तान, लकेर, आवाज।
तानना—( स० क्रि० ) फैलना ( हिं० ) ताणणें, पसरविणें, विस्तार करणें।
तंबू—( स० क्रि० ) तंबू उभारणें।
ताना—( ना० बू० ) टोमणा, निंदा, दोष, सुताचा ताणा।
ताना—( स० क्रि० ) गर्म करना ( हिं० ) तापविणें, वितळविणें, कसोटी पहाणें।
तानारीरी—( ना० स्त्री० ) साधारण गाणें।
ताना—( ना० पु० ) संताप, उष्णता, ज्वाल, मनाची पीड़ा, ज्वर।
ताप तिल्ली—(ना० स्त्री०) पाणथरी; प्लीहा।
तापना—( अ० क्रि० ) उन्हानें तापणें, शेक घेणें।
ताफ़ता—( ना० पु० ) धूपछाँह ( हिं० ) एक प्रकार चा रेशमी कपड़ा।
ताब—( ना० स्त्री० ) गर्मी ( हिं० ) उष्णता, शक्ति।
ताबड़तोड़—( अ० ) एका मागून एक, सतत।
ताबे—( ना० पु० ) वश ( हिं० ) ताबा।
—दार—( वि० ) आज्ञाधारक, राजनिष्ठ।
—दारी—( ना० स्त्री० ) आज्ञा धारकता, परावलंबन, कबूली।
तामझाम—( ना० पु० ) एक प्रकार ची पालखी।
तामस—( ना० पु० ) क्रोध, अंधेर।
तामा—( ना० पु० ) ताबा ( हिं० ) तांबें।
तामह—( अ० ) त्यांत; तेथें।
तामील—( ना० पु० ) पूर्ति ( हिं० ) पूर्णता करणें, कामाची सांगता, नोकरी, सेवा।
तामीली—( ना० स्त्री० ) आज्ञा पालन, तामील देशाची भाषा, वेलिफाला दिलेली खुषी।
ताम्बूलिक—( ना० पु० ) तमोली ( हिं० ) तांबोळी।
तायफ़ा—( ना० पु० ) वेश्या समुदाय।
ताया—( ना० पु० ) पिता के बड़े भाई ( हिं० ) चा वडील भाऊ।
तार—( ना० पु० ) दोरा, तार, वाद्याची तार।
—घर ( ना० पु० ) टेलिग्राफ आफिस।
तारण—( ना० पु० ) नाव, मुक्ति।
तारना—( स० क्रि० ) पापातून मुक्त करणें, करणें।
तारपतार—( वि० ) × तितर बितर ( हिं० ) छिन्न भिन्न
तारा—( ना० पु० ) सितारा ( हिं० ) तारा, नक्षत्र।
—पथ—( ना० पु० ) आकाश, नभ।
तारीफ़—( ना० स्त्री० ) प्रशंसा, स्तुति, वर्णन, व्याख्या
तारीफी—( वि० ) प्रशंसनीय।
ताल—( ना० पु० ) तलाव, टाळी, ताल, ताडाचें झाड, छद्दू, टाळी देणें।
तालाब— } ( ना० पु० ) हौज़ ( हिं० ) हौद।
तलाव— } तडाग, तळें।
तालिब इल्म—( ना० पु० ) विद्यार्थी।
तालिब इल्मी—( ना० स्त्री० ) विद्योपार्जन।
ताली—( ना० स्त्री० ) कुंजी ( हिं० ) किल्ली, टाळी।
तालीम—( ना० स्त्री० ) शिक्षा ( हिं० ) शिक्षण।
तालीस—( ना० पु० ) वृक्ष विशेष।
ताव—( ना० पु० ) आँच, काग़ज़ ( हिं० ) आंच, ता कागद, पारख, परीक्षा; शीघ्रता, गडबड।
तावना—( स० क्रि० ) तपाना ( हिं० ) तापवि परीक्षा करणें।
—भाव—( ना० पु० ) प्रसंग, संधी।
तावान—( ना० पु० ) नुकसान, हरकत।
तावीज—( ना० पु० ) ताईत, ताडगा।
ताश— } (ना० पु०) इस्पिट; गंजिफा।
तास— } जर, किनेखाब।
तासा—( ना० पु० ) एक बाजा; तंबोरा, डंका, चौघडा, भेरी, दुंदुभी।

तासु*—
तासुकों*— } ( अ० ) उसको, उसका ( हिं० ) त्याला, त्याचा ।
ताहिं*—

ताहिरी—( ना० स्त्री ) खिचड़ी ( हिं० ) खिचडी, सोजी ।

तिकुरी ( ना० स्त्री० ) तिहाई ( हिं० ) तिसरा हिस्सा; सूत काढण्याची चकती ।

तिकोन—
तिकोनिया— } ( वि० ) त्रिकोण, तीन कोनाचा ।

तिक्का+—( ना० पु० ) मांसाचा लहानसा तुकड़ा ।

तिखारना+—( स० क्रि० ) पारखणें, सिद्ध करणें, खोद खोदून विचारणें, तिसऱ्यांदा नांगरणें ।

तिखूँट—( वि० ) 'तिकोन' पहा ।

तिगुना—( वि० ) तिप्पट ।

तिग्गी+—( ना० स्त्री० ) मुलांचा एक खेल ।

तिजारत—( ना० स्त्री० ) व्यापार, देवघेव ।

तिजारती—( वि० ) व्यापारी, व्यापार विषयक ।

तिजारी—( ना०स्त्री० ) तीन दिवसा आड येणारा ताप ।

तित*—( अ० ) वहाँ ( हिं० ) तेथें ।

तितना×—( अ० ) तितका ।

तितर वितर—( वि० ) तिड़ी बीड़ी ( हिं० ) छिन्न भिन्न, वाकडा तिकडा ।

तितली—
तीतली—
तितिरी— } ( ना० स्त्री० ) पाकोळी, फुल पाखरू ।

तितिम्बा—( ना० पु० ) ढकोसला रुकावट ( हिं० ) अडथळा ।

तिदरा—( ना० पु० ) तीन दरवाज्याचें घर ।

तिदरी—( वि० ) तीन दरवाज्याचें ।

तिधर+—( अ० ) वहाँ; ( हिं० ) तेथें ।

तिनकना—( अ० क्रि० ) नाराज होना ( हिं० ) नाखुष होणें, चिडणें, रागावणें ।

तिनका—( ना० पु० ) खर ( हिं० ) बाळलेलें गवत तृण, तुकडा ।

तिन्नी—( ना० स्त्री० ) चावल ( हिं० ) तांदूळ ।

तिपाई—[ ना० स्त्री० ) टिकटी ( हिं० ) तीन पायांची घडवंची ।

तिबारा—( ना० पु० ) तिसरी खेप, तीन खेपा ।

तिबासी—( वि० ) तीन दिवसाचा ।

तिबायत—( ना० स्त्री० ) हिकमत ( हिं० ) वैद्यकी चा धंदा ।

तिव्व—( ना० स्त्री० ) वैद्यक शास्त्र ।

तिय*—( ना० स्त्री० ) औरत ( हिं० ) स्त्री ।

तिरखा—( ना० स्त्री० ) प्यास (हिं०) तहान ।

तिरखूँटी—( ना० स्त्री० ) तिफटी, तिवई ।

तिरछा—( वि० ) टेढ़ा ( हिं० ) वांकडा, तिरवा ।

तिरछाना—( स० क्रि० ) टेढ़ा करना ( हिं० ) वाकडें करणें, तिरवे करणें ।

तिरछियाना—( अ० क्रि० ) टेढ़ा होना ( हिं० ) वाकडे होणें ।

तिरतिराना( अ० क्रि० ) झिरपणें, थेंब थेंब टपकणें ।

तिरना—( अ० क्रि० ) तैरना ( हिं० ) पोहोणें ।

तिरपद—
तिरपदी— } "तिपाई" पहा ।

तिरपन—( वि० ) त्रेपन; ५३ ।

तिरपौलिया—( ना० पु० ) तिदरी ( हिं० ) तीन दारे असलेला; सिंहद्वार ।

तिरमिरा—( ना० पु० ) भोंवळ ।

—होना—( अ० क्रि० ) रागाला येणें ।

तिरसठ—( वि० ) त्रेसष्ट, ६३ ।

तिरान्नबे—( वि० ) त्र्याण्णव, ९३ ।

तिराव—( ना० पु० ) तैराकी ( हिं० ) पोहणें ।

तिरास—( ना० पु० ) प्यास ( हिं० ) तहान ।

तिरासी—( वि० ) त्र्याऐंशी ८३ ।

तिराहा—( ना० पु० ) तिरमुहानी ( हिं० ) तीन रस्ते एका जागीं मिळालेली जागा ।

तिरिया+—( ना० स्त्री० ) स्त्री, नारी ।

तिर्मिरा—( ना० पु० ) चंचल; अस्थिर ।

तिर्मिराना—( अ० क्रि० ) चुकणें, हात चोळणें; पाण्यावर तेलाचा थेंब पसरविणें ।

तिर्मिरी—( ना० स्त्री० ) चक्कर, भोंवळ,

तिलङ्गा—( ना० पु० ) तैलङ्ग देशांतील मनुष्य; शिपाई।
तिलवा—( ना० पु० ) तिळाचा लाडू।
तिलहा—( वि० ) चिकना ( हिं० ) मऊ, तेलकट।
तिलई—( ना० स्त्री० ) छोटी कडाही ( हिं० ) एक लहान कढई।
तिलाक—( ना० स्त्री० ) स्त्री-परित्याग; काडी-मोड।
तिलिया—( ना० पु० ) विष विशेष; वेत।
तिल्ली—( ना० स्त्री० ) तापतिल्ली ( हिं० ) पाणथरी।
तिलुवा—( ना० पु० ) "तिलवा" पहा।
तिवारा—( वि० ) "तिबारा" पहा।
तिवारी—( ना० पु० ) त्रिवेदी, ब्राह्मणांतील एक उप नांव।
तिवासी—( वि० ) तीन दिवसाचा शिळा किंवा जुना।
तिष—( ना० स्त्री० ) प्यास ( हिं० ) तहान।
तिसका—( ना० ) उसका ( हिं० ) त्याचा।
तिसराय—( अ० ) तीसरी बार ( हिं० ) तिसऱ्या खेपेस, तिसऱ्यांदा।
तिसरायत—
तिसरैत— } ( ना० पु० ) तिऱ्हाइत।
तिसाला—( वि० ) तीन वर्षांचा।
तिहत्तर—( वि० ) त्र्याहत्तर, ७३।
तिहरा—( वि० ) तिलड़ा ( हिं० ) त्रिगुणित।
तिहराना—( स० क्रि० ) त्रिगुणित करना।
तिहरावट—( ना० स्त्री० ) त्रिगुणित किंवा तिप्पट करण्याचें काम।
तिहाई—( ना० स्त्री० ) तीसरा हिस्सा ( हिं० ) तिसरा भाग।
तिहायत—( ना० पु० ) "तिसरायत" पहा।
तिहाई*—
तिहारे—
तिहारौ— } तुम्हारा ( हिं० ) तुमचा।
तिहु*—( वि० ) तीन।
तिहैया—( ना० स्त्री० ) "तिहाई" पहा।
तीकट+—( ना० पु० ) नितंब, ढुंगण।

तीखा—( वि० ) तेज़ ( हिं० ) तीक्ष्ण धारेचा, तिखट, रागीट, चिडखोर।
तीखुर—( ना० पु० स्त्री० ) अरारूट, एका झाडाचें सत्व।
तीज—( ना० स्त्री० ) तृतीया तिथि।
तीजा—( ना० पु० ) मृत मनुष्याकरितां त्याच्या तिसऱ्या दिवशी केलेलें कर्म।
तीत—
तीता— } ( वि० ) कडु, तिखट; ऊन; गरम।
तीतर—( ना० पु० ) एक पक्षि विशेष।
तीतरी—( ना० स्त्री० ) पक्षी; पतङ्ग।
तीय—( ना० स्त्री० ) स्त्री; अबला।
तीयल+—( ना० पु० ) स्त्रियांचे कपडे।
तीयन—( ना० पु० ) तरकारी ( हिं० ) एक प्रकारची भाजी।
तीर—( ना० पु० ) नदीचा किनारा; बाण; शर समीप।
तीरथ—( ना० पु० ) तीर्थ, देवयात्रा।
—राज—( ना० पु० ) प्रयाग।
तीरन्दाज—( ना० पु० ) बाण सोडणारा।
तीरन्दाजी—( ना० स्त्री० ) बाणसोडण्याची कला, शर-सन्धान करणी।
तीर्थिक—( ना० पु० ) पण्डा।
तीस—( वि० ) तीस ३०।
तीसरा—( वि० ) तिसरा, तृतीय।
तुअना—( अ० क्रि० ) चूना ( हिं० ) गळणें, टपकणें।
तुई—( स० ना० ) तूं।
तुक—( ना० स्त्री० ) छंद, यमक, ध्रुवपद।
—बेतुकी—( वि० ) निरयमक, सुटें।
तुकला—( ना० पु० )
तुकली—( ना० स्त्री० ) } कीट विशेष।
तुका—( ना० पु० ) मांसाचे तुकडे, बिन फळाचा बाण, पहाड, टेकडी।
तुट—( ना० पु० ) संग्राम, रण, युद्ध।

तुड़वाना—
तुड़ाना— } ( स० क्रि० ) तोडविणें।
तुण्ड—( ना० पु० ) मुख, तोंड।
तुतई—( ना० स्त्री० ) तोटी असलेलें मातीचें भांडें।
तुतलाना—
तुतराना— } ( अ० क्रि० ) मुलांसारखें बोबडें बोलणें।
तुतरा—( वि० ) बोबडा, चोचरा।
तुतुही—( ना० स्त्री० ) 'तुतई' पहा।
तुन—( ना० पु० ) वृक्ष विशेष।
तुनकी—( ना० स्त्री० ) लहान पातळ पोळी।
तुनुक—( वि० ) नाजुक।
—मिजाज़—( वि० ) चिड़खोर।
तुन्तुनाना—( अ० क्रि० ) गुणगुणणें।
तुन्तुनाहट—( ना० स्त्री० ) गुणगुण।
तुन्तुनी—( ना० स्त्री० ) तुणतुणें।
तुन्द—( ना० पु० ) जठर, पोट।
तुन्न—( ना० पु० ) वृक्ष विशेष।
—वाय—( ना० पु० ) शिंपी, दर्जी फटे हुए कपडे का टुकड़ा।
तुपक—( ना० पु० ) लहान बन्दूक, पिस्तूल।
तुपकिया-
तुपकची- } ( ना० पु० ) बन्दूक चालविणारा।
तुफान—( ना० पु० ) आँधी ( हिं० ) वावटळ।
तुमड़ी—( ना० स्त्री० ) पुङ्गी, गारुड्यांची पुङ्गी, साधूचें कमंडलू।
तुमाई—( ना० स्त्री० ) धुनाई (हिं०) पिंजण्याची मजूरी।
तुमाना—( स० क्रि० ) धुनवाना ( हिं०) पिंजविणें।
तुमारा—
तुम्हारा— } ( वि० ) तुमचा।
तुम्बरी—( ना० स्त्री० ) वीणा, बीन।
तुम्बा—( ना० पु० ) वाळलेल्या, पोकळ भोपळ्याचें केलेलें जलपात्र।
तुम्बिया—( ना० पु० ) लहान भोपळ्याचें कमंडलु।

तुरई—( ना० स्त्री ) एक प्रकारची भाजी।
तुरक—( ना० पु० ) तुर्की मनुष्य दोडकीं।
तुरत—
तुरन्त— } ( वि० ) जल्दी ( हिं० ) शीघ्र। लागलीच।
तुरपन—( ना० स्त्री० ) सीवन ( हिं० ) शिवण।
तुरपना—( स० क्रि० ) सीना ( हिं० ) शिवणें।
तुरही—
तुरी— } ( ना० स्त्री० ) एक बाजा, तुतारी। सनई, रणशिंग।
तुर्तफुर्ती—
तुर्त फुर्त—
तुर्त ताव— } ( अ० ) तुरत ( हिं ) लागलीच। एकदम।
तुर्तुरा—
तुरतुरा— } ( वि० ) जल्दबाज़ ( हिं० ) वेगवान, प्रखर, सावधान।
तुर्रा—( ना० पु० ) तुरा, फुलांचा गुच्छ।
तुलना—( स० क्रि० ) जोखना ( हिं० ) तुलना करणें, जोखणें।
तुलतुलाना—( अ० क्रि० ) मऊ होणें, नरम होणें, पिळपिळीत होणें।
तुलवाना—( स० क्रि० ) तोलविणें।
तुलसी—( ना० स्त्री० ) तुळस।
तुली—( ना० स्त्री० ) विणकरांचा ब्रश।
तुवार—
तुसार— } ( ना० पु० ) कुहरा, ओस ( हिं० )। दंव, धुकें, बर्फ, थंडी।
तुवर—
तुअर— } ( ना० पु० ) अरहर ( हिं० ) तूर।
तुवरी—( ना० स्त्री० ) फटकरी ( हिं० ) औषध विशेष।
तुहमत—( ना० स्त्री० ) इलज़ाम ( हिं० ) आळ, आरोप, चुगली।
तुहमती—( ना० पु० ) निन्दक।
तू—( स० ना० ) तूं, कुत्र्याला बोलावण्याचा आवाज।
तूंतां—करना ( अ० क्रि० ) भांडणें, शिवी गाळ करणें।

तूकारना—( अ० क्रि० ) बे अदवी करना ( हिं० ) अरे तुरे करणें, शिव्या देणें।

तूण—
तूणी—
तूणार— } ( ना० पु० ) तरकस, तीर रखने की खोल ( हिं० ) भाता।

तूती—( ना० स्त्री० ) एक प्रकारचा पोपट राघू।

तून—( ना० पु० ) "तूण" पहा, वृक्ष विशेष।

तूनना—( स० क्रि० ) धुनना ( हिं० ) पिंजणें।

तूफ़ान—( ना० पु० ) अंधड़ ( हिं० ) वावटळ।

तूफ़ानी—( वि० ) भांडखोर, वादळाचा, कुभांडी।

तूमना—( स० क्रि० पिंजणें; कापूस वटणें।

तूमिया—( ना० पु० ) कापूस पिंजणारा।

तूर्य—( ना० पु० ) नगारा, भेरी, दुन्दुभी।

तूल—( ना० पु० ) लंबाई ( हिं० ) लांबी।
—देना—( स० क्रि० ) लांबविणें।

तूली—( ना० स्त्री० ) लोखंडाचा गज, कोष्टी लोकांचा कुंचला, चितान्यांचा ब्रश, कलम।

तूस—( ना० पु० ) उनी कपड़ा ( हिं० ) लोकरीचें कापड।

तृमुहानी—( ना० स्त्री० ) तिवाटा, तीन मार्गांचें मिळणें किंवा योग।

तृय—( ना० स्त्री० ) स्त्री, युवती, अबला।

तें—( अ० ) से, लेकर।

तेंतालीस—( वि० ) त्रेचाळीस ४३

तेंतीस—( वि० ) तेत्तीस ३३।

तेंदुआ—( ना० पु० ) वाघ, चित्ता।

तेंदु—( ना० पु० ) फळविशेष।

ते+—( सर्वना० ) वे ( हिं० ) ते।

तेईस—( वि० ) तेवीस २३।

तेकाला—(ना०पु०) अस्त्र विशेष, मासे पकडण्याचा मळ।

तेग़—( ना० स्त्री० ) तलवार।

तेग़ा—( ना० पु० ) खञ्जर ( हिं० ) खंजीर।

तेज—( ना० पु० ) प्रभाव, प्रताप, बल, प्रकाश, वीर्य, अग्नि।

तेज़—( वि० ) तीक्ष्ण, चलाख, तिखट, ऊन; रागीट, महाग; मनोजव।

तेज़ाब—( ना० पु० ) ॲसिड।

तेज़ी—( ना० स्त्री० ) तीक्ष्णता, घाई।

तेता*—( वि० ) उतना ( हिं० ) तितका।

तेताला+—( ना० पु० ) तिमजली घर।

तेरस—( ना० स्त्री० ) त्रयोदशी तिथि।

धन—( ना० स्त्री० ) कार्तिक त्रयोदशी तेरसचा सण।

तेरह—( वि० ) तेरा, १३।

तेरहवीं—
तेरहीं— } ( ना० स्त्री० ) तेरावा दिवस। मेलेल्याचा तेरावा दिवस।

तेरा—( सर्वनाम ) तुम्हारा ( हिं० ) तुझा।

तेलिन—( ना० स्त्री० ) तेलीण।

तेलिया—( वि० ) तेलकट।

तेला—( ना० पु० ) तेल काढणारा व विकणारा।

तेवर—( ना० पु० )कुपित दृष्टि ( हिं० ) क्रुद्ध दृष्टि।

तेवरस+—
तेरुस— } ( ना० पु० ) तिसरें वर्ष।

तेवराना—( अ० क्रि० ) चक्कर आना ( हिं० ) घेरी येणें, चक्कर येणें।

तेवरी—
तेवड़ी— } घुड़की; धमकी ( हिं० )। धमकी, डोळे वटारणें।

तेवहार—
त्योहार— } ( ना० पु० ) उत्सव, पर्व, उत्साह।

तेवहारी—
त्योहारी— } ( ना० स्त्री० ) उत्सवांतील नजराणा; भेट।

तेंहरा—( वि० ) तिप्पट, तिहिरी।

तेह—
तेहा— } ( ना० पु० ) गुस्सा ( हिं० ) क्रोध। कोप; साहस; घमंड।

तै+—( अ० ) इतना ( हिं० ) इतका।

तैं*—( सर्व ना० ) तू ( क्रि० वि० ) पासून, पेक्षा, अन्, हून।

तैय्यार—( वि० ) प्रस्तुत ( हिं० ) उद्यत।

तैय्यारी—( ना० स्त्री० ) तयारी।
तैरना—( अ० क्रि० ) पोहणें; पलीकडे जाणें।
तैराक—( ना० पु० ) तैरनेवाला ( हिं० ) पोहणारा।
तैराकी—( ना० स्त्री० ) पोहोण्याची कला।
तैलमाली—
तैलिनी— } ( ना० स्त्री० ) पलीता; बत्ती।
तैश—( ना० स्त्री० ) गुस्सा ( हिं० ) राग, क्रोध।
तैष—( ना० पु० ) चांद्र पौषमास।
तैषी—( ना० स्त्री० ) पौषी पोर्णिमा।
तो—
तौ— } ( अ० ) तब ( हिं० ) तेव्हां।
तोंद—( ना० स्त्री० ) पेट के आगे का बढ़ा हुआ भाग, ( हिं० ) मोठें पोट।
तोंदी—( ना० स्त्री० ) नाभि ( हिं० ) बेंबी।
तोंदैल —
तोंदैला—
तोंदील— } ( वि० ) ढोलपोट्या, फोपसा।
तों ही—
त्यों ही— } ( अ० ) उसी क्षण में ( हिं० ) तत्क्षणीं; त्याच वेळीं।
तोक- ( ना० पु० ) संतति; सन्तान; पुत्र।
तोकहँ+—( सर्वना० ) तुझको ( हिं० ) तुला।
तोटक—( ना० पु० ) छन्द विशेष; त्याच्या प्रत्येक पादा मध्यें बारा अक्षरें असतात।
तोड़—( ना० पु० ) तूट फूट; खंड; नदीचा वेग; प्रवाहाची प्रबलता; ( अ० ) पर्यन्त।
—जोड़ ( ना० पु० ) दाँव पेच ( हिं० ) युक्ति।
तोड़ना—( स० क्रि० ) फोडणें; टुकडे करणें, रुपया मोड़णें, अशक्त करणें, किंमत कमी करणें, संस्था मोडणें, कारखाना बंद करणें, प्रतिज्ञा भंग करणें।
तोड़ा—( ना० पु० ) थैली ( हिं० ) पैशाची पिशवी, सोन्याचा किंवा चांदीचा तोड़ा।
तोड़वाई, तुड़वाई—( ना० स्त्री० ) बट्टा, दलाली, कसर रुपया मोडविल्याचा दाम।
तोतना—( स० क्रि० ) नवार किंवा सतरंजी विणणें, विणणें।

तोतला, तुतला—( वि० ) बोबडा, अस्पष्ट बोलणारा।
तोतलाना—
तुतलाना— } ( अ० क्रि० ) अस्पष्ट बोलणें, बोबडें बोलणें।
तोता—( ना० पु० ) सुग्गा ( हिं० ) पोपट।
—चश्म—( ना० पु० ) दुःशील।
—चश्मी—( ना० स्त्री० ) दुःशीलता।
तोपड़ा—( ना० पु० ) मक्खी ( हिं० ) माशी।
तोपना—( स० क्रि० ) ढाकना (हिं०) झाकणें, आच्छादणें।
तोपाना—( स० क्रि० ) झाकविणें।
तोबड़ा—( ना० पु० ) घोड्याचा तोबरा।
तोमड़ी—( ना० स्त्री० ) "तुम्बी" पहा।
तोरई—( ना० स्त्री० ) "तुरई" पहा।
तोरण—( ना० पु० ) बन्दनवार ( हिं० ) तोरण।
तोरही—( ना० स्त्री० ) एक बाजा।
तोला—( ना० पु० ) तोळा, १२ मासे।
तौर—( ना० पु० ) तरीका ( हिं० ) चाल।
तौंस+—( ना० स्त्री० ) बड़ी प्यास ( हिं० ) अत्यन्त तहान।
तौंसना—( अ० क्रि० ) प्यासा होना ( हिं० ) तहान लागणें, कोमेजणें।
तौन+—( सर्व० ना० ) तो, ती, तें।
तौल—( ना० पु० ) वजन।
तौलना—( स० क्रि० ) वजन करणें।
तौलवाई, तौलाई—( ना० स्त्री० ) तौलने की मजदूरी ( हिं० ) वजन करण्याची मजूरी।
तौला—( ना० पु० ) मातीचें भांडें।
तौलाना—( स० क्रि० ) वजन करविणें।
तौलिया, तौली—( ना० स्त्री० ) पात्र विशेष, अंग पुसणी।
तौही, तौहू+—( अ० ) तोभी ( हिं० ) तरी सुद्धां तरी देखील; तथापि।
त्यों—( अ० ) उस रीति से ( हिं० ) तसें, त्या प्रकारें।
त्राण—( ना० पु० ) रिहाई, बचाव ( हिं० ) सुटका; रक्षण, मोक्ष, बचाव।

त्रास—( ना० पु० ) डर ( हिं० ) भीति, भय।
त्रोह, त्राहि—( अ० ) दया करा ! रक्षण करा।
—कार—( ना० पु० ) धांवा।
त्रिगढ—( ना० पु० ) त्रिवर्ग, धर्म, अर्थ, काम।
त्रिमुहानी—( ना० स्त्री० ) तिवाटा।
त्रिया—( ना० स्त्री० ) स्त्री, अबला।
त्रिलोहक—( ना० पु० ) सोने, चांदी व तांबें हे तीन धातू।

—०—

## थ

थई—( ना० स्त्री० ) ढेर ( हिं० ) ढीग-रास।
थंब-भ-, थंबा— } ( ना० पु० ) स्तम्भ, खांब।
थंभना—( अ० क्रि० ) ठहरना, रुकना ( हिं० ) थांबणें, आडखळणें, स्थिर होणें।
थकना—( अ० क्रि० ) परेशान होना ( हिं० ) थकणें, दमणें, अशक्त होणें।
थकाना—( स० क्रि० ) थकविणें, दमविणें।
थका—( वि० ) श्रान्त, थकलेला।
थकावट—( ना० स्त्री० ) थकान ( हिं० ) थकवा, दमणें।
थकित—, थकामांदा— } (वि०) "थका" पहा।
थगित—( वि० ) थांबलेला; स्थगित।
थड़ा—( ना० पु० ) दुकानदाराची बसण्याची जागा; दुकानदाराची गादी।
थन—( ना० पु० ) स्तन; थान; कास।
—दार—( वि० ) चांगल्या कासेचें; ओटीदार ( जनावर। )
थनी—( ना० स्त्री० ) घोडयांतील एक दोष किंवा गोम।
थनैला—( ना० पु० ) स्तनाचा रोग विशेष।
थनैत—( ना० पु० ) गांव का मुखिया ( हिं० ) गावाचा मुख्य; जमीदाराच्या तर्फेनें वसूली करणारा।
थपक—( ना० पु० स्त्री० ) थाप; ठोक।
थपकी—( ना० स्त्री० ) चोपणी; धुमस।
थपड़ा—( ना० पु० ) चपत ( हिं० ) चपराक; थप्पड़।
थपड़ी—( ना० स्त्री० ) करताली ( हिं० ) हातांनीं टाळी वाजविणें।
थपथपी—( ना० स्त्री० ) "थपकी" पहा।
थपना—( स० क्रि० ) स्थापणें; प्रतिष्ठापना करणें; स्थापना करणें।
थपा—( वि० ) स्थापित; स्थापलेला।
थपाना—( स० क्रि० ) स्थापना करविणें।
थपेड़ा—( ना० पु० ) तमांचा ( हिं० ) थप्पड़; चपराक।
थमकारो—( ना० पु० ) रोकने वाला ( हिं० ) आडविणारा; थांबविणारा।
थमड़ा+—( वि० ) 'तोंदैल' पहा।
थमना—( अ० क्रि० ) ठहराना ( हिं० ) थांबणें; टिकणें, आधार मिळणें।
थर—( ना० पु० ) माँद ( हिं० ) गुहा।
थरथर—( ना० स्त्री० ) कम्प; भीति; थरकांप।
थरथराना—( अ० क्रि० ) काँपना ( हिं० ) कम्प सुटणें; थरकांप होणें।
थरथराहट, थरथरी } ( ना० स्त्री० ) कपकपी ( हिं० ) थरकांप।
थर्राना—( अ० क्रि० ) "थरथराना" पहा।
थल—( ना० पु० ) स्थान; स्थल।
—चर—( वि० जमिनीवर फिरणारे।
थलकना—( अ० क्रि० ) फड़फड़ाना ( हिं०) फडफडणें।
थलथलाना—( अ० क्रि० ) हालणें; थलथल करणें।
थलबेड़ा+—( ना० पु० ) नाव लागण्याचें स्थान; घाट।
थलिया—( ना० स्त्री० ) थाली ( हिं० ) ताट जेवणाचें ताट।
थली—( ना० स्त्री० ) स्थान; वाळूचें मैदान।
थवई—( ना० पु० ) राजगीर ( हिं० ) गवण्डी; घर बांधणारा; बांध काम करणारा।
थहराना—( अ० क्रि० ) काँपना ( हिं० ) कांपणें; शंकित होणें; भयभीत होणें।

थहाना—( स० क्रि० ) थाह लेना ( हिं० ) ठाव घेणें; खोली मोजणें।
थांग—( ना० स्त्री० ) चोराचें गुप्त घर; गुहा; शोध; पत्ता; ठाव; ठिकाण।
थांगी—( ना० पु० ) साव, चोरांचा साथी; चोरीचा माल ठेवणारा।
थांभ—( ना० पु० स्तम्भ; खांब।
थांमना—( अ० क्रि० ) आडणें; विलंब करणें; थांवणें; मदत करणें।
थांवला—( ना० पु० ) थाल ( हिं० ) आळें।
था—( क्रि० ) रहा ( हिं० ) होता।
थाक—( ना० पु० ) ग्राम-सीमा; ढीग; राशी; थोक; ढेर; समूह।
थाकना—( अ० क्रि० ) थकना ( हिं० ) श्रांत होणें; दमणें।
थाती, थाथी—( ना० स्त्री० ) धरोहर ( हिं० ) ठेव; जमा; संचित धन।
थान—( ना० पु० ) कापडाचें ठाण; गुरांचा तबेला; जागा।
थानक—( ना० पु० ) जगह ( हिं० ) जागा।
थाना—( ना० पु० ) चौकी ( हिं० ) पोलीस ठाणें।
थानेदार—( ना० पु० ) कोतवाल ( हिं० ) एक पोलीस अम्मलदार।
थाप—( ना० पु० ) चपत ( हिं० ) चपेटा।
थापना—( ना० पु० ) स्थापना।
थापा—( ना० पु० ) पंजों की निशानी ( हिं० ) हाताचा छाप।
थापी—( ना० स्त्री० ) थाप मारल्याचा आवाज; कुम्भाराची थापी।
थार, थाल—( ना० पु० ) बड़ी थाली ( हिं० ) मोठी परात।
थाली—( ना० स्त्री० ) थलिया ( हिं० ) जेवणाचें ताट।
थाह—( ना० स्त्री० ) तह ( हिं० ) थांग; तळ; शेवट।
थाहना—( स० क्रि० ) ठाव घेणें; तळ काढणें; थांग लावणें।
थाहरा+—( वि० ) छिछला ( हिं० ) उथळ।
थाहा+—( ना० पु० ) नदीचें उथळ पात्र।
थाही+—( ना० स्त्री० ) उथळ नदी।
थिगरी, थिगली—( ना० स्त्री० ) चकती; ठिगळ।
थिर—( वि० ) स्थिर; शांत।
थिरकना—( अ० क्रि० ) नाचना ( हिं० ) नाच करणें।
थिरकाना—( स० क्रि० ) नाचविणें।
थिरता—( ना० स्त्री० ) स्थिरता; चैन।
थिरा*—( वि० ) स्थिर, प्रशान्त।
थिराना—( अ० क्रि० ) स्थिर होणें।
थुक थुकाना—( अ० क्रि० ) थुकाना ( हिं० ) थुंकणें।
थुकाई—( ना० स्त्री० ) थुंकणें।
थुकाना—( स० क्रि० ) थुंकविणें, निन्दा, करविणें; अप्रतिष्ठा करविणें।
थुक्काफजीहत—( ना० स्त्री० ) तिरस्कार, धिक्कार फजीती।
थुड़ी—( ना० स्त्री० ) तिरस्कार सूचक शब्द।
थुतकारना—( स० क्रि० ) तुच्छतेनें हकलून देणें, अपमान करून घालविणें।
थुथनी—( ना० स्त्री० ) घोडा किंवा हत्तीचें तोंड।
थुथाना—( अ० क्रि० ) भोहें चढ़ाना ( हिं० ) डोळे वटारणें, ओठ चावणें।
थूक—( ना० पु० ) थुंकी।
थूकना—( अ० क्रि० ) थुंकणें।
थूथना—( ना० पु० ) "थुथनी" पहा।
थूनी—( ना० स्त्री० ) खम्भा ( हिं० ) खांब।
थूथड़ा—( ना० पु० ) "थुथनी" पहा।
थूथन—( वि० ) खराब ( हिं० ) वाईट।
थूहर, थूहड़—( ना० पु० ) औषधि विशेष।
थूही—( ना० स्त्री० ) मिट्टी की ढेरी ( हिं० ) मातीचा ढीग।

थेई थेई—( ना० स्त्री० ) नाच रंग ( हिं० ) नाच; थयथयाट।
थेगली—( ना० स्त्री० ) 'थिगरी' पहा।
थेवा } ( ना० पु० ) हिरा, अंगठी वरील
थेवा } खड़ा, रत्न, माणिक।
थेंथर+—( वि० ) थका हुआ ( हिं० ) थकलला।
थैया—( ना० पु० ) शेतांतील माळ्यावरीलेल छप्पर।
थैला—( ना० पु० ) बड़ा बोरा ( हिं० ) पोतें।
थैलिया | ( ना० स्त्री० ) बटुआ ( हिं ) कोथळी,
थैली | लहान पिशवी।
थोक—( ना० पु० ) समुदाय; राशि; समूह, ढीग विक्रीचा माल, गड्डी।
—दार—( ना० पु० ) घाऊक व्यापारी।
—बन्दी—( ना० स्त्री० ) पक्षोपन्यास।
थोड़ा—( वि० ) किंचित, अल्प।
थोंथर } ( वि० ) जीर्ण, कुंठित, मंद।
थोथरा }
थोथा—( वि० ) छूंछा (हिं०) रिता—मोकळा (ना०पु०) बिनफळाचा बाण, बिनधारेचें अस्त्र।
थोथी बात—( ना० स्त्री० ) अर्थहीन वचन।
थोप+—( ना० पु० ) पालखीच्या दांड्याला लवलेला मुखडा, भूषण।
थोपड़ी—( ना० स्त्री० ) चपत, धौल ( हिं० ) चपाटी, चपराक।
थोपना—( स० क्रि० ) बटोरना ( हिं० ) गोळा करणें; ढीग करणें।
थोपी×—( ना० स्त्री० ) "थोपड़ी" पहा।
थावड़ा—( ना० पु० ) "थूथन" पहा।
थोर—( ना० पु० ) केळ्याचा दाभा; केळीचें काल।
थोरा—( वि० ) "थोड़ा" पहा।
थोहर—( ना० पु० ) थूहर ( हिं० ) झाड; रोप।
थौना+—( ना० पु० ) गर्भदानानंतर स्त्रीची केलेली पाठवणी।

---

## द

दई—( ना० पु० ) दैव, भाग्य; अदृष्ट; ईश्वर, देवता।
—मारा—( वि० ) भाग्यहत, दुर्भाग्य अभागी।
दंग—( वि० ) परेशान ( हिं० ) चकित; स्तब्ध। ( ना० पु० ) भय, डर, घबराहट।
दंगई—( वि० ) लड़ाका ( हिं० ) उपद्रवी, दंगा करणारा, राजद्रोही; भांडखोर।
दंगल—( ना० पु० ) अखाड़ा ( हिं० ) फड मैदान, कुस्त्या; समूह।
दंगा—( ना० पु० ) फ़साद ( हिं० ) उपद्रव; तंटा, झगडा; बखेडा।
दंगैत—( वि० ) बलवाई ( हिं० ) बंडखोर राजद्रोही।
दंतेला—( वि० ) बड़े दांतोंवाला ( हिं० ) दंताळ्या; दांत पुढें आलेला।
दंदनाना×—( अ० क्रि० ) हर्ष मनाना ( हिं० ) हर्ष मानणें; खुष होणें; आनंदित होणें।
दंदारू—( ना० पु० ) फुंसी, फोड़ा ( हिं० ) पुरळ, फोड।
दक—( ना० पु० ) उदक, पाणी; जल; रस।
दक्खिन } ( ना० पु० ) जनूब ( हिं० ) दक्षिण।
दक्खन }
दक्खिनी } ( वि० ) दखिनहा ( हिं० ) दक्षिणी, दक्षिणेचा।
दखिनी }
दच्छ—( वि० ) योग्य, समर्थ; लायक।
दख़ल—( ना० पु० ) प्रवेश, रिघाव; शिरकाव, ताबा, लुडबुड।
—करनेवाल—( ना० पु० ) आक्रमणारा, व्यापणारा।
—बेजा—( ना० पु० ) बेकायदेशीर ताबा।
—याबी—( ना० स्त्री० ) ताबा घेणें।
दख़ील—( वि० ) कब्जादार ( हिं० ) ताबा. वाळगणारा, प्रविष्ठ।
—कारी—( ना० स्त्री० ) वडिलोपार्जित ताबा।

दगड़+—( ना० पु० ) नगारा; दुंदुभी ।
दगड़ना—( स० क्रि० ) अविश्वास करणें, खऱ्यावर देखील विश्वास न ठेवणें ।
दगड़ा-रा—( ना० पु० ) रास्ता ( हिं० ) रस्ता; मार्ग हमरस्ता ।
दगदगा—( ना० पु० ) डर, संदेह ( हिं० ) भीति; शंका; संशय, आशंका ।
दगदगा—( वि० ) चमकीला ( हिं० ) चमकदार ।
दगदगाना—( अ० क्रि० ) चमकना ( हिं० ) चकाकणें ।
दगदगाहट—( ना० स्त्री० ) चमक ।
दगधना—( अ० क्रि० ) जलना ( हिं० ) जळणें इजा होणें ।
दग़ना—( अ० क्रि० ) दाग़ लगना ( हिं० ) डाग लागणें, बंदूक उडणें ।
दगरा+—( ना० पु० ) विलंब, रस्ता ।
दगलफसल—( ना० पु० ) फरेब ( हिं० ) धोका, फसवणूक; कपट ।
दगल—( ना० पु० ) लबादा ( हिं० ) कापूस भरलेला आंगरखा ।
दगहा—( वि० ) सुतकी, डाग लागलेला ।
दग़ा—( ना० स्त्री० ) धोखा ( हिं० ) धोका, कपट ।
—बाज—( वि० ) छली ( हिं० ) कपटी ।
—बाजी—( ना० स्त्री० ) कपट ।
दग़ैल—( वि० ) कपटी, लुच्चा ।
दग़ीला—( वि० ) दाग़दार ( हिं० ) डागावलेला; डाग असलेला ।
दग्धा—( ना० स्त्री० ) अमंगल तिथि ।
दग्धोदर—( वि० ) क्षुधार्त; भुकेलेला ।
दघ+—( ना० पु० ) त्याग, हिंसा; नाश ।
दचक—( ना० पु० ) ठोकर, दबाव ।
दचना—( अ० क्रि० ) गिरना ( हिं० ) पडणें ।
दच्छ—( वि० ) दक्ष, निपुण ।
दच्छिन—( ना० स्त्री० ) दक्षिण दिशा ।
दच्छिना—( ना० स्त्री० ) दक्षिणा ।

दटना—
डटना— } ( स० क्रि० ) लड़ना ( हिं० ) तोंड देणें; विरोध करणें, लढणें, ताठ उभे हाणें; मागें पाय न घेणें ।
दट्ट—( ना० पु० ) बुच, बोळा, दट्या ।
दड़कना—( अ० क्रि० ) फटना ( हिं० ) चिरणें, टरकणें, फाटणें ।
दड़ेरा+—( ना० पु० ) प्रचंड झड, अतिवृष्टि, धक्का, दरारा ।
दड़ोकना×—( अ० क्रि० ) दहाडना ( हिं० ) गरजणें, गर्जना करणें ।
दढ़मुड़ा+—( वि० ) बिन दाढीचा ।
दढ़ीयल—( वि० ) लांब दाढीचा ।
दण्डदास—( वि० ) दंडाची रक्कम नोकरी करून फेडणारा ।
दण्डादण्डी—( ना० स्त्री० ) लकड़ी की मारपीट (हिं०) काठ्यांची मारामारी ,
दण्डप्रणाम—( ना० पु० ) सादर अभिवादन ।
दण्डाजिन—( ना० पु० ) दंड व मृगचर्म ।
दण्डाश्रम—( ना० पु० ) संन्यासधर्म, सन्यासाचा आचार ।
दण्डाश्रमी—( ना० पु० ) संन्यासी, दंडी ।
दतना—( स० क्रि० ) "दटना" पहा ।
दतवन—
दतौन— } ( ना० स्त्री० ) दन्तधावन ( हिं ) दातवण, दांत घासण्याची लकडी ।
दतारा—दाँतों वाला ( हिं० ) दंताळ्या ।
दतिया—( ना० स्त्री० ) छोटा दाँत ( हिं० ) लहान दाँत ।
दतुअन—
दतून— } ( ना० स्त्री० ) "दतवन" पहा ।
दतूली—( ना० स्त्री० ) लहान मुलांचे दांत ।
दत्ता—( ना० स्त्री० ) विवाहित कन्या ।
दत्रिम—( ना० पु० ) दत्तक पुत्र, गृहीत पुत्र ।
ददन—( ना० पु० ) त्याग, दान, वितरण ।

दद्दरी क्षेत्र—( ना० पु० ) ऋगुमुनीचें स्थान ।
( हें स्थान बलिया जवळ आहे )

ददलना+—( स० क्रि० ) डाँटना ( हिं० ) धमकावणें; निर्भर्त्सना करणें ।

ददा—( ना० पु० ) दादा ( हिं० ) आजोबा ।

ददिऔरा—( ना० पु० ) ददिहाल ( हिं० ) आजीचें माहेर ।

ददियाल—
ददिहाल— } ( ना० पु० ) कुळ, घराणें, वंश, आजीचें घर ।

ददिया-ससुर—( ना० पु० ) सासऱ्याचा बाप ।

ददिया-सास—( ना० स्त्री० ) सासऱ्याच्या बापाची बायको ।

ददोड़ा-रा—( ना० पु० ) फोड़ा ( हिं० ) फोड, जखम, पुटकुळी, गांधी; चामखीळ; सूज ।

दद्रु—( ना० पु० ) खजुली ( हिं० ) खरूज, खाज, दादड, गजकर्ण ।

दन्तधावन—( ना० पु० ) "दतवन" पहा ।

दन्तमांस—( ना० पु० ) मसूड़ा ( हिं० ) हिरडी ।

दन्तिनी—( ना० स्त्री० ) हथिनी ( हिं० ) हत्तीण ।

दन्ती—( ना० पु० ) हाथी ( हिं० ) हत्ती ।

दपट—( ना० स्त्री० ) धाक, धावा, दौड़, दपटना

दपटना—( अ० क्रि० ) घुड़कना ( हिं० ) धाक दाखविणें; दटावणें ।

दपटाना—( स० क्रि० ) दामटणें ।

दपदपाना—
दपदप करना— } ( अ० क्रि० ) चमकना ( हिं० ) चमकणें, चकाकणें ।

दमदमाहट—( ना० स्त्री० ) रोशनी ( हिं० ) चमक, चकाकी ।

दफा—( ना० स्त्री० ) बेर, वार ( हिं० ) खेप; बारी; पाळी; वेळ, कायद्याची रीत किंवा पद्धति ।

दफ्तर—( ना० पु० ) कार्यालय ।

दफ्तरी—( ना० पु० ) जिल्दसाज ( हिं० ) जिल्दगार, पुस्तिपत्र बांधणारा ।

दबक—( ना० स्त्री० ) सिकुडन ( हिं० ) संकोच ।

दबकना—( अ० क्रि० ) स्तब्ध होणें, लपणें, टपून बसणें ।

दबकाना—(स० क्रि०) पोशीदा करना ( हिं० ) लपविणें, छपविणें ।

दबकी—( ना० स्त्री० ) घात ( हिं० ) टपून बसणें, दबा ।

दबकीला—
दबकैल— } ( वि० ) कामचुकार, चुकारतट्टू ।

दबंग—
दबंगा— } ( वि० ) प्रभाववान्, कुशील, बेढब ।

दबदबा—( ना० पु० ) शान, दर्जा ( हिं० ) प्रताप; रोब; तेज, प्रभाव ।

दबना—( अ० क्रि० ) नम्र होणें; लाजणें, भिणें, लपणें, शरण जाणें ।

दबवाना—( स० क्रि० ) दुसऱ्याकडून दवविणे ।

दबाना—( स० क्रि० ) दाबणें, मोडणें, दडपणें; नाहींसे करणें ।

दबाव—( ना० पु० ) रोब ( हिं० ) मान; प्रभाव, वजन ।

दबीज़—( वि० ) मोटा ( हिं० ) जाड, बळकट ।

दबीला—( वि० ) रोबीला ( हिं० ) प्रभाववान, प्रभावशाली ।

दबेल—( वि० ) ताबेदार; आज्ञांकित ।

दबोचना—( स० क्रि० ) दाबणें; वजन घालणें; पाण्यांत बुडविणें ।

दबोस—( ना० पु० ) चकमकीचा दगड ।

दबोसना—( अ० क्रि० ) घोंट घोंट दारू पिणें ।

दबौनी—( ना० स्त्री० ) पेपरवेट ।

दम—( ना० पु० ) साँस ( हिं० ) श्वासोच्छ्वास ।
—बाज—( वि० ) फसव्या, विश्वासघातकी ।
—बाजी—( ना० स्त्री० ) फसवेगिरी; कपट ।
—गजरदम—( अ० ) रोज सकाळीं ।

दमक—( ना० स्त्री० ) चमक ( हिं० ) प्रकाश; चकाकी ।

दमकड़ा—( ना० पु० ) दिंड; चातीवर असलेला लाकडीचा तुकडा ।
दमकना—( अ० क्रि० ) चमकना ( हिं० ) चमकणें ।
दमकल—( ना० पु० ) पंप ।
दमकला—( ना० पु० ) एक प्रकारची पितकारी, कोळशाची शेगडी ।
दमका+—( ना० पु० ) पहाड़ी ( हिं० ) टेकडी ।
दमड़ा—( ना० पु० ) पैसे, धन दौलत ।
दमड़ी—( ना० स्त्री० ) दमडी, पै ।
दमदमाना—( अ० क्रि० ) अतिशय प्रकाशित होणें ।
दमदार—( वि० ) दृढ़, मजबूत, तीव्र; चोख ।
दमन—( ना० पु० ) आत्मसंयम, संयम ।
दमनक—( वि० ) दमन शील ।
दमना—( अ० क्रि० ) चकाकणें; लवचीकपणानें वाकणें ।
दमनी—( ना० स्त्री० ) संकोच, लज्जा ।
दमबाज—( वि० ) फुसलाने वाला ( हिं० ) कपटी ।
दमबाजी—( ना० स्त्री० ) छल ( हिं० ) कपट ।
दमा—( ना० पु० ) श्वास रोग ।
दमाद—( ना० पु० ) जामात; जावई ।
दमादम—( अ० ) लगातार ( हिं० ) एकसारखें ।
दमाना—( स० क्रि० ) नवाना ( हिं० ) वाकविणें; लवविणें ।
दमामा—( ना० पु० ) नगाड़ा ( हिं० ) नगारा, डंका, दुन्दुभी ।
दम्मालि, दम्माली } ( ना० पु० ) वज्र, अशनी ।
दयाल—( वि० ) दयालु, कृपालु ।
दर—( ना० पु० ) किंमत, दर, दरवाजा ।
—पर्दा—( अ० ) दारोदार ।
—बदर—( अ० ) दारोदर ।
दरकना—( अ० कि० ) फटजाना (हिं०) फाटणें, चिरणें, टरकणें ।
दरका—( ना० पु० ) चीर; फट; छेद; छिद्र ।
दरकाना—( स० क्रि० ) फटाना ( हिं० ) फाडणें; चिरणें; टरकाविणें ।

दरकार—( वि० ) आवश्यक; अपेक्षित; जरूरी ।
दरकिनार—( अ० ) अलग ( हिं० ) वेगळा, पृथक; दूर ।
दरकी—( ना० स्त्री० ) "दरका" पहा ।
दरख्वास्त—( ना० स्त्री० ) अर्जी ( हिं० ) अर्ज; प्रार्थना-पत्र ।
दरख्त—( ना० पु० ) वृक्ष; झाड ।
दरगाह—( ना० स्त्री० ) दरबार ( हिं० ) कचेरी; कार्यालय; देवालय ।
दरज—( ना० स्त्री० ) दरार ( हिं० ) छेद; फट ।
दरजिन—( ना० स्त्री० ) शिंपीण ।
दरजी—( ना० पु० ) सूचि-जीवी ( हिं० ) शिंपी ।
दरण—( ना० पु० ) ध्वंस, विनाश ।
दरद—( ना० स्त्री० ) व्यथा; पीड़ा; यातना; वेदना ।
दरदर—( अ० ) द्वारद्वार ( हिं० ) दारोदार ।
दरदरा—(वि०) अधपिसा ( हिं० ) भरड दळलेला भरड ।
दरना—( स० क्रि० ) पीसना ( हिं० ) दळणें; नष्ट करणें ।
दरप—( ना० पु० ) दर्प ।
दरपन—( ना० पु० ) आइना ( हिं० ) आरसा ।
दरपनी—( ना० स्त्री० ) लहान आरसा ।
दरपरदा—( अ० ) लपून; अडून; दडून ।
दरब—( ना० पु० ) द्रव्य; दान, धातु ।
दरबहरा—( ना० पु० ) मद्य विशेष ।
दरबा—( ना० पु० ) कबूतर का कठघरा ( हिं० ) कबूतरांचें खानेदार घर ।
दरबान—( ना० पु० ) द्वारपाल, देवडीवाला ।
दरबानी—( ना० स्त्री० ) देवड़ी; पुढचा सोपा ।
दरबार—( ना० पु० ) राजसभा; विचार-स्थान, धर्माधिकारण ।
दरबारी—( ना० पु० ) सभासद; राजसभेंत बसणारा ।
दरभा—( ना० स्त्री० ) एक प्रकारची चटई ।
दरमाह—( ना० पु० ) वेतन ( हिं० ) मजूरी ।
—दार—( वि० ) पगारदार ।
दरवाजा—( ना० पु० ) किवाड़ ( हिं० ) दार; फाटक; द्वार ।

दरवान—( ना० पु० ) "दरबान" पहा ।
दरवेश—( ना० पु० ) फ़क़ीर ( हिं० ) संन्यासी ।
दरस—, दश } ( ना० पु० ) देखादेखी ( हिं० ) दर्शन ।
दरसन—( ना० पु० ) "दरस" पहा ।
दरसाना—( स० क्रि० ) दिखलाना ( हिं० ) दाखविणें ।
दरही—( ना० स्त्री० ) एक जातीचा मासा ।
दरांती—( ना० स्त्री० ) हँसुआ ( हिं० ) विळी; विळा; पीक कापण्याचा विळा ।
दरार-रा—( ना० पु० ) चीर; फट; छिद्र ।
दराज—( ना० स्त्री० ) खाने; कप्पे ।
दरी—( ना० स्त्री० ) कन्दरा ( हिं० ) पर्वताची गुहा; किंमत, भाव, दर ।
दरिद—( ना० पु० ) कंगाली ( हिं० ) दारिद्र्य ।
दरिद्र—( वि० ) कंगाल ( हिं० ) दरिद्री ।
दरिया—( ना० पु० ) समुद्र; मोठी नदी ।
दरयाई—( वि० ) नदी संबंधी ।
दरिया-दिल—( वि० ) उदार; दानी ।
दरिया-दिली—( ना० स्त्री० ) उदारता ।
दरी—( ना० स्त्री० ) सतरंजी ।
दरीबा—( ना० पु० ) पान तंबाखूचें दुकान ।
दरेंती—( ना० स्त्री० ) लहान जातें ।
दरेग़—( ना० पु० ) इनकार ( हिं० ) विरोध; प्रतिकूलता नाकबूली ।
दरेस—( ना० पु० ) फूलदार छापाचा कपडा, ड्रेस, वर्दी ।
दरेसी—( ना० स्त्री० ) मरम्मत ( हिं० ) दुरुस्ती ।
दरोग़—( ना० पु० ) झूट ( हिं० ) असत्य ।
—हलफ़ी—( ना० स्त्री० ) खोटा शपथ-विधी ।
दरोग़ा—( ना० पु० ) फौज़दार ।
दर्जन—( ना० स्त्री० ) बारह; डझन ।
दर्जा—( ना० पु० ) खोली; मजला; भाग; दरजा; इयत्ता;
—ब—दर्जा ( अ० ) हळू-हळू ।
दर्द—( ना० पु० ) पीडा; दुख; त्रास ।
—सर—( ना० पु० ) डोकें दुखणें ।
—शरीक—( वि० ) दयाळू; सहानुभूतिचा ।
—नाक—( वि० ) दुःखद; दयाळू,
—दर्दमंदी—( ना० स्त्री० ) सहानुभूती ।
दर्मियान—( ना० पु० ) बीच ( हिं० ) मध्य ।
—इस-में—( अ० ) इतक्यांत ।
दर्मियानी—( वि० ) बीचका ( हिं० ) मध्यस्थ ।
दर्राना—( अ० क्रि० ) बेधडक पुढें जाणें ।
दर्शन—( ना० पु० ) मुलाकात ( हिं० ) भेंट ।
दल—( ना० पु० ) समूह, पक्ष; पान ।
दलक—( ना० स्त्री० ) दमक ( हिं० ) कांप; धक्का ।
दलकना—( अ० क्रि० ) चमकना ( हिं० ) दचकणें; हालणें; कांपणें ।
दलकपाट—( ना० पु० ) न उमललेली कळी ।
दलना—( स० क्रि० ) पीसना ( हिं० ) दळणें ।
दलबादला—( ना० पु० ) बड़ा खीमा ( हिं० ) मोठा तंबू; मोठी फौज़; ढगांचा समूह ।
दलवाना—, दलाना— } ( स० क्रि० ) पीसना ( हिं० ) दळविणें ।
दलवैया—( ना० पु० ) दळणारा; दळ्या ।
दलहारन—, दलहारी— } ( ना० स्त्री० ) दळवीण, धान्याचा व्यवहार करणारी स्त्री ।
दलहारा—( ना० पु० ) धान्याचा व्यापारी ।
दलाना—( स० क्रि० ) "दलवाना" पहा ।
दलाल—( ना० पु० ) बिचवाई ( हिं० ) मध्यस्थ ।
दलाली—( ना० स्त्री० ) बिचवानी ( हिं० ) मध्यस्थाची मजूरी ।
दलिद्र—( वि० ) दरिद्री, दीन, दुःखी ।
दलिया—( ना० पु० ) अधकुट्टा ( हिं० ) भरड ।
दलिहन—( ना० स्त्री० ) ज्याची डाळ केली जाते असें धान्य, ( हरभरा, मूग, उडीद वगैरे )
दलील—( ना० स्त्री० ) सबूत ( हिं० ) कारण, सिद्धता, युक्ति, हेतु, सबब, प्रमाण, गमक ।
दलेती—( ना० स्त्री० ) हातानें दळण्याचें जातें ।

दवा—
दवाई— } ( ना० स्त्री० ) ओषधि; औषध ।

—दारू—( ना० स्त्री० ) औषधपाणी ।

—दाना—( ना० पु० ) औषधालय ।

दवागि—( ना० स्त्री० ) दावाग्नि; दावानल ।

दवात—( ना० स्त्री० ) मसीपात्र ( हिं० ) दौत ।

दवारि—( ना० पु० ) "दवागि" पहा ।

दशहरा—( ना० पु० ) दसरा; विजयादशमी ।

दसौंधी-धी—( ना० पु० ) वन्दी ( हिं० ) भाट, गायक, प्रशंसक; स्तुति पाठक ।

दस्त—( ना० पु० ) हात; शौच; ढाळ; हागवण ।

—बरदारी—( ना० स्त्री० ) त्याग, माघार ।

—बस्ता—( वि० ) समित्पाणी; हातजोडून ।

—खत—( ना० पु० ) सही; हस्ताक्षर ।

—कार—( ना० पु० ) कलाभिज्ञ ।

—कारी—( ना० स्त्री० ) हस्त कौशल्य ।

—गर्दा—( ना० पु० ) अंगावर काढलेलें तोंडी

—गीरी—( ना० स्त्री० ) मदत, कर्ज ।

दस्तन्दाजी—( ना० स्त्री० ) ढवळाढवळ; लुडबुड ।

दस्तक—( ना० स्त्री० ) दारावार थपकी मारणें ।

दस्ता—( ना० पु० ) मुठिया ( हिं० ) दांडा; कागदाचा दस्ता ।

दस्तावेज—( ना० स्त्री० ) तमस्सुक ( हिं० ) कर्ज-खत; ऋणपत्र ।

दस्ती—( वि० ) हातचा; ।

दस्तूर—( ना० पु० ) रसम ( हिं० ) रिवाज, तऱ्हा पद्धति; प्रकार ।

दस्तूरी—( ना० स्त्री० ) दलाली; रस्त्यावर घेतला जाणारा टोल ।

दसा—( ना० पु० ) वैश्यापैकीं एक जात ।

दह—( ना० पु० ) खोलपाणी; पाण्यांतील भोंवरा ।

दहक—( ना० स्त्री० ) दाह; चमक ।

दहकना—( अ० क्रि० ) जलना ( हिं० ) जळणें, नाशपावणें; पश्चात्ताप पावणें ।

दहकाना—( स० क्रि० ) जलना ( हिं० ) जाळणें, नष्ट करणें; पश्चात्ताप करविणें ।

दहना—
दहिना— } ( वि० ) दक्षिण; उजवा ।

दहर—( ना० पु० ) लहान उंदीर; भाऊ; बालक; नरक; वरुण ।

दहल—( ना० स्त्री० ) भयानें कंपित होणें ।

दहलना—( अ० क्रि० ) कांपणें; हालणें; भयभीत होणें; भिणें ।

दहलाना—( स० क्रि० ) परेशान करना ( हिं० ) भयभीत करणें; घाबरविणें ।

दहसेरा—(ना० पु०) दहाशेरी; दहा शेराचें वजन ।

दहाई—( वि० ) दहम ।

दहाड़ना—( अ० क्रि० ) डरकाना ( हिं० ) डरकाळी फोडणें; गरजणें ।

दहाना—( स० क्रि० ) "दहकाना" पहा ।

दहिना—( वि० ) "दहना" पहा ।

दहुँ*—( अ० ) अथवा; किंवा ।

दहेड़ी—( ना० स्त्री० ) दहिहंडी; दह्याचें भांडें ।

दहेज—( ना० पु० ) दायज ( हिं० ) स्त्री-धन, अंदेण यौतुक ।

दहेंगर—( ना० पु० ) "दहेंडी" पहा ।

दाइजा
दाइज } ( ना० पु० ) "दहेज" पहा ।

दाईं—( वि० ) दहने ओर ( हिं० ) उजवी कडील ।

दाऊ—( ना० पु० ) मोठा भाऊ, काका; बलदेव ।

दाऊद—( सर्वनाम ) पैगंबर ।

दाएँ बाएँ—( अ० ) उजवी-डावी-कडे ।

दाँड़—( ना० पु० ) जुर्माना (हिं०) दंड, शिक्षा, अन्याय, इजा ।

दांडा तेडा—( ना० पु० ) दोन जमिनींमधील हद्द किंवा खूण ।

दाँडी—( ना० पु० ) खेवक ( हिं० ) वल्हविणारा ।
( ना० स्त्री० ) तराजू, तागड़ी ।

दाँतन ( ना० पु० ) "दातुन" पहा ।

विहाने—( अ० ) तड़के ( हिं० ) पहाटे, जल्दीनें ।
विहार—( ना० पु० ) दिल बहलाव ( हिं० ) मनरंजन बिहारप्रांत ।
विहारी—( ना० पु० ) विहारचा मनुष्य ।
वी—( ना० स्त्री० ) स्त्री, ( "बीवी" शब्दाचें संक्षिप्त रूप ।
वींड—( ना० स्त्री० ) ढेर ( हिं० ) ढीग, गाठोडें ।
वींडा—( ना० पु० ) कागदाचा किंवा गवताचा भारा किंवा विंडा ।
वींधना—( स० क्रि० ) छेदना ( हिं० ) भोंक पाडणें ।
वीअड़—( ना० स्त्री० ) बियाचीं रोपें ।
वीघा—( ना० पु० ) बिघा, एक बिघा जमीन ।
वीच—( ना० पु० ) मध्य, अन्तर, भेद ( अ० ) मध्यें; आंत, मधील ।
—की उंगली—( ना० स्त्री० ) मधलें बोट ।
—विचाव—( ना० पु० ) मध्यस्थी ।
—वीच—( अ० ) अगदीं मधोमध ।
वीछू—( ना० पु० ) वृश्चिक, विंचू ।
वीजक—( ना० पु० ) पाठविलेल्या मालाची याद ।
वीजना—( ना० पु० ) पंखा ।
वीजावर खण्ड—( ना० पु० ) जंगल, वन, रान ।
वीजी—( ना० स्त्री० ) नेवला ( हिं० ) मुंगुस; नकुल ।
वीझना—( स० क्रि० ) शिंगानें, उकरणें, ढकलणें, कोपर खली मारणें ।
वींट—( ना० स्त्री० ) चिमण्याची विष्टा, मल ।
वीटना—( अ० क्रि० ) छीतरना ( हिं० ) अस्ताव्यस्त होणें, पसरणें ।
वीठा—( ना० पु० ) गोंडरी ( हिं० ) जुम्बल ।
वीड़ा—( ना० पु० ) विडा; तरवारीची मूठ ।
वीतना—( अ० क्रि० ) गुजरना ( हिं० ) संपणें, पुरा होणें, जाणें ( गमावणें )
वीता—( ना० पु० ) "वालिस्त" पहा ।
वीनना—( स० क्रि० ) बुनना ( हिं० ) विणणें, बनविणें निर्माण करणें ।
वीनाई—( ना० स्त्री० ) दृष्टि, नजर, दूरदृष्टि ।

वीवी—( ना० स्त्री० ) स्त्री, बायको, भार्या ।
वीमा—( ना० पु० ) विमा ।
वीमार—( वि० ) अजारी, अस्वस्थ, दुखणेकरी ।
—खाना—( ना० पु० ) दवा खाना ।
—दारी—( ना० स्त्री० ) रोग्याची शुश्रूषा ।
वीमारी—( ना० स्त्री० ) रोग, दुखणें, आजार ।
वीरन—( ना० पु० ) भाई ( हिं० ) भाऊ, बन्धू ।
वीरा—( ना० पु० ) "बीड़ा" पहा ।
वीरी—( ना० स्त्री० ) विडा खाल्यानें तोंडाला आलेला, रंग ।
वीस—( वि० ) वीस २० ।
वीसा—( ना० पु० ) वीस नखाचा कुत्रा ।
वीसी—( ना० स्त्री० ) एक माप, धान्य मोजण्याचें माप ।
वुन्दा—( ना० पु० ) नुक्ता ( हिं० ) टिंब; शून्य ।
वुन्दिया—( ना० स्त्री० ) बुन्दी, एक मिठाई ।
वुन्देला—( ना० पु० ) बुन्देलखंड का रहिवासी ।
वुकनी—( ना० स्त्री० ) चूर्ण; पूड; पीठ ।
वुक्का—( ना० पु० ) वस्त्रगाळ चूर्ण, पूड ।
वुक्की—( ना० स्त्री० ) खांद्यावर घेण्याचें वस्त्र ।
वुझना—( अ० क्रि० ) गुल होना ( हिं० ) विझणें मालविणें, सैल पडणें, ।
वुझाना—( स० क्रि० ) विझविणें, मालविणें, समजाविणें समजून सांगणें शिकविणें ।
वुझौवल—( ना० स्त्री० ) पहेली ( हिं० ) कोडें ।
वुड्ढा—( वि० ) बूढा, पुराना, ( हिं० ) जुना, म्हातारा ।
वुड़भस—( वि० ) स्वतःला तरुण मानणारा म्हातारा ।
वुढ़वा—( वि० ) डोकरा ( हिं० ) म्हातारा, वृद्ध, जुना ।
वुढ़ापा—( ना० पु० ) बुढाई ( हिं० ) म्हातारपण ।
वुढ़िया—( ना० स्त्री० ) बूढ़ी ( हिं० ) वृद्ध स्त्री ।
वुण्डा—( ना० पु० ) कर्ण भूषण विशेष ।
वुत—मूर्ति ।
वुत-त्त—( ना० पु० ) जुवा खेलण्याची जागा, ठोसा, बुक्की ।

बुताना—( स० क्रि० ) गुल करना ( हिं० ) घालविणें, मालविणें; विझविणें ।
बुत्ता—( ना० पु० ) ठगहाई ( हिं० ) धोका, कपट, धूर्तता, लुच्चेगिरी ।
बुद्‌बुद्—( ना० पु० ) बुलबुला ( हिं० ) बुडबुडा ।
बुदबुदाना—( अ० क्रि० ) पुटपुटणें, बडबडणें ।
बुनना—( स० क्रि० ) विणणें ।
बुरा—( वि० ) वाईट, दुष्ट, नीच, अधम निरुपयोगी ।
बुराई—( ना० स्त्री० ) बुरापन ( हिं० ) दुष्टता, अधमता; खोटेपण, नीचता ।
बुलबुला—
बुलका— } ( ना० पु० ) "बुदबुदा" पहा ।
बुलवाना—( स० क्रि० ) बुला भेजना ( हिं० ) बोलाविणें, बोलावणें पाठाविणें ।
बुलाक—( ना० पु० ) स्त्रियांच्या नाकांतील एक दागिना ।
बुलाना—( स० क्रि० ) "बुलवाना" पहा ।
बुलवा भेजना—( स० क्रि० ) "बुलवाना" पहा ।
बुलालाना—( स० क्रि० ) बोलावून घेऊन येणें ।
बुलाहट—( ना० स्त्री० ) पुकार ( हिं० ) हाक, बोलावणें आमन्त्रण ।
बुल्ला—( ना० पु० ) "बुदबुदा" पहा ।
बुहनी—( ना० स्त्री० ) पहिली विक्री बोणी ।
बुहरी—( ना० स्त्री० ) भाजलेलें धान्य ।
बुहारन—( ना० स्त्री० ) कूड़ा ( हिं० ) केर, कचरा ।
बुहारना—( स० क्रि० ) बटोरना ( हिं० ) झाडणें, केर काढणें, साफ करणें ।
बुहारी—( ना० स्त्री० ) बढ़नी ( हिं० ) झाड़नी !
बुहावू—( ना० पु० ) फ़राश ( हिं० ) झाडू, भंगी ।
बूआ—( ना० स्त्री० ) फूफू ( हिं० ) आत्या ।
बूँद—(ना० स्त्री०) थेंब, पावसाची झड, शिंतोडा, ठिपका ।
बूँदी—( ना० स्त्री० ) पावसाची झड ।
बूकना—( स० क्रि० ) पीसना ( हिं० ) पूड करणें, दळणें चूर्ण करणें, कुसकरणें ।
बूका—( ना० पु० ) "बुकनी" पहा ।
बूचना—( अ० क्रि० ) दबणें; दबून बसणें ।
बूचा—( वि० ) कनकटा ( हिं० ) कर्ण हीन, कान, नसलेला ।
बूझ—( ना० स्त्री० ) समज, ज्ञान, बुद्धि, ।
बूझना—( ना० स्त्री० ) समजणें, जाणणें, विचार करणें ।
बुझाई—( ना० स्त्री० ) शिक्षा ( हिं० ) शिकवण, पाठ, समज, ज्ञान, परिचय ।
बूट—( ना० पु० ) चना ( हिं० ) हरबरा ।
बूटा—( ना० पु० ) कशीदाचें काम, झुडुप ।
बूटी—( ना० स्त्री० ) जड़ी ( हिं० ) औषधि ।
बूड़ना +—( अ० क्रि० ) डूबना ( हिं० ) बुडणें, बुडूणें, मरणें ।
बूड़ी—( ना० स्त्री० ) भाल्याचें फळ, बर्चीची धार, भाल्याचें टोंक ।
बूढ़ा—( वि० ) पुराना ( हिं० ) म्हातारा, जुना ।
बूढ़ी —( ना० स्त्री० ) पुरानी ( हिं० ) म्हातारी, जुनी ।
बूता—( ना० पु० ) बल, सामर्थ्य, शक्ति, योग्यता ।
बूबू—( ना० स्त्री० ) बहिण; लहान बहिण, लाडकी बहिण ।
बूरा—( ना० पु० ) स्वच्छ केलेली खड़ी साखर लाकडाचा भुस्सा; लाकडाचा चुरा ।
बे—( अ० ) अबे ( हिं० ) अरे, तुच्छता-बोधक संबोधन ।
—हया—( वि० ) निर्लज्ज ।
बेंग—( ना० पु० ) मेंढक ( हिं० ) बेटकुळी; दर्दुर ।
बेंट—( ना० पु० ) कब्जा ( हिं० ) मूठ, दांडा ।
बेंडा—( वि० ) टेढ़ा ( हिं० ) वाकडा, तिरवा ।
बेंधना—( स० क्रि० ) चुभाना ( हिं० ) भोसकणें, विंधणें ।
बेईमान—( वि० ) काफ़िर ( हिं० ) अप्रामाणिक; अश्रद्ध, बेईमान, कृतघ्न ।
बेईमानी—( ना० स्त्री० ) कृतघ्नता, बेईमानी; अधर्म, अश्रद्धा ।

बेफायदा—( वि० ) बेतरतीब ( हिं० ) अव्यवस्थित, अनियमित ।
बेकार—( वि० ) फ़िज़ूल ( हिं० ) व्यर्थ; उगाच; निष्कारण, फाजिल, निरुपयोगी; निरुद्योगी, रिकामा ।
बेग—( ना० पु० ) तेज़ी ( हिं० ) घाई; शीघ्रता ।
—से—( अ० ) घाईनें, जल्दीनें ।
बेगार—( ना० पु० ) विन मजूरीचें सरकारी काम, जबरदस्तीनें करविलेलें काम ।
बेचना—( स० क्रि० ) विकविणें. विक्री करणें ।
बेचारा—( वि० ) लाइलाज ( हिं० ) विचारा, दुःखी, असहाय, गरीब, दुर्दैवी ।
बेचू—( ना० पु० ) विकणारा ।
बेजू+—( ना० पु० ) नेउला ( हिं० ) मुंगूस ।
बेझी+—( ना० पु० ) लक्ष्य, चिन्ह, निशान ।
बेटवा+—( ना० पु० ) लड़का ( हिं० ) मुलगा, पुत्र ।
बेटा—( ना० पु० ) पुत्र, मुलगा ।
बेटी—( ना० स्त्री० ) लड़की ( हिं० ) मुलगी ।
बेठन—( ना० पु० ) लपेटन ( हिं० ) वेष्टण ।
बेड़—( ना० पु० ) वाड़ा ( हिं० ) कोंडवाडा, फाटक ।
बेड़ा—( ना० पु० ) गावांचा किंवा जहाजांचा समूह ।
बेडौल—( वि० ) बदशक्ल ( हिं० ) कुरूप ।
बेढ़ना—( स० क्रि० ) घेरना ( हिं० ) घेरणें, वेढा घालणें ।
बेढब—( वि० ) भद्दा ( हिं० ) कुरूप, विक्षिप्त ।
बेढ़ा—( वि० ) टेढ़ा ( हिं० ) वाकडा, तिरपा ।
बेताल—( ना० पु० ) भूत, सैतान ।
बेदख़ल—( वि० ) बहिष्कृत, उधळविलेलें, वगळलेला; गाळलेला ।
बेदख़ली—( ना० स्त्री० ) कब्जा घेणें, ताबा हिसकावून घेणें ।
बेदना—( ना० स्त्री० ) दर्द ( हिं० ) वेदना, दुःख ।
बेदम—( वि० ) बिना साँस ( हिं० ) बेदम, दमलेला ।
बेधड़क—( वि० ) बेख़ौफ ( हिं० ) निर्भय ।
बेन—( ना० स्त्री० ) बाँसुरी (हिं०) मुरली, अलगुजा ।
बेना+—( ना० पु० ) पंखा ।
बेनी—( ना० स्त्री० ) वेणी ।
बेबस—( वि० ) बेचारा ( हिं० ) असहाय, निराश्रित ।
बेबसी—( ना० स्त्री० ) बेचारगी ( हिं० ) असहायता ।
बेमज़ा—( वि० ) बेज़ायका ( हिं० ) अरुचकर ।
बेमानी—( वि० ) निरर्थक, मूर्खपणाचें ।
बेलदार—( ना० पु० ) फावडा चालविणारा, उकरणारा ।
बेलन—( ना० पु० ) रूळ, लाटणें ।
बेलना—( स० क्रि० ) पोळ्या लाटणें, चपाती लाटणें ।
बेलनी—( ना० स्त्री० ) टहनी ( हिं० ) शाखा, लता ।
बेलौ—( वि० ) उदासीन, म्लान, निराश, हताश ।
बेलौस+—( ना० पु० ) स्पष्टवक्ता, कोणाची भीड़ न बाळगणारा ।
बेवकूफ़—( वि० ) मूढ, मूर्ख, अजाण, अज्ञान ।
बेवकूफ़ी—( ना० स्त्री० ) मूढ़ता, मूर्खता, अजाणता ।
बेवरा—( ना० पु० ) ब्योरा ( पिं० ) हकीकत, इत्थंभूत हकीकत ।
बेवरेवार—( अ० ) स्पष्ट, खुलासेवार, क्रमश ।
बेवहरिया—( ना० पु० ) कर्ज देणारा ।
बेवहार—( ना० पु० ) चाळ, व्यवहार, रीति, पद्धत ।
बेवान+—( ना० पु० ) विमान ।
बेसन—( ना० पु० ) हरबर्याचें पीठ ।
बेसनौटी—( ना० स्त्री ) हरभऱ्याची भाकरी ।
बेसर+—( ना० पु० ) नाकांतील एक भूषण ।
बेपड़—( ना० पु० ) ऊसर ( हिं० ) नापीक जमीन ।
बेहिना+—( ना० पु० ) धुनिया ( हिं० ) पिंजारी ।
बेहोश—( ना० स्त्री० ) अचेतनता, बेशुद्धी ।
बैंगन—( ना० पु० ) वांगी, वांग्याची भाजी ।
बैंगनी— } ( वि० ) निळा, वांग्याच्या रंगाचा ।
बैंजनी— }
बैंटा—( ना० पु० ) कुदळ किंवा कुऱ्हाडीचा दांडा ।
बैंदा—( ना० पु० ) टिकुली ( हिं० ) टिकली, टिळा, गन्ध, कुंकु ।
बैंदी—( ना० स्त्री० ) बिंदू, कुंकु ।
बैकाल—( ना० पु० ) तिसरा प्रहर ।
बैगन—( ना० पु० ) बैगन, मालगाडीचा डबा ।

बैठक—( ना० स्त्री० ) } बसण्याची खोली ।
बैठका—( ना० पु० ) } बाक, दिवाणखाना ।
बैठक—( ना० स्त्री० ) आसन, बैठक व्यायाम ।
बैठना—( अ० क्रि० ) बसणें, रिकामा असणें ।
बैठवा—( वि० ) चिपटा ( हिं० ) सपाट; चापट ।
बैठाना— } बैठारना— } बैठालना— } (स०क्रि०) बसविणें, ठेवणें; स्थापणें !
बैतरा+—( ना० स्त्री० ) एक प्रकारची सुंठ ।
बैद—( ना० पु० ) हकीम ( हिं० ) वैद्य ।
बैदक—( ना० पु० ) वैद्यक ।
बैन—( ना०स्त्री०) अलगूज, मुरली, वाणी ।
बैना—( ना० पु० ) शिरोभूषण, स्त्रियांचा एक दागिना ।
बैमात्र—( ना० पु० सौतेला भाई ( हिं० ) सावत्रबंधू ।
बैयान — } बियान— } ( ना० पु० ) प्रसव, जन्म, उत्पत्ति ।
बैयाना—( स० क्रि० ) उत्पत्ति करविणें, प्रसवविणें ।
बैर—( ना० पु० ) शत्रुता, शत्रुत्व ।
बैरंग—( वि० ) महसूल तलब ( हिं० ) अदत्तमूल्य ।
बैराग—( ना० पु० ) वैराग्य, त्याग ।
बैरागिन—( ना० स्त्री० ) तपस्विनी, बैरागीण ।
बैरन—( ना० स्त्री० ) वैरीण ।
बैस—( ना० पु० ) वैश्य ।
बैसंदर+—( ना० पु० ) अग्नि, वैश्वानर ।
बैसवाड़ा—( ना० पु० ) वैश्यांची वस्ती, पेठ ।
बैसाख—( ना० पु० ) वैशाख ।
बैसाखा—( ना० पु० ) मुसळ ।
बैसाखी—( ना० स्त्री० ) थूनी ( हिं० ) सोटा, मुसळ, वैशाखी पीक ( दुसरें पीक ) ।
बैसाँडू—( वि० ) आळशी, सुस्त, जड ।
बोआई—( ना० स्त्री० ) पेरणी, पेरणीचा घात, पेरणीची योग्य वेळ ।
बोआना—( स० क्रि० ) पेरविणें ।
—( अ० क्रि० ) सुजणें, घाणमारणें-येणें ।
बोआरा—( ना० पु० ) पेरण्यांची वेळ-घात ।
बोइया—( ना० स्त्री० ) छोटी टोकरी ( हिं० ) लहान बुट्टी ।
बोच+—( ना० पु० ) मगर, सुसर ।
बोचा+—( ना० पु० ) एक प्रकारची पालकी ।
बोझ—( ना० पु० ) ओझें, भार ।
बोझना—( स० क्रि० ) लादना ( हिं० ) लादणें, ओझें घालणें ।
बोझल } बोझेल } ( वि० ) भारी, जड, वजनदार, जाडा ।
बोटा—( ना० पु० ) लाकडाचा ओंडका ।
बोटी—( ना० स्त्री० ) माँसाचा तुकड़ा ।
बोरना—( स० क्रि० ) डुबाना ( हिं० ) बवविणें ।
बोएडी—( ना० स्त्री० ) वनस्पति बीज ।
बोताम+—( ना० पु० ) बटन, बटण ।
बोतू+—( ना० पु० ) बकरा, बोकड ।
बोदली—( ना० स्त्री० ) भोळी स्त्री० ।
बोदा —( वि० ) कमज़ोर ( हिं० ) दुर्बळ, दुबळा ।
बोना—( स० क्रि० ) पेरणें; बी लावणें ।
बोनी—( ना० स्त्री० ) पेरणीचा हंगाम ।
बोर—( ना० पु० ) घुंघरू; घागऱ्या; पैंजण ।
बोरा—( ना० पु० ) पोतें, कोथळा ।
बोल—( ना० पु० ) वचन, शब्द, संभाषण ।
—चाल—( ना० स्त्री० ) संभाषण ।
—बाला—( ना० पु० ) यश, भरभराट ।
बोलना—( अ० स० क्रि० ) बोलणें, उच्चारणें ।
बोली—( ना० स्त्री० ) वाणी, भाषा, टोमणा ।
—ठोली—( ना० स्त्री० ) टोमणा ।
—लगाना —( ना० ला० ) लिलावांत मागणें ।
बौंड—( ना० पु० ) लता, वेल ।
बौंडना+—( अ० क्रि० ) लिपटाना ( हिं० ) गुंडाळणें ।
बौंडयाना—( अ० क्रि० ) घूमना (हिं०) फिरणें, चक्कर खाणा ।
बौछार—( ना० स्त्री० ) झड़, पावसाची सर, बंदूकीची फेर ।

बौना—( वि० ) वामन, ठेंगणा।

बौरहा—
बौरा—
बौराहा— } (वि०) पागल (हिं०) मूर्ख, खुळा; खुळचट।

बौराना—( अ० क्रि० ) पागल होना ( हिं० ) खुळे होणें, खूळ लागणें।

बौहड़ना+—( अ० क्रि० ) लौटना ( हिं० ) परत येणें, परतणें, माघारी येणें।

बौहा—( वि० ) पथरीला ( हिं० ) दगडाळ।

बौहाई—( ना० स्त्री० ) उपदंश, रोगिणी स्त्री।

ब्यान—
बियान— } ( ना० पु० ) पैदाइश ( हिं० ) उत्पत्ति, जन्म, वेत, वीण।

ब्याह—( ना० पु० ) विवाह, लग्न।

ब्याहता—( ना० स्त्री० ) विवाहिता, सौभाग्यवती।

ब्याहना—( स० क्रि० ) विवाह करणें।

ब्यारी—
ब्यालू-रू— } ( ना० स्त्री० ) रात्रीचें भोजन।

ब्यौंगा—( ना० पु० ) सुरी, सुरा।

ब्योतना—( स० क्रि० ) वेतणें, माप घेऊन कापड फाडणें।

ब्यौपार—( ना०पु० ) तिजारत ( हिं० ) व्यापार, धंदा।

ब्यौपारी—( ना० पु० ) व्यापारी; धंदेवाईक।

ब्यौरा—
ब्यौरा— } ( ना० पु० ) "बेवरा" पहा विवरण।

---

## भ

भंवेरी—
भंभेरी— } ( ना० स्त्री० ) पतंग, फुल पाखरूं।

भंसुआ+—( ना० पु० ) साधू; फकीर, गोसावी।

भंभोरना—( स० क्रि० ) काटना ( हिं० ) चावणें, फाडून खाणें।

भंवर—( ना० पु० ) चक्र, भोंरा।

भंवर—
भंवरा— } ( ना० पु० ) भोंवरा, भोंगा।

भंवरकली—( ना० स्त्री० ) कुत्र्याच्या गळ्यांतील पट्टा, गळोटी।

भंसार—( ना० पु० ) अंगीठी ( हिं० ) शेगडी धुमी, आगटी।

भई—( क्रि० ) झाली।

भकसा—( वि० ) कडुआ (हिं०) कडू, तुरट।

भकसी—( ना० स्त्री० ) कालकोठरी ( हिं० ) अंधार-कोठरी, गुहा; गुफा।

भकुआ वा—( वि० ) मूर्ख; मूढ; वेडा।

भकुआना—( अ० क्रि० ) कर्तव्यमूढ होणें।

भकोसना—( स० क्रि० ) खाणें; अधाशीपणानें खाणें।

भक्ताई—( ना० स्त्री० ) भक्ती, प्रेम, लाड।

भगत—( ना० पु० ) प्रेमी उपासक।

भगताई—( ना० स्त्री० ) प्रेम, लाड।

भगतानी—( ना०स्त्री० ) भक्तीण, भक्त स्त्री।

भगतिया—( ना० पु० ) नाच्या, नाचणारा मुलगा।

भगन—( ना० पु० ) छंदो नियम; प्रास।

भगना—( अ० क्रि० ) भागना ( हिं० ) पळणें; निसटणें, पोबारा करणें।

भगल—( ना० पु० ) छल ( हिं० ) कपट धोका।

भगलिया—( ना० पु० ) छली ( हिं० ) कपटी, ठक।

भगली—( वि० ) मिथ्या; खोटा, दिखाऊ; लुटीपुटीचा, लटका।

भगवा—( ना० पु० ) गेरुआ ( हिं० ) भगवा।

भगाना—( स० क्रि० ) पळविणें; पराजय करणें।

भगेल—( ना० स्त्री० ) हार ( हिं० ) पराजय; अपयश; दाणादाण।

भगौंहा—( ना० पु० ) "भगवा" पहा।

भगोड़—( वि० ) भग्गू ( हिं० ) पळपुटा।

भग्गुल—( वि० ) "भगोड़" पहा। ( ना० पु० ) दूत।

भङ्ग—( ना० स्त्री० ) भांग–ड़ ( ना० पु० ) भांग ओढणारा मनुष्य।

भङ्गन—( ना० स्त्री० ) मेहेतरानी ( हिं० ) भंगीण ।
भङ्गार—( ना० पु० ) भांग ओढणारा ।
भङ्गी—( ना० पु० ) मेहेतर ( हिं० ) भंगी ।
भंगेरन—( ना० स्त्री० ) भांग विकणारी स्त्री ।
भगोरा—( ना० पु० ) भांग फ़रोख्त ( हिं० ) भांग विकणारा ।
भचक—( वि० ) विस्मित; आश्चर्यचकित; अचम्भित ।
भचकना—( अ० क्रि० ) आश्चर्यचकित होणें ।
भजिजाना—( अ० क्रि० ) भागना ( हिं० ) पळून जाणें; लपणें ।
भंजाना—( स० क्रि० ) रुपया मोडणें ।
भटई—( ना० स्त्री० ) बखान ( हिं० ) स्तुति; गुणगान; खोटी प्रशंसा, भाटाचें काम ।
भटकना—( अ० क्रि० ) भूलना ( हिं० ) भ्रमांत पडणें; भ्रान्त होणें; भकणें ।
भटका—( वि० ) भूल ( हिं० ) भ्रांत; भटकलेला ।
भटकाना—( स० क्रि० ) बहकाना ( हिं० ) भ्रम पाडणें; भकविणें; चुकविणें ।
भटकीला—( वि० ) भययुक्त; भटका; उंडगा ।
भटभेरे—( ना० पु० ) धक्कमधक्का ( हिं० ) धक्काबुक्की; आघात-प्रत्याघात ।
भटियारा—( ना० पु० ) खानावळ वाला; भाजणारा; स्वयंपाकी; एक जात ।
भटियाना+—( अ० क्रि० ) नदीच्या पुरांत वाहून जाणें ।
भठियाला—( वि० ) ओघाबरोबर जाणारा; प्रवाहांत वाहून जाणारा ।
भड़क—( ना० स्त्री० ) चमक; झळक; शोभा घाबरेपणा; दचकणें, भय ।
भड़कना—( स० क्रि० ) चमकणें; झळकणें; दचकणें ।
भड़काना—(स० क्रि०) चमकविणें; झळकविणें दचकविणें; घाबरविणें ।
भड़की—( ना० स्त्री० ) घुड़की ( हिं० ) धमकी; भीति; धाक, भय, झळक ।
भड़कीला—(वि०) चमकदार; शोभागार; दिखाऊ; रानटी ।
भड़केल—( वि० ) जंगली; रानवट; रानटी ।

भड़ङ्ग—( वि० ) सरळ, निष्कपटी; भोळा ।
भड़भड़िया—( वि० ) जल्दबाज़ ( हिं० ) उतावळा ।
भड़भूँजा—( ना० पु० ) भडभुंजा ।
भड़रिया—( ना० पु० ) गारुडी; मंत्री; मायावी; कपटी; लोकांना देवदर्शनें करविणारे ब्राह्मण; निषिद्ध दान घेणारे ब्राह्मण ।
भड़साई—(ना० स्त्री०) भट्टी; मोठीचूल, भडभुंजाचीचूल ।
भड़िहा—( ना० पु० ) चटोर ( हिं० ) चोर, चोरीकरून उपजीविका करणारा ।
भड़िहाई—( ना० स्त्री० ) चोरी, दगा, धोका, कपट, ठगेगिरी, लूट ।
भडुआ-वा—( ना० पु० ) वेश्यापुत्र, भडवा ।
भड़ैत— } ( ना०पु० ) किरायादार ( हिं० ) भाडेकरी,
भड़ैती— } भाडेदार ।
भणक—( ना० पु० ) नीची आवाज़ ( हिं० ) बारीक आवाज़, गुणगुण ।
भणटा—( ना० पु० ) वांगीं, वांग्याची भाजी ।
भणड+—( ना० पु० ) भ्रष्ट, नीच, निर्लज्ज ।
भणडन—( ना० पु० ) प्रतारणा; कपट, ठगेगिरी ।
भणडा—( ना० पु० ) बर्तन ( हिं० ) भांडें; मोठें भांडें ।
भणडार—( ना० पु० ) कोठी, वखार ।
भणडारा—( ना० पु० ) साधूंची पंगत ।
भणडारी—( ना० पु० ) कोठी वाला, वखारवाला, स्वयंपाकी ।
भणडेरिया— } ( ना० पु० ) नक्काल ( हिं० ) नकल्या
भणडेला— } थट्टेखोर मनुष्य, नट ।
भणडेलन—( ना० स्त्री० ) नकली, नटी ।
भण्डोली—( ना० स्त्री० ) उतरण्ड ।
भणडौवा—( ना० पु० ) फक्कड़ ( हिं० ) चुटका, औपरोधिक भाषण, दुरुक्ति, पाचकळ बोलणें ।
भतार—( ना० पु० ) भर्तार, पति ।
भतीजा—( ना० पु० ) पुतण्या ।
भतीजी—( ना० स्त्री० ) पुतणी ।
भत्ता—( ना० पु० ) पुरवणी पगार; प्रवास खर्च ।

भदाक—
भदका— } (ना० पु०) आवाज; भदभद; आवाज।

भदेसल—(वि०) कुढङ्गा (हिं०) कुरूप; बेडौल ओबड; धोबड।

भद्दा—(वि०) बदशक्ल (हिं०) "भदेसल" पहा, अज्ञानी; मूर्ख; निर्दोष।

भद्री—(ना० पु०) सामुद्रिक शास्त्रवेत्ता; डाकू।

भनक—(ना० पु०) आहट (हिं०) शब्द, ध्वनी।

भबक—(ना० स्त्री०) वासाचा किंवा आगीचा भपका।

भबकना—(अ० क्रि०) रागावणें, चिडणें आग लागणें; दौड जाणें।

भबका—(ना० पु०) चुलीचा जाळ, एक भांडें।

भबकाना—(स० क्रि०) पेटविणें, दिवालागणें, चिडविणें घोडयाला टाचभारणें।

भबकी—(ना० स्त्री०) घुड़की (हिं०) धमकी, धमका; विणी, दहावणी।

भब्बड़—(ना० पु०) शोर (हिं०) दंगा, गड़बड; दाणदाण, अव्यवस्था।

भभक—(ना० स्त्री०) "भबक" पहा।

भभकना—(अ० क्रि०) भकभक करणें, बुडबुडणें, वाफ बाहेर सोडणें।

भभर—(ना० पु०) संकट, भय, भीती, घाबरेपणा, उद्वेग; व्याकुलता।

भभराना—(अ० क्रि०) तोंड सुजणें।

भभूका—(ना० पु०) शोला (हिं०) आग, विस्तव; निखारा इंगल।

भभूत—(ना० स्त्री०) भस्म, राख, विभूति।

भभोरना—(स० क्रि०) फाड़खाना (हिं०) फाडून खाणें, त्रास देणें।

भम्भाका—(ना० पु०) बड़ा सूराख (हिं०) मोठें, भोंक, भगदोड।

भम्भीरी—(ना० स्त्री०) फुल पाखरूं।

भम्मो—(ना० स्त्री०) लठ्ठ स्त्री।

भयापा—
भयापत— } (ना० पु०) भ्रातृत्व, बन्धुभाव, मित्रत्व।

भयावना—(वि०) खौफ़नाक (हिं०) भयंकर, भयानक।

भयाहू+—(ना० स्त्री०) लहान भावाची, वायको; वहिनी।

भर—(वि०) पूर्ण भरलेला, भर तितकें।

भरका—(ना० पु०) चुन्याची कळी।

भरकाना—(स० क्रि०) चुना भाजणें।

भरन—(ना० स्त्री० पु०) पावसाची सर, पूर्ति।

भरना—(अ० क्रि०) पूरना (हिं०) भरणें, पूर्ण करणें, लादणें, करणें, देणें, फेडणें।
(ना० पु०) कर्ज, ऋण।

भरनी—(ना० स्त्री०) वाणा विणतांना कापडाच्या, पोटांत घातलेलेलें, सूत।

भरभराना—(अ० क्रि०) सुजणें, फुगणें, सुशोभित, होणें।

भरभरी—(ना० स्त्री०) सूजन (हिं०) सूज; फूग; गळू; व्रण।

भरम—(ना० पु०) भ्रम, भ्रांति; संशय; संदेह, भेद, रहस्य; तत्त्व।

भरमाना—(स० क्रि०) गुमराह करना (हिं०) फसविणें, आडवाटेला, लावणें।

भरमी—(वि०) शक्की (हिं०) संशयी, अश्रद्धाळू।

भरमीला—(वि०) जूमानी (हिं०) भ्रमिष्ट; गोंधळलेला; भ्रांतिबद्ध, दुटप्पी।

भरवाना—(स० क्रि०) भरविणें; लादविणें; फेडविणें; देवविणें।

भरा—(वि०) पूर्ण भरलेला, भरपूर।

भराई—(ना० स्त्री०) भरणें, भरण्याची क्रिया।

भराना—(ना० स्त्री०) भरविणें; पूर्ण करविणें।

भरावट—(ना० स्त्री०) पूर्ती, पूर्णता; भर्ती।

भरैत—
भरैती— } (ना० पु०) किरायादार (हिं०) भाडेकरी।

भरोसा—( ना० पु० ) आशा; आसरा; भरवंसा।

भर्त—
भरत— } (ना०पु०) शिसें व तांबें, याचा मिसळ।

भर्ता—( ना० पु० ) भुर्ता ( हिं० ) भरीत।

भर्रा—( ना० पु० ) डर ( हिं० ) भय; भीति।

भल*—( वि० ) नेक ( हिं० ) चांगला; प्रमाणिक।

भलका×—( ना० पु० ) तड़का ( हिं० ) पहाट।

भलमनसाहत—
भलमन्सी— } ( ना० स्त्री० ) इनसानियत ( हिं० ) मनुष्यत्व, माणुसकी।

भलाई—( ना० स्त्री० ) अच्छाई ( हिं० ) चांगुलपणा।

भल्लुक*—( ना० पु० ) भालू ( हिं० ) अस्वल।

भवैया—( ना० पु० ) नर्तक, नाचणारा।

भस+—( ना० पु० ) "भभूत" पहा।

भसकना—( अ० क्रि० ) गिरना ( हिं० ) पडणें।

भसभसा—( वि० ) थलथला ( हिं० ) पोकळ, लिबलिबीत; ढिसाळ।

भसाना—( स० क्रि० ) वहाविणें, पाडणें।

भहराना—( अ० क्रि० ) कांपणें; अंगावर कांटायेणें; अडखळणें।

भांज—( ना० पु० ) बटाव ( हिं० ) वळ; पील।

भांजना—( स० क्रि० ) पीळ देणें; वळणें; तोडणें।

भांजा—( ना० पु० ) भाचा; बहिणीचा मुलगा।

भांजी—( ना० स्त्री० ) बहिणीची मुलगी; भाची।

भांटा—( ना० पु० ) बैंगन ( हिं० ) वांगें।

भांड—( ना० पु० ) नकलची ( हिं० ) नकल्या; बहुरूपी, निर्लज्ज मनुष्य।

भांडना—( स० क्रि० ) गाली देना ( हिं० ) शिवीदेणें।

भांडिन—( ना० स्त्री० ) नक्क़ाल ( हिं० ) नकलीण।

भांडैती—( ना० स्त्री० ) नकले गिरी।

भांति—( ना० स्त्री० ) तऱ्हा; प्रकार; रीति।

भांपना—( स० क्रि० ) पहाणें; ओळखणें; जाणणें।

भांवर—
भांवरी— } ( ना० स्त्री० ) लग्नाच्या वेळची वधूवराची सप्तपदी।

भाकसी+—( ना० स्त्री० ) हवालात ( हिं० ) कोठरी।

भाखना—( स० क्रि० ) बोलणें; म्हणणें।

भाखा—( ना० स्त्री० ) ज़बान ( हिं० ) भाषा।

भाग—( ना० पु० ) अंश; विभाग; भाग्य; प्रारब्ध।

भागड़—( ना० स्त्री० ) भग्गल ( हिं० ) पळ; पालायन; देशत्याग।

भागना—( अ० क्रि० ) पळून जाणें; निसटणें।

भागमान—( वि० ) किस्मतवर ( हिं० ) भाग्यशाली।

भागमानी—( ना० स्त्री० ) सुदैव; भरभराट।

भागदार—( ना० पु० ) भागीदार; हिस्सेदार।

भाटन—( ना० पु० ) भाटाची बायको।

भाठा—( ना० पु० ) समुद्राची ओहटी।

भाठियाल—( ना० स्त्री० ) उतार।

भाड़—( ना० पु० ) मोठी चूल, भट्टी।

भाड़ा—( ना० पु० ) किराया ( हिं० ) भाडें; दाम।

भाड़ैती—( ना० पु० ) "भड़ैती" पहा।

भाता—( वि० ) सुन्दर; गोंडस, मनमोहन।

भादों—( ना० पु० ) भाद्रपद।

भानमती—( ना० स्त्री० ) नटी, चेटकीण।

भानना—( स० क्रि० ) "भांजना" पहा।

भाना—( अ० क्रि० ) खुश होना ( हिं० ) आनंदित, होणें, चित्त प्रसन्न होणें।

भांपना—( स० क्रि० ) ख्याल करना ( हिं० ) अंदाज; बांधणें, कल्पना करणें।

भाफ—( ना० स्त्री० ) वाफ, धूर।

भाभी—( ना० स्त्री० ) भावज ( हिं० ) भावजय।

भारा—( ना० पु० ) "भाड़ा" पहा।

भालुक—
भालू— } ( ना० पु० ) "भल्लुक" पहा।

भालत—( ना० पु० ) भाला चालविणारा।

भावई—( वि० ) भावी, भविष्यकाळचा।

भावज—( ना० स्त्री० ) "भाभी" पहा।

भावता—( वि० ) चाहीता ( हिं० ) प्रिय, मनोहर, इष्ट।

भाचना—( अ० क्रि० ) "भाना" पहा।
भासना—( अ० क्रि० ) जाहिर होना ( हिं० ) माहीत होणें; ज्ञात होणें; प्रकाशित होणें।
भिगाना— भिगोना— भिजाना— }( स० क्रि० ) गीला करना ( हिं० ) ओला करणें; भिजविणें।
भिजवाना—( स० क्रि० ) पाठविणें।
भिनी—( ना० स्त्री० ) बोंडी, बोंडूक; स्तनमुख; स्तनाग्र; कुचाग्र।
भिड़ा—( ना० पु० ) भेड़िया ( हिं० ) लांडगा।
भिनकना— भिनभिनाना— }( अ० क्रि० ) माशांनीं भरणें, बुजबुजणें; आवाज होणें।
भिनभिनाहट—( ना० स्त्री० ) भिणभिण आवाज।
भिन्नाना—( अ० क्रि० ) नाखुष होणें, डोकें दुखणें।
भिन्सार—( ना० पु० ) विहान ( हिं० ) प्रातःकाल पहाट, सकाळ।
भिलावाँ—( ना० पु० ) बिब्बा।
भिलौनी—( ना० स्त्री० ) बिब्याचें बी।
भी—( अ० ) देखील; सुद्धा; शिवाय।
भीख—( ना० स्त्री० ) भिक्षा, दान।
भीगना—( अ० क्रि० ) गीला होना ( हिं० ) ओलें होणें;
भींचना—( स० क्रि० ) निचोड़ना ( हिं० ) पिळणें, दाबणें; पिळून काढणें।
भींजना—( अ० क्रि० ) "भीगना" पहा।
भीजा—( वि० ) गीला ( हिं० ) ओला।
भीटा—( ना० पु० ) खिंडार; जुनी भिंत; पडकी भिंत; जुने पडकें घर।
भीड़—( ना० स्त्री० ) जमावड़ा ( हिं० ) समुदाय, संघ; गर्दी; दुःख; कष्ट, विपत्ति।
भीत—( ना० स्त्री० ) दीवार ( हिं० ) भिंत।
भीतर—( अ० ) बीच ( हिं० ) मध्यें; आंत।
भीतरिया—( ना० पु० ) आंत असणारा; स्वयंपाकी; भेद्या; घरभेद्या।

भीना—( वि० ) नम ( हिं० ) ओला; घट्ट, ( ना० पु० ) बहिणीचा नवरा।
भुआल*—( ना० पु० ) भूपाल; राजा; नरपति।
भुगतना—( स० क्रि० ) भोगणें, उपभोगणें।
भुगतान—( ना० पु० ) चुकान ( हिं० ) बाकी चुक्ती।
भुगताना—( स० क्रि० ) दंड करविणें, भोगविणें; उपभोगविणें।
भुग्गा—( वि० ) सादा ( हिं० ) साधा; भोळा; मूर्ख।
भुच—( वि० ) उजड्ड ( हिं० ) रानटी; आडदांड; अज्ञानी।
भुचकना—( अ० क्रि० ) आश्चर्य चकित होणें।
भुचकाना—( स० क्रि० ) आश्चर्य चकित करणें।
भुजबन्द—( ना० पु० ) बाजूबन्द।
भुजा—( ना० पु० ) भुज; बाहू।
भुजिया—( वि० ) भाजलेलें; शिजविलेलें।
भुट्टा—( ना० पु० ) मक्याचें कणीस; केस।
भुएडली—( ना० स्त्री० ) एक केसाळ किडा।
भुतना—( ना० पु० ) लहान भूत।
भुतनी—( ना० स्त्री० ) भुतीण।
भुतहा—( वि० ) भुताट लेलें, भूत असलेलें।
भुतयाना—( अ० क्रि० ) भुताचें सोंग घेणें।
भुनना—( अ० क्रि० ) भाजणें; तळणें ( नाण्याची ) मोड घेणें।
भुनवाना—( स० क्रि० ) भाजविणें, तळविणें ( नाण्याची ) मोड घेवविणें।
भुनाई—( ना० स्त्री० ) भाजनावळ।
भुनाना—( स० क्रि० ) "भुनवाना" पहा।
भुरभुरा—( वि० ) वाळलेला व पूड झालेला।
भुरभुराना—( स० क्रि० ) छींटना ( हिं० ) शिंपडणें।
भुराना—( स० क्रि० ) फुसलावणें, भुलविणें।
भुलक्कड़—( वि० ) विसराळू; निष्काळजी; अविचारी।
भुलसना—( अ० क्रि० ) भाजले किंवा तळलें; जाणें।
भुलाना—( स० क्रि० ) विसरविणें; भलत्या मार्गी लावणें; फसविणें, गोंधळविणें।

भुलावा—( ना० पु० ) धोखा ( हिं० ) दंगा; फसवणूक गोंधळ।

भुसेरा-ला / भुसौंड़ा } ( ना० पु० ) भुस्सा किंवा धान्य ठेविण्याची जागा।

भूंसना—( अ० क्रि० ) भूकना ( हिं० ) भुंकणें।

भूख—( ना० स्त्री० ) क्षुधा; भूक।

भूखा—( वि० ) भुकेलेला; भुकी उपवासी।

भूड़—( ना० स्त्री० ) वाळूची जमीन।

भूडोल—( ना० पु० ) भूंइडोल ( हिं० ) भूकम्प।

भूतनी—( ना० स्त्री० ) भुतीण, चेटकीण।

भूभल—( ना० पु० ) गर्म राख ( हिं० ) ऊन राख।

भूमिया—( ना० स्त्री० ) भूदेवतेचा वास; बस्ती।

भूर—( ना० स्त्री० ) दान; भिक्षा; झरा।

भूल—( ना० स्त्री० ) विस्मरण. प्रमाद; चूक।

भूसा—( ना० पु० ) छिलका ( हिं० ) भुसा; टरफळ कोंडा, भुस्सा।

भूलना—( अ० क्रि० ) विस्मरण होणें, चुकणें।

भूसी—( ना० स्त्री० ) "भूसा" पहा।

भेंगा—( वि० ) तिरवें पहाणारा; टरका।

भेंट—( ना० स्त्री० ) मुलाकात ( हिं० ) भेंट, भेट, नजर।

भेंटना—( अ० क्रि० ) भेटणें, एकमेकांना भेटणें।

भेख—( ना० पु० ) भेष ( हिं० ) वेष, बेषांतर।

भेजना—( स० क्रि० ) पाठविणें; स्थित्यन्तर करणें।

भेजा—( ना० पु० ) मगज़ ( हिं० ) मेंदू; डोकं।

भेट—( ना० स्त्री० ) "भेंट" पहा।

भेटी—( ना० स्त्री० ) / भेटू—( ना० पु० ) } डंठल ( हिं० ) चिपाड; देंठ।

भेड़—( ना० पु० ) कोकरूं; वतीचें पोर।

भेड़ना—( स० क्रि० ) बंद करणें, झांकणें।

भेड़ा—( ना० पु० ) "भेड़" पहा।

भेड़िया—( ना० पु० ) लांडगा।

भेड़ी—( ना० स्त्री० ) गाडर ( हिं० ) मेंढी; मेषी।

भेदकिया— / भेदिया— } ( ना० पु० ) जासूस ( हिं० ) शिपाई; गुप्त पोलीस।

भेदी—( ना० पु० ) भेद जाणणारा।

भेदू—( ना० पु० ) भेद्या, गुप्त गोष्ट फोडणारे।

भेली—( ना० स्त्री० ) गुळाचा लाडू।

भेष—( ना० पु० ) लिवास ( हिं० ) रूप; सारखेपणा, पोषाख।

भैंस— / भैंसा— } ( ना० स्त्री० ) म्हैस।

भैंसादाद— / भैंसियादाद— } ( ना० स्त्री० ) दादर नावाचा किडा।

भैया—( ना० पु० ) भाई ( हिं० ) भाऊ; बंधू।

भैयापा—( ना० पु० ) दोस्ती ( हिं० ) मित्रत्व; बंधुत्व।

भैहु— / भैयाहु— } ( ना० ) लहान भावाची बायको।

भौं—( ना० स्त्री० ) आँखकी वरौनी ( हिं० ) भुवई।

भौंकड़ा—( वि० ) मोठा; जाड; स्थूल; विशाल।

भोंकना—( स० क्रि० ) गड़ोना ( हिं० ) खुपसणें टोचणें, रेटणें।

भोंडा—( हिं० ) भद्दा ( हिं० ) कुरूप; बेडौल।

भोंथरा—( वि० ) मोंड; बिनधारेचा; कुंठित।

भोंदू—( वि० ) सादा ( हिं० ) भोळा; मूर्ख; अज्ञ।

भोंपू—( ना० पु० ) शिंग; तोंडाने वाजविण्याचें शिंग।

भोई—( ना० पु० ) भुईलोक; पालखी वहाणारे।

भोकस—( ना० पु० ) टोनहा ( हिं० ) जादूगार; मंत्र-तंत्र करणारा।

भोग—( ना० पु० ) नैवेद्य; उपभोग; सुख; शिवी; अपमान।

भोगना—( स० क्रि० ) बरदाश्त करना ( हिं० ) भोगणें; उपभोगणें; सहन करणें।

भोगा—( ना० पु० ) धोखा ( हिं० ) धोका; दगा; फसवणूक; विश्वासघात।

भोगी—( वि० ) संसारी; चैनी मनुष्य।

भोटिया—( ना० पु० ) भूतानचा रहिवासी।

भोडल—( ना० पु० ) गोष्ट; अभ्रक।

भोटा—( वि० ) गोंठला ( हिं० ) मंद; मोंड।

भोपा—( ना० पु० ) फकीर; जादूगार; मंत्री।
भोभीरा—( ना० पु० ) मणिविशेष; प्रवाळ।
भोर—( ना० स्त्री० ) पहाट, प्रातःकाल।
भौं—( ना० स्त्री० ) "भों" पहा।
भौंकना—( अ० क्रि० ) भुंकणें; नसता वादघालणें।
भौंचाल—( ना० पु० ) भूडोल ( हिं० ) भूकम्प।
भौंर—( ना० पु० ) पाण्यांतील भोंवरा; आवर्त, चक्कर।
भौंरा—( ना० पु० ) भ्रमर; अलि; मधुप।
भौंरियाना—( स० क्रि० ) चकराना ( हिं० ) फिरविणें; चाकाला गति देणें।
भौंसना—( अ० क्रि० ) "भूकना" पहा।
भौंचक—, भौंचका— (वि०) विस्मित; भयभीत; गोंधळलेला।
भौजाई—, भौजी— ( ना० स्त्री० )भावजय; वडील भावाची बायको।
भौना—( अ० क्रि० ) फिरणें; चक्कर खाणें।
भौनास—( ना० पु० ) हत्ती बांधण्याचा खुंटा।
भौमी—( वि० ) ऐहिक; यालोकींचें।

---

## म

मंगता—(ना० पु०) भिखारी ( हिं० ) भिक्षेकरी; याचक।
मंगनी—( ना० स्त्री० ) उधार, कर्ज, वाग्निश्चय।
मंगरा—( ना० पु० ) मेंड ( हिं० ) घराचें आढें।
—खपड़ा—( ना० पु० ) आढ्याची कौलें।
मंगवाना—( स० क्रि० ) मागविणें।
मंगाना—, मंगा भेजना— ( स० क्रि० ) मागविणें, विचारणें, बोलाविणें।
मंगुला—( ना०पु० ) छोटा झब्बा ( हिं० ) लहान झुबका, झुमका।
मंगौड़ी—( अ० क्रि० ) मुंगची ( हिं० ) मुगाची डाळ।
मंजना—( अ० क्रि० ) स्वच्छ होणें; गुळगुळीत होणें।
मंजीरा—( ना० स्त्री० ) झांज।
मंझ—( ना० पु० ) बीच ( हिं० ) मध्य।
मंझना—( अ० क्रि० ) "मंजना" पहा।
मंझला—( वि० ) दर्मियानी ( हिं० ) मधला; मधील।
मंझोला—( वि० ) मधील, मध्यस्थ।
मंझोली—( ना० स्त्री० ) उतारूकरितां हलकी गाडी।
मंड़ना—( स० क्रि० ) गंदना ( हिं० ) कमावला जाणें।
मंडुआ—( ना० पु० ) धान्य विशेष।
मकई—( ना० स्त्री० ) मक्का।
मकड़ा—( ना० पु० ) कोष्टी ( किडा ) माशांचा वाघ।
मकड़ी—( ना० स्त्री० ) कोष्टी, कोळी ( किडें )
मकतब—, मकतबखाना— (ना० पु० ) मदरसा ( हिं० ) शाला, पाठशाला।
मक़दूर—( ना० पु० ) ताक़त ( हिं० ) बल, सामर्थ्य।
मक़रूज़—( वि० ) ऋणी, आभारी।
मक़सद—( ना० पु० ) ग़रज ( हिं० ) हेतु; जरूरी, इच्छा, कारण।
मक़सूम—( ना० पु० ) हिस्सा, भाग, दैव, नशीब।
मकान—( ना० पु० ) घर, रहातें घर, खोली, स्थान।
मकोड़ा—( ना० पु० ) चींटा ( हिं० ) मोठी मुंगी।
मकोम—( ना० स्त्री० ) औषधि विशेष।
मक्कारी—( ना० स्त्री० ) चालाकी ( हिं० ) लबाडी, फसवणूक।
मक्खन—( ना० पु० ) नैनू, माखन ( हिं० ) लोणी।
मक्खी—( ना० स्त्री० ) माशी।
मक्र—( ना० पु० ) दग़ा ( हिं० ) धोका, कपट, ढोंग, सोंग, फसवेगिरी।
मखनिया—( ना० पु० ) लोणी विकणारा।
मख़मल—( ना० पु० ) मखमली कापड; मऊ कापड, ( वि० ) मऊ, नरम।
मग—( ना० पु० ) रास्ता ( हिं० ) रस्ता, मार्ग।
मग़ज़—( ना० पु० ) मेंदू, बुद्धी, गर्व, अभिमान।
मग़ज़ी—( ना० स्त्री० ) कड; किनारा।

मगर—( अ० ) शिवाय, कदाचित, वाचून, फक्त; परन्तु ।
मगर—( ना० पु० ) सुसर ।
मग़रब—( ना० पु० ) पच्छिम; सूर्यास्त ।
मग़रबी—( वि० ) पच्छिमी, पाश्चात्य ।
मगरा—( वि० ) मगरूर; गर्विष्ट; उद्धट, निर्लज्ज; धीट; घमण्डी ।
मगराई—( ना० स्त्री० ) ढिठाई ( हिं० ) धीटपणा ।
मगरी—( ना० स्त्री० ) आडें; अडोळा ।
मग़रूर—( वि० ) "मगरा" पहा ।
मग़रूरी—( ना० स्त्री० ) घमण्ड ( हिं० ) घमेंड; गर्व ।
मगरेला—( ना० पु० ) बीज विशेष; एक प्रकारचें बीं ।
मगसिर—( ना० पु० ) मार्ग-शीर्ष ।
मचक—( ना० स्त्री० ) दर्द ( हिं० ) ठणक; दुखणें; ठुसठुस; राहून राहून कळयेणें ।
मचकना—( अ० क्रि० ) व्यथा होणें; पीडा होणें ।
मचकाना—( स० क्रि० ) हलविणें; डोळे मिचकाविणें ।
मचना—( अ० क्रि० ) पसरणें; केलें जाणें; उठून दिसणें ।
मचलना—( अ० क्रि० ) ज़िद्द करना ( हिं० ) हट करणें दुराग्रह; धरणें; चिडणें; जमीनीवर गडबडा लोळणें ।
मचलाई—( ना० स्त्री० ) दुराग्रह ।
मचला—( वि० ) ज़िद्दी ( हिं० ) हट्टी; दुराग्रही ।
मचालाना—( अ० क्रि० ) अज्ञान, पांघरणें ।
मचलाहट—( ना० स्त्री० ) "मचलाई" पहा ।
मचान—( ना० पु० ) चबूतरा ( हिं० ) रंगभूमि, माला मंच ।
मचाना—( स० क्रि० ) माजविणें, पसरविणें, करणें ।
मचिया—( ना० स्त्री० ) तिपाई ( हिं० ) मेज, स्टूल ।
मच्छड़—( ना० पु० ) मशक, डास ।
मच्छी—( ना० स्त्री० ) मासा, चुंबन, मुका ।
मछ—( ना० पु० ) मोठा मासा ।
मछन्दर—( ना० पु० ) माकड, उंदीर, ठोंब्या, गुड्डी, फकीर ।

मछली—( ना० स्त्री० ) मासा, मासळी ।
मछुआ— } ( ना० पु० ) मल्लाह ( हिं० ) धीवर,
मछुआ— } कोळी कैवर्त ।
मज—( वि० ) पका ( हिं० ) पिकलेला, परिपक, सुरलेला, पिकून मउ झालेला ।
मज़कूर—( ना० पु० ) सांगितलेली गोष्ट, विधान ।
मज़कूरी—( ना० पु० ) हुकुमनामा घेऊन जाणारा ।
मज़दूर—( ना० पु० ) मजूर, कामकरी, ओझें, वहाणारा,
मज़दूरी—( ना० स्त्री० ) काम, मजूरी, कष्ट ।
मज़नून—( ना० पु० ) पागल ( हिं० ) खुळा, वेडा, प्रेम वश झालेला ।
मजबूत—( वि० ) पुष्ट, बळकट, टिकाऊ, भरीव ।
मजबूती—( ना० स्त्री० ) पुष्टी, बळकटी, भरीवपणा ।
मजबूर—( वि० ) आवश्यक, जरूरीचें, जुलमाचें ।
मज़बूरन—( अ० क्रि० ) विवश ( हिं० ) अवश्य, जलनाइलाजानें ।
मज़बूरी—( ना० स्त्री० ) आवश्यकता, जरूरी, नाइलाज ।
मजमा—( ना० पु० ) भीड़ ( हिं० ) गर्दी, जमाव, मंडली, सभा ।
—आम—( ना० पु० ) सार्वजनिक सभा ।
—खिलाफ क़ानून या नाजायज़—( ना० पु० ) बेकायदेशीर सभा ।
मजमून—( ना० पु० ) विषय, लेख, अर्थ, आशय ।
मज़रुआ—( वि० ) जोता ( हिं० ) नागरलेलें ।
मज़लिस—( ना० स्त्री० ) समाज, सभा ।
—मीर—( ना० पु० ) सभापति, अध्यक्ष ।
मज़लीसी—( वि० ) सामाजिक, समाज विषयक ।
मज़हब—( ना० पु० ) धर्म, पंथ, जात, ब्रीद ।
मज़हबी—( वि० ) धार्मिक, धर्म विषयक ।
मज़ा—( ना० पु० ) चव, स्वाद, आनन्द, गम्मत ।
मज़ाक—( ना० पु० ) हंसी, ठट्ठा ( हिं० ) हंसे, थट्टा, विनोद ।
मज़ाज—( वि० ) अधिकृत, कायदेशीर ( ना० पु० ) अधिकार, ताबा, रूपक ।

मज़ाजी—( वि० ) असत्य खोटें, मोह उत्पन्न करणारें, मायावी, औपचारिक, लाक्षणिक।
मज़ाल—( ना० स्त्री० ) बल, अधिकार, योग्यता, कुवत; सामर्थ्य।
मजीट—( ना० पु० ) लालरंग।
मज़ीत—( वि० ) सस्ता ( हिं० ) स्वस्त, जुना, वापरलेला।
मजीरा— / मंजीरा —( ना० पु० ) वाद्य विशेष, झांझ।
मझला—( वि० ) बीचका ( हिं० ) मधील, मधला।
मझार—( ना० पु० ) मध्य, मध्यबिन्दू।
मझारी—( अ० ) मध्यें, आंत।
मझेली— / मझोली—( ना० स्त्री० ) दोन चाकाची गाडी।
मञ्च— / मञ्चा—( ना० पु० ) मचान ( हिं० ) उच्चासन, पलंग सिंहासन, बाजलें।
मञ्जन—( ना० पु० ) दंत मंजन, दांत घासण्याची पूड।
मञ्जार—( ना० स्त्री० ) झाडाचा, मोहोर।
मञ्जूर—( वि० ) स्वीकृत, क़बूल मान्य।
मञ्जूरी—( ना० स्त्री० ) स्वीकृती, कबूली, मान्यता।
मटक— / मटकन—( ना० स्त्री० ) नखरा, हाव भाव, विलास, गमजा।
मटकना—( अ० क्रि० ) डोले मिचकावणें, डोला घालणें, टक लावणें, ( ना० पु० ) माठ।
मटका—( ना० पु० ) माठ डेरा; मातीचें; मोठें भांडे।
मटकाना—(स० क्रि०) डोले मिचकाविणें; डोळे घालणें।
मटकी—( ना० स्त्री० ) मातीचें लहान भांडें, लहान मुलाचें चोखणें।
मटकोठा—( ना० पु० ) मातीचें घर।
मटर—( ना० पु० ) वाटाणा गश्त ( ना० पु० ) शत पावली, पाय मोकळे करणें।
मटरीला—( वि० ) वाटाणें, घातलेला।
मटियाना—( स० क्रि० ) माखणें, माती लावणें, काना डोला करणें, सहणें।

मटियाफूँस—( वि० ) कमज़ोर, व्यर्थ ( हिं० ) अशक्त, निरर्थक, नादान।
मटियारा—( ना० पु० ) चांगली उपजाऊ जमीन।
मटियाला—( वि० ) मातकठ; मातीचा, मातट।
मटियाव—( ना० पु० ) उपेक्षा, उदासीनता, आपमान, कांकू।
मट्टी—( ना० स्त्री० ) माती; मृत्तिका।
मट्ठा— / मट्ठर—( ना० पु० ) कुन्द, सुस्त, ( हिं० ) ढ, आळशी किंवा सुस्त मनुष्य।
—पन—( ना० पु० ) आलशीपणा, सुस्तपणा।
मठड़ी—( ना० स्त्री० ) एक मिठाई विशेष।
मड़वा—( ना० पु० ) यज्ञस्तम्भ, मुहूर्तमेढ।
मड़ियाना—( स० क्रि० ) चिपकाना ( हिं० ) चिकटाविणें।
मडुआ—( ना० पु० ) अन्न विशेष।
मडैया—( ना० स्त्री० ) झोंपडी; कुटी; छप्पर।
मड़ोड़ा—( ना० पु० ) पोटशूल; पीळ।
मढ़न—( ना० स्त्री० ) आवरण, अस्तर, झांकण।
मढ़ना—( स० क्रि० ) मढविणें; झाकणें।
मढ़ी—( ना० स्त्री० ) "मडैया" पहा।
मणियार—( ना० पु० ) मण्यार, काकणें विकणारा।
मण्डलिया—( ना० पु० ) कपोत विशेष।
मण्डली—( ना० स्त्री० ) ज़मायत ( हिं० ) सभा, लोक समूह, कंपनी, मंडळ।
मण्डवा—( ना० पु० ) मांडव; बगीच्या; लतामंडप।
मण्डा—( ना० पु० ) पेढा, दुधाची मिठाई।
मत—( ना० पु० ) राय ( हिं० ) मत, विचार, ( अ० ) नहीं ( हिं० ) नकार, प्रतिबन्ध।
मतना—( ना० पु० ) एक प्रकारचा ऊस।
मतराना—( स० क्रि० ) समजविणें; मनवळविणें।
मतलब—( ना० पु० ) प्रयोजन, अर्थ हेतु।
—का यार—( वि० ) स्वार्थी।
मतलाना—( अ० क्रि० ) मळमळणें।
मता—( ना० पु० ) मत, अभिप्राय।

मतीरा—( ना० पु० ) तरबूजा ( हिं० ) टरबूज।
मथनिया—
मथनी— } ( ना० स्त्री० ) रवि, घुसळणी, लोणी, काढण्याची रवि।
मथानी—( ना० स्त्री० ) ताक घुसळण्याचें भांडें।
मथौट—( ना० पु० ) चंदा ( हिं० ) वर्गणी, पट्टी।
मथौरा—( ना० पु० ) छाता ( हिं० ) छत्री।
मदद—( ना० स्त्री० ) सहायता, मदत; कुमक।
—गार—( ना० पु० ) मदतदेणारा।
मदमाता—( वि० ) मत्त; झिंगलेला।
मदरसा—( ना० स्त्री० ) पाठशाला; शाला।
मदार—( ना० पु० ) एक प्रकारचें रोप।
मदारी—( ना० पु० ) जादूचा खेल करणारा, दरवेशी।
मदूकड़ी—( ना० स्त्री० ) रोटी, भाकरी।
मधुमल—( ना० पु० ) मोम ( हिं० ) मेण।
मनई—( ना० पु० ) आदमी ( हिं० ) मनुष्य।
मनगढ़ा—( वि० ) बली; पराक्रमी; समर्थ।
मनघटा—( ना० पु० ) विहिरीच्या भोंवतालच्या, चौथरा।
मनचला—( वि० ) उत्साही; साहसी; रसिक।
मनत—( ना० स्त्री० ) स्वीकृती ( हिं० ) स्वीकार।
मनभावन—( वि० ) सुहावना ( हिं० ) मनोहर, सुंदर।
मनवाना—( स० क्रि० ) मानविणें।
मनसा—( ना० स्त्री० ) इच्छा; अभिलाषा; मनोरथ।
मनसेधू*—रू—( ना० पु० ) मनुष्य।
मनहारी*—( वि० ) चितचोर ( हिं० ) मनोहरी।
मनहुँ*—( अ० ) मानौ, गोया ( हिं० ) जणूं, जणूकाय समजा।
मनहूँस—( वि० ) अशुभ, वाईट; दुर्दैवी; ( ना० पु० ) दुर्दैवी मनुष्य।
मना—( ना० पु० ) मनाई; मज्जाव; नकार, प्रतिरोध; अडथळा।
मनादी+—( ना० स्त्री० ) जाहीर नामा मुनादी।
मनाना—( स० क्रि० ) राजी करना ( हिं० ) मनवळविणें, समजविणें, राजी करणें।
मनाही—( ना० स्त्री० ) मुमानियत ( हिं० ) प्रतिबन्ध, मनाई।

मनिहार—( ना० पु० ) बांगडी बनविणारा, मण्यार, कासार।
मनिहारी—( ना० स्त्री० ) जव्हेरी, रत्नाचा, व्यापारी।
मनुहार—( वि० ) मनोहर, सुन्दर ( ना० पु० ) आदर, सत्कार।
मनो*—( अ० ) मानो ( हिं० ) जणूं, समजा।
मनौतिया—( ना० पु० ) जामिनदार।
मनौती—( ना० स्त्री० ) ज़मानन ( हिं० ) तारण, जामनी; हामी; निशा।
मन्त्रणा—( ना० स्त्री० ) सलाह ( हिं० ) सल्ला; विचार; मत; अभिप्राय।
मन्दील—( ना० स्त्री० ) पागोटें, रूमाल।
मन्नत—( ना० स्त्री० ) मनन स्वीकार हामी, व्रत।
मन्शा—( ना० पु० ) इरादा ( हिं० ) हेतु; इच्छा; अभिलाषा, प्रयोजन।
मन्सूख—( वि० ) रद्द ( हिं० ) नष्ट; रद्द; काढून टाकलेला; उच्छिन्न लुप्त।
मनसूखी—( ना० स्त्री० ) तरदीद ( हिं० ) उच्छेद; भंग, लोप; अवरोध; निवृत्ति।
मन्सूबा—( ना० पु० ) "मन्शा" पहा।
मपता-खपत—( ना० स्त्री० ) नापजोख ( हिं० ) वजन माप।
मपना—(अ० क्रि०) नापाजाना ( हिं० ) मापलें, जाणें।
मपवाना—
मपाना— } ( स० क्रि० ) मापविणें।
मपान—( ना० पु० ) नाप ( हिं० ) माप।
ममियाससुर—( ना० पु० ) पति का या पत्नी का मामा ( हिं० ) मामेसासरा।
ममियासास—( ना० स्त्री० ) मामेसासु।
ममीरा—( ना० पु० ) डोळ्याचा अंधुकपणा नाहींसें करणारें औषध।
ममेरा—( वि० ) मामा संबंधी, मामाचा।
ममोड़ा—( ना० पु० ) मड़ौरा, ऐंठन ( हिं० ) पीळ, मुरड।

ममोला—( ना० पु० ) एक पक्षी विशेष।
मया*—( ना० स्त्री० ) रहम ( हिं० ) मेहेरबानी, दया, सहानुभूति, माया; प्रेम!
मयी—( ना०स्त्री० ) दंताळें, कुळव, फणा, इंगा, फांसाठी-उंटीण।
मरक—( ना० पु० ) ववाई ( हिं० ) महामारी, सांथ।
मरकचा—( ना० पु० ) मेंड ( हिं० ) आढ़ें।
मरकत—( ना० पु० ) पन्ना ( हिं० ) हिरवी।
मरकहा— } मरखना— } मरखहा— } (वि०)मरवैया (हिं०) मारका; मारणारा,
मरगजी—( वि० ) मूर्च्छित, कोमेजलेला।
मरघट—( ना० पु० ) मुर्दाघाट ( हिं० ) स्मशान।
मरजिया+—( ना० पु० ) पनडूबा, गोताखोर ( हिं० ) पाणबुड्या, विहीर किंवा नदीमध्यें बुडून जिन्नस काढणारा।
मरना—( अ० क्रि० ) मरणें, अतिशय काम करणें।
मरपच—( वि० ) सड़ा ( हिं० ) सडलेला, घाण।
मरपचना—( अ० क्रि० ) मर-मरेतों काम करणें।
मरभुखा—( वि० ) भुकेनें मेलेला, खादाड।
मरम्मत—( ना० स्त्री० ) दुरुस्तगी ( हिं० ) दुरुस्ती, टीपटाप।
मरवाना—( स० क्रि० ) मारविणें, ठारकरविणें।
मरसा—( ना० पु० ) एक प्रकारची भाजी।
मरहटा—( ना० पु० ) महाराष्ट्राचा रहिवासी, मराठा।
मरहटी—( ना० स्त्री० ) मराठी भाषा।
—घिस-घिस—( ना० स्त्री० ) गोंधळ, बेबंदशाही।
मरहम—( ना० पु० ) मलम।
मराना—( स० क्रि० ) मारविणें, ठोकविणें।
मराल—( ना० पु० ) हंस, राजहंस; मेघ।
मरिच—(ना० स्त्री० ) मिर्ची, काळी मिर्ची।
मरियल—( वि० ) दुबला, कमज़ोर ( हिं० ) नादान, दुर्बळ, अशक्त, किडकिडीत।
मरी—( ना० स्त्री० ) प्लेग; मरणसंख्या मरण।
मरीज़—( वि० ) अजारी, अजार।

मरुवा—( ना० पु० ) एक सुगंधित औषध।
मरोड़— } मरोर— } ( ना० स्त्री० ) "मड़ोड़" पहा, पीळ, हट्ट।
मरोड़ना— } मरोरना— } ( स० क्रि० ) बटना ( हिं० ) पीळ-देणें, घालणें।
मरोड़ा— } मरोरा— } (ना० पु०) पेचिश ( हिं० ) पेच, पीळ, हट्ट।
मर्ज़—( ना० पु० ) रोग, दुखणें, किस मर्ज़ की दवा हो तू कोणत्या उपयोगाचा? अर्थात् निरुपयोगी।
मर्ज़ी—( ना० स्त्री० ) इच्छा, मत, अनुमोदन।
मर्द—( ना० पु० ) पुंस ( हिं० ) मनुष्य, पुरुष, वीर।
—की जात—( ना० स्त्री० ) पुरुष जात।
मर्दानगी—( ना० स्त्री० ) बहादुरी ( हिं० ) शौर्य, वीर्य पुरुषार्थ, पुरुषत्व।
मर्दाना—( वि० ) बहादुराना ( हिं० ) शूर, वीर पुल्लिंगी धीट, धाडसी।
मर्दी—( ना० स्त्री० ) पुंसत्व, पुरुषपणा।
ना—( ना० स्त्री० ) भ्याडपणा, भित्रेपणा।
मर्दुम—( ना० स्त्री० ) जन, मनुष्य, माणूस।
—शुमारी—( ना० स्त्री० ) खाने सुमारी।
मर्दुमी—( ना० स्त्री० ) वीर्य, मर्दपणा।
मलकना—( अ० क्रि० ) ऐटींत चालणें, डुडक्या चालीनें, चालणें।
मलङ्ग—( ना० पु० ) उंच सशक्त मनुष्य, फकीर, एक पक्षी।
मलङ्गी—( ना० पु० ) मिठाच्या खाणींतील मजूर, ( ना० स्त्री० ) खोडकर स्त्री।
मलना—( स० क्रि० ) रगड़ना ( हिं० ) घासणें, चाळणें घासून स्वच्छ करणें।
मलबा—( ना० पु० ) घाण, केर, पडक्या घराचें, सामान मल।
मलमला—( वि० ) दुर्मुखलेला, खारट, मचूल।
मलमास—( ना० पु० ) अधिक महिना, धोंडा महिना।

मलमेंट—( ना० पु० ) सत्यानाश, नाश, विध्वंस।
मलवाई—( ना० स्त्री० ) मलने की मजूरी ( हिं० ) मालिश केल्याची मजूरी, आग रगडल्याची मजूरी।
मलवाना—( स० क्रि० ) चोळविणें, रगडविणें, घासविणें,
मलहम—( ना० पु० ) "मरहम" पहा।
मलाई—( ना० स्त्री० ) साय, दुधाचेंसार।
मलाना—( स० क्रि० ) "मलवाना" पहा।
मलामत—( स० स्त्री० ) निन्दा, धाक, रागे भरणें, शब्द लावणें, आरोप।
मलाल—( ना० पु० ) गम, रन्ज ( हिं० ) उदासीनता, विषणता, खिन्नता।
मलिया+—( ना० स्त्री० ) तेलाची लहान वाटी।
—मेट—( वि० ) नष्ट, विनष्ट।
मलिष्ट—( वि० ) गन्दा ( हिं० ) अत्यंत, घाण, दुष्ट, अस्वच्छ।
मलीदा—( ना० पु० ) पोलीचा, चुर्मा।
मलेपञ्ज—( वि० ) दहा वर्षापेक्षा अधिक वयाचा ( घोड़ा )।
मल—( ना० पु० ) पैलवान, कुस्तीबाज।
मल्लाह—( ना० पु० ) अंबिया, नावाडी।
मल्लाही—(ना० स्त्री०) नावाड्याचें, काम नावेचें, भाडें, किंवा नोर।
मशक—(ना०स्त्री०) पाणी ठेवण्याची चामडयाची पिशवी, पखाल।
मशक्कत—( ना० स्त्री० ) मेहनत, त्रास, खटपट, दगदग वणवण, वखवख।
मशगूल—( वि० ) कार्यरत, तत्पर, उद्यमी, कामांत चूर, कामांत दंग गुंग।
मशवरा—( ना० पु० ) सलाह ( हिं० ) सल्ला, मत, अभिप्राय, मसलत, बुद्धिवाद
मशहूर—( वि० ) नामवर ( हिं० ) विख्यात, प्रख्यात।
मशाल—( ना० स्त्री० ) काकडा, पोत।
मशालची—( ना० पु० ) मशाल जलाने वाला ( हिं० ) मशाल धरणारा मशालजी।

मश्क—( ना० स्त्री० ) अभ्यास, संवय।
मष्ट—( ना० स्त्री० ) स्तब्धता, शांति।
मसकना—( अ० क्रि० ) फटना ( हिं० ) फाटणें, तडकें थोडें, चिरकणें।
मसकाना—( स० क्रि० ) फड़वाना ( हिं० ) फाडणें, टरकाविणें, चिरविणें, दुभंगविणें।
मसखरा—( ना० पु० ) थट्टे खोर मनुष्य, गुड्डी, विनोदी, मनुष्य।
मसनद—( ना० स्त्री० ) तकिया ( हिं० ) तक्या, मोठी उशी, तख्त, राज्य, गादी।
मसमसाना—( अ० क्रि० ) दांत खाणें, कुढणें, भीतिनें, आपले विचार मनांतल्या मनांत दाबणें।
मसलना—( स० क्रि० ) ढेंचणें, कुलचणें, पिलणें, चिंध्या, करणें।
मसला—( ना० पु० ) कहावत ( हिं० ) म्हण, संप्रदाय, वाक्‌प्रचार, सूत्र।
मसहरी—( ना० स्त्री० ) मच्छरदाणी।
मसा—( ना० पु० ) मांसवृद्धि, चामखीळ।
मसान—( ना० पु० ) मरघट ( हिं० ) स्मशान, मसण।
मसानिया—( ना० पु० ) डोम, स्मशान रक्षक।
मसि—( ना० स्त्री० ) स्याही, शाई।
मसिधान—( ना० पु० )
मसिधानी—( ना० स्त्री० ) } दवात ( हिं० ) दऊत।
मसीन—( ना० पु० ) कुळीत, हुलगा।
मसीना—( ना० स्त्री० ) जवस; मका।
मसीह—
मसीहा— } ( ना० पु० ) त्राता, वाचविणारा, प्रभु खिस्त।
मसीहाई—
मसीही— } ( वि० ) ईसाई ( हिं० ) खिश्चन।
मसूड़ा—( ना० पु० ) हिरड्या।
मसूर—( ना० स्त्री० ) मसूरी।
मसूरियां
मसूरी— } ( ना० स्त्री० ) चेचक ( हिं० ) फोड्यां।
मसें—( ना० स्त्री० ) मिशा, मिशाची लव।

मसोसाना—( स० क्रि० ) मरोड़ना, निचोड़ना (हिं०) पीळघालणें, पिळणें, दुःख करणें।
मसोसा—(ना० पु०) दुःख, पश्चात्ताप।
मसौदा—( ना० पु० ) योजना, कायदे विल्ल।
मस्त—( वि० ) मस्त, निष्काळजी, गर्विष्ट, आनन्दीत, खुला।
मस्तगी—( ना० स्त्री० ) राळ।
मस्ताना—( अ० क्रि० ) झिंगणें, लष्ट व बळकट होणें।
मस्ताना—( वि० ) नशीली ( हिं० ) मादक ( अ० ) कामभावानें कामदृष्टिनें।
मस्तूल—( ना० पु० ) शीडाची काठी।
मस्याधार—( ना० पु० ) दवात ( हिं० ) दऊत।
मस्सा—( ना० पु० ) मांस-वृद्धी, चामखीळ, डांस, मच्छर।
महंगा—( वि० ) महाग, खर्चाचा।
महंगी—( ना० स्त्री० ) कहत ( हिं० ) दुष्काळ, दुर्भिक्ष, महागाई।
महक—( ना० स्त्री० ) गन्ध ( हिं० ) वास; सुगन्ध।
—दार—(वि०) सुवासिक।
महकना—( अ० क्रि० ) खुशबू करना ( हिं० ) सुवास येणें।
महकाना—(स० क्रि० ) सुवासित करणें, परिमलणें।
महकीला—( वि० ) खुशबूदार ( हिं० ) सुगन्धित।
महता—( ना० पु० ) मुखिया ( हिं० ) गावचा मुख्य पुढारी।
महताव—( ना० पु० ) चाँद ( हिं० ) चंद्र; चांदणें।
महतावी—( ना० स्त्री० ) निळसर प्रकाश।
महतारी—( ना० स्त्री० ) माँ ( हिं० ) माता, आई।
महतिया+—( ना० पु० ) चौधरी ( हिं० ) खेडयांतील लोकांचें एक आदरार्थी नाव।
महतो—( ना० पु० ) एक जाति विशेष।
महना—( स० क्रि० ) मथना ( हिं० ) मंथन करणें।
महन्ताई—( ना० स्त्री० ) महन्त ही पदवी।
महर—( ना० पु० ) प्रधान, मुख्य, नेता।
महरा—( ना० पु० ) कहार ( हिं० ) नंदाचें एक नांव; भोई पालकी वहाणारे।
महल—( ना० पु० ) राजवाड़ा, जनानखाना, रंग महल खाशे महाल।
महल्ला—( ना० पु० ) गल्ली, नगराचा भाग।
—दार—( ना० पु० ) भंगी।
महसूल—( ना० पु० ) कर, दस्तूर, धारा।
—सायर—( ना० पु० ) किरकोळ कर।
महसूली—( वि० ) कर, किंवा दस्तूरी बसविण्या सारखें।
महाजन—( ना० पु० ) सेठ ( हिं० ) व्यापारी चांगला किंवा विश्वसनीय माणूस।
महानी+—( ना० स्त्री० ) मथनी ( हिं० ) रवी; घुसळखांब।
महाल—( ना० पु० ) जिल्हा, तालुका।
महालोह—( ना० पु० ) लोह-चुम्बक।
महावट—( ना० पु० ) माघमासांतील पाऊस।
महावत—( ना० पु० ) माहुत; हत्तीचा रक्षक, हस्तिप।
महावरा—( ना० पु० ) व्यवहार, अभ्यास, वाक्प्रचार, वाक् प्रणाली।
महीन—( वि० ) बारीक, पातळ, सुरेख।
महीना—( ना० पु० ) महिन्याचा पगार-मजूरी।
—दार—( ना० पु० ) पगारी नोकर।
महुआ—( ना० पु० ) वृक्ष विशेष।
महूरत—( ना० पु० ) मुहूर्त, समय, काल।
महेला—(ना० पु०) घोडयाला देण्याचें एक अन्न, शिजविलेले वाटाणें।
महेश्री—( ना० पु० ) मारवाड़ी बनियांची जात।
महोख—( ना० पु० ) माठा बैल, सांड, घुळी।
महोखा—( ना० पु० ) कोकिळेची एक जात।
महोसा—( ना० पु० ) तिल।
मा, माँ, माई—( ना० स्त्री० ) दूध ( हिं० ) माता, आई।
माईं—( ना० स्त्री० ) मावशी, माई।
मांग—( ना० स्त्री० ) भांग, भाग, मागणा।

मांगना—( स० क्रि० ) मागणें, याचना करणें।
मांगी—(ना० स्त्री०) उधार, कर्ज, काडी मोडलेली स्त्री।
मांज—( ना० स्त्री० ) लस, चर्मसार, पू, उतार जमीन, कुमरी।
मांजना—( स० कि० ) साफ़ करना ( हिं० ) साफ़ करणें, घासणें।
मांझ+*—( ना० स्त्री० ) मध्य।
—धार-( ना० स्त्री० ) पाण्याची मध्य धार, धार।
मांझत+—( ना० स्त्री० ) मोठेपणा, थोरपणा, प्रौढी, मान्यता, गौरव।
मांझा—( ना० पु० ) वावडीचा दोरा, पावसाळयाचें नवें पाणी, झाडाचा बुंधा, विछाना।
मांझी—( ना० पु० ) मल्लाह ( हिं० ) नावाडी, अंबी, नाविक।
मांडै—( ना० पु० ) पेज, शिजलेल्या तादुळाचें पाणी।
मांडना—( स० क्रि० ) गूंदना (हिं०) मळणें, कुसकरणें, मर्दणें, कमावणें, तुडविणें, लिहिणें, निश्चय करणें।
मांडल—(ना० स्त्री०) मोटेचें कडें, मोटेची लोखंडीसरी।
मांडा—( ना० पु० ) गव्हाची पातळ रोटी।
मांडी—( ना० स्त्री० ) खळ, पेज, चीक।
मांढा—( ना० पु० ) मांडव, मंडप, छप्पर।
मांद—( वि० ) अंधुक, फुसकट, कोमेजलेलें। ( ना० स्त्री० ) गुहा, गुफा, उकिरडा।
मांदगी—( ना० स्त्री० ) थकावट (हिं०) थकवा, कंटाळा, शीण, आयास।
मांदा—( वि० ) थका ( हिं० ) थकलेला, शिणलेला।
माही+—( अ० ) बीच ( हिं० ) मध्यें, आंत।
माकन्द+—( ना० पु० ) आम ( हिं० ) आम, अंबा।
माकूल—( वि० ) विचारपूर्ण, तर्क शुद्ध, योग्य।
माखड़ा+—( वि० ) वेवक़ूफ़ ( हिं० ) मूर्ख, अज्ञान।
माखता+—( ना० पु० ) पछतावा ( हिं० ) पश्चात्ताप।
माखन—( ना० पु० ) मक्खन ( हिं० ) लोणी।
माखो+—( ना० स्त्री० ) अफ़वाह ( हिं० ) गप्प, कंडी, खोटी बातमी।
माचा—( ना० पु० ) मचान ( हिं० ) पलंग, बाजलें।
—तोड़-( ना० पु० ) आळशी मनुष्य।
माची—( ना० स्त्री० ) खटोला ( हिं० ) लहानसें, बाजलें।
माछर—( ना० पु० ) मच्छड़ ( हिं० ) डाँस।
माछी—( ना० स्त्री० ) मक्खी ( हिं० ) माशी।
माजरा—( ना० पु० ) घडलेली गोष्ट, स्थिति।
माजाई—(स्त्री०) } ( वि० ) सहोदर; एकाच आईची।
माजाया—(पु०) }
माजूम—( ना० स्त्री० ) मादक पदार्थ घालून बनविलेली बर्फी।
माझधार—( ना० स्त्री० ) पाण्याची मध्यधार, पुरांतील मध्यधार।
माट—( ना० पु० ) मातीचें भांडें।
माटी—( ना० स्त्री० ) मिट्टी ( हिं० ) माती।
माठा—( ना० पु० ) ताक, मट्ठा।
माठू—( ना० पु० ) "मसख़रा" पहा।
माड़ली—( ना० स्त्री० ) लेई ( हिं० ) "मांडी" पहा।
माड़िया ( वि० ) पतला ( हिं० ) दुर्बळ, किडकिडीत।
मात—( ना० स्त्री० ) हार ( हिं० ) पराजय, मात।
मातना—(अ० क्रि०) माजणें; मस्तीला येणें।
मातम—( ना० पु० ) रंज ( हिं० ) शोक, दुःख।
—पुर्सी ( ना० स्त्री० ) सहदुःख।
मातमी—( वि० ) शोक सूचक।
माती—( लि० ) पागल ( हिं० ) मस्त, मदमस्त।
मातुलानी— } ( ना० स्त्री० ) मामी।
मातुली— }
माथा—( ना० पु० ) कपाळ।
माथुर—( ना० पु० ) मथुरेंत रहाणारा, एक उपनांव।
मादा—( ना० स्त्री० ) मादी; स्त्री।
माद्दा—( ना० पु० ) सामर्थ्य, योग्यता, बल।
माधवा—( ना० स्त्री० ) एक मोठी लता।
मान—( ना० पु० ) इज़्ज़त ( हिं० ) अब्रू, मान।
—गुमान—( ना० पु० ) आदर, सत्कार।

मानता—( ना० स्त्री० ) मान, पूजा, मान्यता।
मानहुँ—( अ० ) मानो ( हिं० ) जणुं, समजा।
मानिक—( ना० पु० ) रत्न, माणिक।
मानिन्द—( वि० ) सदृश, सारखे, समान।
मानों—( अ० ) कल्पना करो ( हिं० ) समजा।
मावाप—( ना० पु० ) माता पिता, आई-बाप।
मामू—( ना० पु० ) मामा।
मामूल—( ना० पु० ) आदत ( हिं० ) संवय, रिवाज।
मामूली—( वि० ) साधारण, नियत, सर्वसाधारण।
मार—(ना०पु०) कामदेव, मदन, मन्मथ। (ना० स्त्री०) प्रहार, भांडण, चोप, कुटाई ( ना० स्त्री० ) चोप,मार।
—पीट—(( ना० स्त्री० ) आरामारी, हातघाई।
मारना—( स०क्रि० ) पीटना ( हिं० ) मारणें, चोप देणें।
मारी—( ना० स्त्री० ) वबा ( हिं० ) प्लेग; साथ।
मारू—( ना० पु० ) मालिक ( हिं० ) मालक, पति।
मारे—( अ० ) कारण, करितां, मुळें, कारणानें।
मार्फत—( अ० ) द्वारा, कडून।
माल—( ना० पु० ) धन, द्रव्य, गाठोडें।
मनकूला—( ना० पु० ) जंगम मिळकत।
—गैरमनकूला—( ना० पु० ) स्थावर मिळकत।
मालकियत—( ना० स्त्री० ) स्वत्व, स्वामित्व।
मालगुज़ार—( ना० पु० ) कर देणारा, रमळ।
मालगुज़ारी—( ना० स्त्री० ) फाळ, कर।
मालपुवा-आ—( ना० पु० ) एक प्रकारची गोड पुरी, भरण घातलेली पुरी।
मालवर—( वि० ) धनाढय, श्रीमन्त धनवान।
मालामाल—( क्रि० ) पूर्ण, भरलेला, श्रीमंत।
मालिक—( ना० पु० ) स्वामी, ईश्वर-पति, धनी।
मालिकाना—( वि० ) सत्ताधारी, खाविन्द, मालका सारखा ( ना० पु० ) पोटगी; तनखा।
मालियत—( ना० स्त्री० ) किंमत, मोल।
मालूम—( वि० ) ज्ञात, माहित, स्पष्ट।
मावस—( ना० स्त्री० ) अमावास्या।
मावा—( ना० पु० ) सत्व, दुधाची खरवड।
माशूक—( ना० पु० ) प्रियतम, स्त्री, बायको।
मासान्त—( ना० पु० ) महिन्याचा शेवटाचा दिवस-पूर्णिमा।
मासी—( ना० स्त्री० ) मावशी।
मासीन—( वि० ) माहवारी ( हिं० ) महिन्याचा।
माह—( ना० पु० ) मास, महिना, चांद।
—बमाह—( अ० ) महिन्याचे महिन्याला।
—ताब—( ना० पु० ) चांदणें।
—वारी—( अ० ) प्रत्येक महिन्याला।
माहीं+—( अ० ) में ( हिं० ) मध्ये, आंत।
माहुर*—( ना० पु० ) जहर ( हिं० ) विष, हलाहल।
मिंगनी—( ना० स्त्री० ) शेळी-बकरीच्या लेंड्या।
मिचकारना—( स० क्रि० ) निचोड़ना ( हिं० ) गाळणें, पिळणें।
मिचकाना—( स० क्रि ) मिचकावणें ( डोळे )
मिचना—( अ० क्रि० ) मूंदना ( हिं० ) मिटणें, बन्द करणें।
मिचराना—( स० क्रि० ) अनिच्छेनें खाणें, धीरे धीरे खाणें, अरुचीनें खाणें।
मिचलाना—( अ० क्रि० ) "मिचना" पहा।
मिटना—( अ० क्रि० ) नाहींसे होणें, नष्ट होणें।
मिटाना—( स० क्रि० ) नाहीं से करणें, नष्ट करणें।
मिटिया—( ना० स्त्री० ) हांडी ( हिं० ) मातीचें भांडें।
मिट्टी—( ना० स्त्री० ) माती, जमीन; मढें; मृत देह।
—का तेल—( ना० पु० ) राकेल।
—का पिंजर—( ना० पु० ) मनुष्य देह।
मिट्ठा—( ना० पु० ) चुम्मा ( हिं० ) मुका, चुम्बन, ( वि०) आहिस्ता ( हिं० ) सावकाश, गोड।
मिट्ठी—( ना० स्त्री० ) मुका, चुम्बन।
मिठास—( ना० स्त्री० ) गोडी, मधुरता, मिष्टता।
मियां—( ना० पु० ) साहब ( हिं० ) पति, स्वामी, धनी, मालक।
मियान—( ना० पु० ) म्यान, कंवर।
मियाना—( ना० पु० ) पालकी (हिं०) पालखी, वाहन।

मियानी—( ना० स्त्री० ) विजारीच्या दोन्ही पायांच्या, मध्यें लावलेला चौकोनी तुकडा ।

मिर्गी—( ना० स्त्री० ) एक रोग फेंपरे ।

—हा—( ना० पु० ) अपस्मार, फेंपरे झालेला, मनुष्य ।

मिर्च— / मिर्चा— } ( ना० स्त्री० ) मिर्चौं ( वि० ) तिखट ।

मिर्ज़ई—( ना० स्त्री० ) आंगरखा, सदरा ।

मिलन—( ना० पु० ) मेळ; संघटन; एकी ।

मिलनसार—( वि० ) सख्यभावाचा, स्नेहबुद्धि ।

मिलनसारी—( ना० स्त्री० ) इख़लाक़ ( हिं० ) मित्रत्व, स्नेह भाव, सख्यभाव ।

मिलना—( अ० क्रि ) मिळणें, आलिंगणें ।

मिलवाना—( स० क्रि० ) मिळविणें, मिसळणें ।

मिलान—( ना० पु० ) मुक़ाबिला ( हिं० ) तुलना ।

मिलाना—( स० क्रि० ) "मिलवाना" पहा ।

मिलाप—( ना० पु० ) मेल ( हिं० ) मेल, एकी ।

मिलापी—( वि० ) मेली ( हिं० ) सलगीचा, सोबतीचा संगतीचा ।

मिलाव—( ना० पु० ) मिसळ, मिश्रण ।

मिस—( ना० पु० ) बहाना ( हिं० ) मिष, बहाणा ।

मिसना—( अ० क्रि० ) पीसना ( हिं० ) चूर्ण होणें ।

मिस्सा—( ना० पु० ) भांजणी मूंगमोठ आदि का भुस्सा ।

मिस्सी— / मिसी— } ( ना० स्त्री० ) दंत मंजन ।

—दान—( पु० ना० ) दंतमंजनाची डबी ।

मिहदी— / मेंहदी— } ( ना० स्त्री० ) मेंदी, मेंदीचें, झाड ।

मिहनत—( ना० स्त्री० ) उद्योग परिश्रम, कष्ट ।

मिहनताना—( ना० पु० ) मजूरी, पगार, देणगी ।

मिहनती—( हि० ) उद्योगी, कष्टी, कष्टाळू ।

मिहमान—( ना० पु० ) परका, पाहुणा ।

—दार—( ना० पु० ) आदरातिथ्य सत्कार करणारा ।

—दारी—( ना० स्त्री० ] आदरातिथ्य, सत्कार ।

मिहमानी—( ना० स्त्री० ) आदरातिथ्य सत्कार, मेजवानी ।

मिहरारू— / मिहरिया— / मिहरी— } ( ना० स्त्री० ) औरत ( हिं ) बायको माणूस, पत्नी ।

मिहर्बान—( वि० ) रहमदिल ( हिं० ) दयाळू, कृपाळू स्नेहाळू; ममताळू; ( ना० पु० ) मित्र; स्नेही ।

मिहर्बानगी— / मिहर्बानी— } ( ना० स्त्री० ) दया, कृपा, स्नेह, ममता मेहेरबानी ।

मिहाना—( अ० क्रि० ) गीला होना ( हिं० ) भिजणें ।

मिहिर—( ना० पु० ) रवि, दिवाकर, सूर्य (ना० स्त्री०) कृपा, दया, मेहेरबानी ।

मींगी—( ना० स्त्री० ) गर, गीर, मगज ।

मीजना—( स० क्रि० ) मलना, रगड़ना ( हिं० ) चोळणें, घासणें; ओरखडणें ।

मीच—( ना० स्त्री० ) मृत्यु; मरण ।

मीचना—( स० क्रि० ) मिटणें ( डोळे ) पापणी, हालविणें, मिचकावणें ।

मीजना—( स० क्रि० ) हातानें चोळणें, घासणें ।

मीज़ान—( ना० पु० ) बेरीज ।

—कुल—( ना० पु० ) वट्ट बेरीज ।

मीजू—( ना० पु० ) मसूर, मसूरी ।

मीठा—( वि० ) गोड; मधुर; धीमा; लबाड ।

मीत—( ना० पु० ) मित्र, स्नेही, यार ।

मीता—( ना० पु० ) मित्र; पेला; मडकें; घागर ।

मीना—( ना० पु० ) आब ( हिं० ) निळारंग, बेगड; पाणी देणें, राजपुतान्यांतील एक दरवडेखोरांची जात ।

मीनार—( ना० पु० ) खम्भा ( हिं० ) खांब मनोरा, शिखर ।

मीमियान—( अ० क्रि० ) बें बें आवाज करणें ।

मीर—( ना० पु० ) प्रधान, मुख्य, नेता, पुढारी ।

—मजलिस—( ना० पु० ) अध्यक्ष ।

—मुंशी—( ना० पु० ) अव्वल कारकून ।

साका—( ना० पु० ) संवत, शक ।

साकिन—( ना० पु० ) निवासी; रहाणार ।

साखा—( ना० स्त्री० ) शाखा, ( ना० पु० ) सक; युग ।

साखी—( ना० पु० ) गवाही ( हिं० ) साक्षी ।

सांग—( ना० पु० ) गवत; हिरवें गवत ।

पात—( ना० पु० ) हिरवळ; भाजी; भाजीपाला ।

सागौन—( ना० स्त्री० ) सागवान, साग ।

साज़—( ना० पु० ) सामान; जीन ।

साज़—( वि० ) करणारा; कर्ता ।

जिल्द—( ना० पु० ) पुस्तक बांधणारा ।

सामान—( ना० पु० ) सामान सुमान ।

बे साज़ो सामान—( वि० ) निराधार; नंगा; दिगंबर ।

साजना—( स० क्रि० ) आरास करणें; सुशोभित करणें ।

साज़िश—( ना० स्त्री० ) कट; मसलत ।

साज़िशी—( वि० ) कपटी; धूर्त, कावेबाज ।

साझा—( ना० पु० ) भागीदारी; हिस्सा; भाग ।

साझी—( ना० पु० ) भागीदार; हिस्सेदार ।

साझेमें—( अ० ) साथ में ( हिं० ) भागीदारीनें ।

साटवाट—( ना० स्त्री० ) एकत्रित होणें; मसलत ।

साटा—( ना० पु० ) परत; प्रतिदान; विनिमय ।

साठ—( वि० ) साठ, ६० ।

साड़ी—( ना० स्त्री० ) साड़ी, लहान लुगडें ।

साढ़—( ना० पु० ) बायकोच्या बहिणीचा पति, साढू ।

सातवां—( वि० ) सप्तम; सातवा ।

साथ—( अ० ) सहित; बरोबर ।

वाला—( ना० पु० ) सोबती; मित्र ।

साथ—( अ० ) मिळून ।

साथिन—( ना० स्त्री० ) सहेली ( हिं० ) दासी, मैत्रीण, सखी ।

साथी—( ना० पु० ) दोस्त ( हिं० ) सरळपणा, साधेपणा, मनाचा मोकळेपणा ।

सादगी—( वि० ) साधेपणा ।

साध—( ना० पु० ) साधु; भिक्षुक ।

साधना—( स० ) पूरा करना ( हिंप ) संपविणें; साधणें; संपादणें ।

सानना—( ना० स्त्री० ) मिसळणें; गुंतविणें; माखणें; डाग लावणें ।

सान—( ना० स्त्री० ) सहाण, धारेचा दगड ।

सानी—( ना० स्त्री० ) गुरांचें खाणें; गुराना दिलेलादाणा, भुसा व पेंड यांची मिसळ; कळण; कळणा; अंबोण ।

साप—( ना० पु० ) शाप, श्राप ।

सापन—( ना० पु० ) केस गळण्याचा रोग ।

सापना—( स० क्रि० ) शाप देणें ।

सापिन—( ना० स्त्री० ) सर्पिण, सापीण ।

साफ़—( वि० ) स्वच्छ, शुद्ध, गुळगुळीत, मोकळया मनाचा ।

—दिल—( वि० ) शुद्ध अंतःकरणाचा ।

साफ़ा—( ना० पु० ) पगड़ी ( हिं० ) रुमाल, फेटा ।

साफ़ी—( ना० स्त्री० ) छन्ना ( हिं० ) गाळणारा, गळती ।

साबर—( ना० पु० ) सांबर, सांबराचें कातडें ।

साबिक—( वि० ) पुराना ( हिं० ) जुना, पूर्वीचा ।

—दस्तूर ( अ० ) नेहमीं प्रमाणें ।

—में ( अ० ) पूर्वी, प्राचीन काळी ।

साबित—( वि० ) दृढ; संपूर्ण, सिद्ध ।

साबुन—( ना० पु० ) साबण ।

साबूत—( वि० ) कुल ( हिं० ) संपूर्ण, सगळे ।

साबूदाना—( ना० पु० ) शाबुदाणा ।

सामक—( ना० पु० ) धान्याचा एक कण ।

सामना—( ना० पु० ) विरोध, प्रतिरोध, युद्ध, द्वंद्व युद्ध ।

सामने—( अ० ) मुहोमुंह ( हिं० ) प्रत्यक्ष, समोर, तोंडावर ।

—आमने—( अ० ) समोरासमोर ।

सामर्थ—(ना० स्त्री० पु०) सामर्थ्य, योग्यता, शक्ति बल ।

सामा—( ना० स्त्री० ) उप करणें, सामान ।

सामान—( ना० पु० ) असबाब (हिं०) सामान, सामग्री

--बे—( वि० ) कंगाल ।

सामी—( ना० स्त्री० ) लागवड जमीन, विकाऊ, जमीन, काठी भोंवती बसविलेली पिंडी।
सायबान—( ना० पु० ) सोपा, पडवी, छप्पर।
साया—( ना० पु० ) छाया, छप्पर, भूत-बाधा।
सारङ्गिया—( ना० पु० ) सारंगी वाजविणारा।
सारना—( स० क्रि० ) साधणें, संपविणें, काजळ, घालणें।
सारलोह—( ना० पु० ) फ़ोलाद ( हिं० ) पोलाद।
सारा—( वि० ) सब ( हिं० ) सर्व, संपूर्ण।
सारार्थ—( ना० पु० ) संक्षेप।
साल—( ना० पु० ) एक वृक्ष, सागवान, वर्ष।
—बसाल—( अ० ) प्रतिवर्षी।
—भर—( अ० ) वर्षभर।
—तमाम( ना० पु० ) वार्षिक अहवाल।
—गिरह( ना० स्त्री० ) वाढदिवस, जन्मदिन।
सालन—( ना० पु० ) मांस, मासांची कढी।
सालना—( स० क्रि० ) सूराख़ करना ( हिं० ) भोंक पाडणें छेदणें।
सालसा—( ना० पु० ) औषध विशेष, अर्क।
सालिम—( वि० ) सहीह ( हिं० ) दुरुस्त, क्षेम, सुदृढ, संपूर्ण।
सालियाना—(ना० पु०) वार्षिक वेतन, तैनात नेमणूक।
—दार( वि० ) तैनातदार।
सालिस—( ना० पु० ) पंच, मध्यस्थ।
सालिसी—( ना० स्त्री० ) पंचाईत, मध्यस्थी।
साली—( ना० स्त्री० ) पत्नीची बहिण।
सालू—( ना० पु० ) शालू, एकलाल कपडा।
सालोत्री—( ना० पु० ) घोडे डॉक्टर, जनावराचा वैद्य।
सावक—( ना० पु० ) पोर, पिलू, शिशु।
सावन—( ना० पु० ) श्रावण, श्रावण महिना
—की झड़ी—( ना० स्त्री० ) श्रावणांतील पावसाची झड।
सावनी—( ना० स्त्री० ) श्रावणांतील पीक।
सावन्त—( वि० ) बहादुर ( हिं० ) वीर, धीट।

सावन्ती—( ना० स्त्री० ) बहादुरी ( हिं० ) शौर्य, वीर्य।
सास—( ना० स्त्री० ) सासु।
सासन—( ना० पु० ) शासन, हुकुम।
सासना—( स० क्रि० ) शासन करणें, दंड करणें।
सासरा—( ना० पु० ) ससुराल ( हिं० ) सासर।
साह—( ना० पु० ) सौदागर ( हिं० ) व्यापारी।
साहभोला—निरपराधी मनुष्य।
साहब( ना० पु० ) मालिक ( हिं० ) मालक, धनी।
—ज़ादा—( ना० पु० ) मुलगा पुत्र।
—सलामत—( ना० स्त्री० ) ओळख, परिचय।
साहिबा—( ना० स्त्री० ) मालकीण, धनीण, देवी।
साहिवान—( ना० पु० ) सभ्यगृहस्थ।
साही—( ना० स्त्री० ) साळू, साळ, साळी।
साहू—( ना० पु० ) कल्याणेच्छु, पोशिंदा, कैवारी।
साहूकार—( ना० पु० ) महाजन ( हिं० ) शेठ, सावकार।
साहूकारा—( ना० पु० ) सराफांचा बाजार, सराफकट्टा।
साहूकारी—( ना० स्त्री० ) महाजनी (हिं०) सावकारी।
साहूल—( ना० पु० ) ओळंबा, लंब, लंबक।
सिंगिया—( ना० पु० ) एक प्रकारचें विष।
सिंगौटी—(ना० स्त्री०) शेव्या, गुरांच्या शिंगातील वेढणें।
सिंघाड़ा—(ना० पु०) शिंगाडें।
सिंहनी—( ना० स्त्री० ) सिंहीण।
सिकंजबीन—( ना० स्त्री० ) आंबटगोडपेय।
सिकत्तर—( ना० पु० ) मंत्री, ( सेक्रेटरीचा अपभ्रंश )
सिकना—( अ० क्रि० ) भाजणें, शेकणें।
सिकरी—
सिकली— } (ना० स्त्री०) आभूषण विशेष।
सिक्ख—( ना० पु० ) शिष्य, नानकपंथी।
सिखर—( ना० पु० ) चोटी ( हिं० ) शिखर।
सिखरन—( ना० पु० ) शिखरन, ( उ० केळीची शिखरण वगैरे )
सिखलाना—( स० क्रि० ) शिकविणें, शिक्षक देना।
सिखाई—( ना० स्त्री० ) शिक्षा ( हिं० ) शिक्षण।

सिखाना—( स० क्रि० ) शिकविणें, उपदेश करणें, समजूत घालणें।
सिगरौ—( वि० ) समग्र, संपूर्ण, सारा पूर्ण।
सिङ्गा—( ना० पु० ) तुरही ( हिं० ) शिंग, तुतारी।
सिङ्गार—( ना० पु० ) सजावट ( हिं० ) शृंगार, थाट।
सिङ्गारना—( स० क्रि० ) सजाना ( हिं० ) शृंगारणें थाट करणें।
सिङ्गारिया—( ना० पु० ) शृंगार करणारा, थाट करणारा।
सिजल—( वि० ) सुंदर, सुरेख, छान।
सिझाना—( स० क्रि० ) रींधना ( हिं० ) शिजविणें।
सिट्टा—( ना० पु० ) धान्याचें कणीस।
सिठाई—( ना० स्त्री० ) अरुची, पाणचटपणा।
सिड़—( ना० स्त्री० ) पागलपन ( हिं० ) खूळ, वेड।
सिड़न—( वि० ) पगली ( हिं० ) खुळी, वेडी।
सिड़विल्ला—( ना० पु० ) वेडगळ मनुष्य।
सिड़ा—, सिड़ी— ( वि० ) पागल ( हिं० ) वेडसर, मूर्ख, वेडगळ।
सित—( वि० ) सफ़ेद ( हिं० ) श्वेत, पांढरा
सितरी—( ना० स्त्री० ) पसीना ( हिं० ) घांम स्वेद।
सितला—( ना० स्त्री० ) चेचक ( हिं० )
सितार—( ना० पु० ) सतार।
—बाज़—( ना० पु० ) सतार वाजविणारा।
सितारा—( ना० पु० ) सतार, तारा, नशीब।
सिदौस—( ना० पु० ) प्रातःकाट पहाट।
सिदौसी—( वि० ) सुबह, तड़के ( हिं० ) लवकर, प्रातःकाली, पहाटें।
सिधारना—( अ० क्रि० ) जाणें, विधणें, मरणें।
सिधावट—( ना० स्त्री० ) सादगी ( हिं० ) साधेपणा।
सिनक—( ना० स्त्री० ) शेंबूड, नाकांतीलघाण, मेकूड।
सिनकना—( अ० क्रि० ) शिंकरणें, शेंबूड काढणें।
सिंदूर—( ना० पु० ) हिंगुळ, सेंदूर।
सिपाह—( ना० स्त्री० ) शिपाई, सेना।
सिपाहसालार—( ना० पु० ) सेनापति।
—गरी—( ना० स्त्री० ) शिपाईगिरी।
सिपाही—( ना० पु० ) योद्धा, शिपाई, नौकर।
सिप्रा—( ना० पु० ) अवकाश, जागा, आटोका, नेम।
सिफ़त—( ना० स्त्री० ) तारीफ़ ( हिं० ) प्रशंसा, गुण, योग्यता।
सिफ़र—( ना० पु० ) शून्य।
सिफ़ारिश—( ना० स्त्री० ) प्रशंसा, शिफारस।
सिफ़ारिशी—( वि० ) प्रशंसित-वशील्याचा।
—टट्टू—( ना० पु० ) वशील्याचें तट्टू।
सिमट—(ना० स्त्री०) सिकुड़ (हिं०) थिजणें, आकुञ्चन, संकोच।
सिमटना—( अ० क्रि० ) थिजणें, आकुंचन होणें।
सिमटन—( ना० स्त्री० ) शिकन ( हिं० ) मोड, दुमड।
सिमटी—( ना० स्त्री० ) ट्वील कापड।
सियान—( वि० ) स्याना ( हिं० ) चतुर, धूर्त, ज्ञानी, प्रौढ़।
( ना० पु० ) कदर्यु, गारुडी।
सियार—( ना० पु० ) शृगाल, कोल्हा।
सिर—( ना० पु० ) सर ( हिं० ) डोंके, शिर।
—गुथी—( ना० स्त्री० ) सुन मुखाच्या वेळचें वेणी घालणें।
सिरका—( ना० पु० ) एक प्रकारचें आसव, शुक्त।
सिरकी—( ना० स्त्री० ) बेतचा पड़दा, चिकाचा, पड़दा,
सिरजनहार—( ना० पु० ) कर्ता, जन्मदाता।
सिरजना—( स० क्रि० ) बनविणें, उत्पन्न करणें।
सिरसींग—( वि० ) बंडखोर, दंगेखोर।
सिरहाना—( ना० पु० ) उसे, उसी।
सिरा—( ना० पु० ) आरंभ, अन्त, किनारा।
सिरात—( वि० ) ठण्डक ( हिं० ) थंड, गार।
सिराना—( स० क्रि० ) ठण्ढा करना ( हिं० ) थंड करणें।
सिर्फ़—( अ० ) केवल, मात्र, फक्त।
सिर्री—( वि० ) पागल ( हिं० ) खुळा, वेडा।
सिल, सिला—( ना० स्त्री० ) पत्थर ( हिं० ) दगड, खडक शिला।
सिलना—( अ० क्रि० ) शिवलेजाणें।
सिलपट—( वि० ) चिकना ( हिं० ) मऊ, नरम, सम।

सिलवट्टा—( ना० पु० ) पाटा-वरवटा ।
सिलवाई—( ना० स्त्री० ) सिलाई ( हिं० ) शिवणावळ ।
सिलवाना—
सिलना— } ( स० क्रि० ) शिवविणें, टांका, घालवून घेणें ।
सिलसिला—( ना० पु० ) क्रम, माला ।
सिलसिलेवार—( अ० ) क्रमानें, ओळीनें ।
सिलाई—( ना० स्त्री० ) "सिलाई" पहा ।
सिली—( ना० स्त्री० ) सहाण ।
सिल्ली—( ना० स्त्री० ) सहाण, लाकडाचा ओंडका ।
सिवार—( ना० पु० ) सेवार ( हिं० ) शेवाळें ।
सिसकना—( अ० क्रि० ) हुन्दके देणें ।
सिसकी—( ना० स्त्री० ) हुन्दका
सिहरना—( अ० क्रि० ) सरदी से सिकुड़ना ( हिं० ) थंडीनें कुडकुडणें ।
सिहरन—( ना० पु० ) घबराहट ( हिं० ) भीति, घाबरेपणा, थरकांप ।
सिहरा—( ना० पु० ) मुंडावळ, मंडोळया ।
सींक—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें गवत ।
सींका—( ना० पु० ) खाचणी, कोरणी, खोबण ।
सींकहर—( ना० पु० ) शिंकें ।
सींखिया—( ना० पु० ) जराची अरुंद पट्टी ।
सींग—( ना० पु० ) शिंग ।
सींगड़ा—
सींगा— } ( ना० पु० ) वाजविण्याचें शिंग ।
सींगिया—( ना० पु० ) एक प्रकारचें विष ।
सींगी—( ना० स्त्री० ) एक जातीचा मासा, तुंबड़ी ।
सींचना—
सीचना— } जल छिड़कना ( हिं० ) पाणी शिंपडणें ।
सींचाई—( ना० स्त्री० ) सींचने की मज़दूरी ( हिं० ) पाजण्याची मजूरी ।
सींची—( ना० स्त्री० ) शेतांना पाणी देण्याची वेळ ।
सीख—( ना० स्त्री० ) शिक्षा ( हिं० ) पाठ, शिक्षण ।
सीखना—( स० क्रि० ) पढ़ना ( हिं० ) शिकणें ।

सीजना—( अ० क्रि० ) पसीजना ( हिं० ) घाम येणें, शिजणें, ( कर्ज ) फिटणें ।
सीटी—( ना० स्त्री० ) शोळ ।
सीठ, सीठी—( ना० स्त्री० ) तलछट ( हिं० ) विड़ा वगैर चघळल्याचा चोथा ।
सीड़—( ना० स्त्री० ) तरी ( हिं० ) ओल, ओलसर, जमीन ।
सीड़—
सीड़ा— } ( ना० पु० ) शेतांतील पाण्याचे पाट ।
सीड़ी—( ना० स्त्री० ) जीना ( हिं० ) जिना, सोपान ।
सीतरस—( ना० पु० ) हगावण, कॉलरा ।
सीतला—( ना० स्त्री० ) फोडया ।
—मुंह दाग ( वि० ) तोंडावर फोडयाचें वण असलेला ।
सीतांग—( ना० पु० ) मुक्ति, अयष्टंभ ।
सीध—( ना० स्त्री० ) सरळपणा, नेम ।
सीधा—( वि० ) सरल नेकी, सभ्य ।
सीधाई—
सिधाई— } ( ना० स्त्री० ) सरळपणा, नीटपणा, साधेपणा, प्रामाणिकपणा ।
सीना—( स० क्रि० ) शिवणें, टांका घालणें ।
सीना—( ना० पु० ) छाती, अन्तःकरण, ऊर, वक्ष, स्थल ।
सीप—( ना० स्त्री० ) शिंप एक जातीचा अंबा ।
सीपी—( ना० स्त्री० ) शिंप ।
सील—( ना० स्त्री० ) ठण्ढक ( हिं० ) थंडी, ओलावा, ओल ।
सील—( ना० पु० ) स्वभाव, शील, सदाचार, माणुसकी ।
सीला—( वि० ) थंड, ओलसर, ओलट, दमट ।
सीवन—( ना० स्त्री० ) शिवण, शिवणें ।
सीस—( ना० पु० ) सिर ( हिं० ) शिर, डोकें ।
सीसक—
सीसा— } ( ना० पु० ) शिसें ।
सीसों—
सीसम— } ( ना० पु० ) शिसाचें, लाकूड, शिसव्याचें, झाड ।

सुंघाना—( स० क्रि० ) वास घेववीणें।
सुकटा—( वि० ) पतला ( हिं० ) बारीक, किडकोळा, सडपातल।
सुकड़ना—( अ० क्रि० ) आंखडणें, संकोचणें, कचरणें।
सुकड़—( वि० ) आकुंचित, संकुचित।
सुकवार—( वि० ) कमजोर ( हिं० ) अशक्त, कोमल, नाजुक।
सुखलाना— } ( स० क्रि० ) सूखा करना ( हिं० )
सुखाना— } वाळविणें, रोडविणें।
सुखिया—( वि० ) सुखी, समाधानी, शांत।
सुघड़—( वि० ) कुशल, सुन्दर, गुणी, तयार।
सुघड़ाई—( ना० स्त्री० ) शोभा, सौंदर्य।
सुच*—( वि० ) शुद्ध, स्वच्छ, पवित्र, निर्मल।
सुचिताई—( ना० स्त्री० ) सावधानी, सुचित्तता।
सुचेत—( वि० ) सावधान, चौकस, काळजीवान।
सुजान—( वि० ) सुजाण, जाणता, चतुर।
सुजाना—( स० क्रि० ) फुलाना ( हिं० ) सुजविणें, फुगविणें।
सुझाना—( स० क्रि० ) सुचविणें, दर्शविणें, समजाविणें,
सुटुकना—( स० क्रि० ) गटकन गिळणें।
सुठी—( वि० ) सुंदर, मनोहर, उत्तम।
सुड़प—( ना० स्त्री० ) कौर (हिं०) कवल, ग्रास, घांस।
सुड़ना—( स० क्रि० ) चोखणें, चोखूनपिणें।
सुड़कना—( स० क्रि० ) गटूदिशी गिळणें।
सुढव— } ( वि० ) सुडौल, चांगल्या, आकाराचा।
सुढाल— }
सुतली—( ना० स्त्री० ) सुतली, दोरी।
सुतारी—( ना० स्त्री० ) अरी, धार, टोपण।
सुथना—( ना० स्त्री० ) पायजामा ( हिं० ) विजार, पायजामा तुमान।
सुथनी—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें कोनफल, स्त्रियांची तुमान।
सुथरा—( वि० ) साफ़ ( हिं० ) स्वच्छ, नीट, सुन्दर।

सुथराई—( ना० स्त्री० ) सफ़ाई ( हिं० ) स्वच्छता, नीटपणा, सौंदर्य।
सुथरासाही—( ना० पु० ) नानकसाही साधू ( हिं० ) नानक पंथी साधू—भिक्षुक।
सुदी—( ना० स्त्री० ) शुक्लपक्ष।
सुध—( ना० स्त्री० ) स्मरण, लक्ष्य, काळजी, खबर।
—बुध—( ना० स्त्री० ) व्यवहार ज्ञान, समय सूचकता, काळजी।
—बे—( वि० ) निष्काळजी, मूर्ख, अक्कलशून्य।
सुधना—( अ० क्रि० ) शुद्ध केले जाणें।
सुधरना—( अ० क्रि० ) दुरुस्त होना ( हिं० ) सुधरणें।
सुधवाना—( स० क्रि० ) शुद्ध करवाना ( हिं० ) शुद्ध करविणें, शोधविणें।
सुधाँ—( अ० ) सहित, समेत, युक्त।
सुधाना—( स० क्रि० ) सुध दिलाना ( हिं० ) स्मरण देवविणें।
सुधारना—( स० क्रि० ) दुरुस्त करना ( हिं० ) सुधार,
सुन—( वि० ) निश्चेष्ट, शांत, खुडा, पक्षघाती।
—सान—( वि० ) सामसूम, एकान्त।
—कातर—( ना० पु० ) एक जातीचा सांप।
सुनना—( स० क्रि० ) ऐकणें, लक्ष देणें।
सुनसुनाना—( अ० क्रि० ) सुरसुरणें, सूं वाजणें।
सुनहरा—( वि० ) सोनेरी, सोन्याचा।
सुनाई—( ना० स्त्री० ) ऐकणें ( हिं० ) सुनाई होना, दाद लागणें।
सुनाना—(स० क्रि०) ऐकविणें, सांगणें, खाडकन बोलणें।
सुनापट—( ना० स्त्री० ) "सुनाहट" पहा।
सुनार—( ना० पु० ) सोनार, सुवर्णकार।
सुनारनी } (ना० स्त्री०) सोनारीण, सोनाराची बायको।
सुनारिन }
सुनारी—( ना० स्त्री० ) सोनारी, सोनारांचा धंदा।
सुनावनी—( ना० स्त्री० ) मृत्युवार्ता।
सुनाहट—( ना० स्त्री० ) मौन, गप्प बसणें।
सुनीसुनाई—( वि० ) ऐकलेली, ऐकीव।

सुन्धावट—( ना० स्त्री० ) पृथ्वीचा गन्ध।
सुन्नी—( ना० पु० ) मुसलमानां पैकी एक पंथ।
सुपुर्द—( ना० स्त्री० ताबा, हवाला।
सुपुर्दगी—(ना० स्त्री०) मोकळीक, मुक्तता, हवाली करणें, ताब्यांत देणें।
सुबकना—( अ० क्रि० ) सुसकना ( हिं० ) हुंदके देणें।
सुबकी—( ना० स्त्री० ) सुसकी ( हिं० ) हुंदका।
सुबह—( ना० स्त्री० ) प्रातःकाल, पहाट।
सुबास—( ना० स्त्री० ) सुगंध, गोडवास।
सुबूत—( ना० पु० ) प्रमाण,साक्ष, सिद्धता।
सुभ—( वि० ) शुभ; चांगलें; सुखी; सुदैवी।
सुभागी—( वि० ) किस्मतवर ( हिं० ) सुदैवी।
सुभाव—( ना० पु० ) स्वभाव।
सुभासुभ—( वि० ) बरें वाईट।
सुभीता—( ना० स्त्री० ) सुविधा ( हिं० ) अवसर; अवकाश।
सुम—( ना० पु० ) खुर; घोड़ा वगैरे जनावराचें खूर।
सुमरन—( ना० पु० ) स्मरण; आठवण।
सुमेल—( वि० ) जमण्या सारखा; योग्य, जुळता।
सुम्बा—( ना० पु० ) बंदूकीची नळी, गज।
सुरंग—( ना० स्त्री० ) खाण; भुयारें; भुयारांतीलवाट।
सुरंगिया—( ना० पु० ) सुरंग्या।
सुरत—( ना० स्त्री० ) ख्याल ( हिं० ) स्मरण; आत्मा; —से–( अ० ) काळजी पूर्वक।
सुरती—( ना० स्त्री० ) खाण्याची तंबाखू।
सुरधूप—( ना० पु० ) राल; यक्षधूप।
सुरमई—( वि० ) सुरम्याच्या रंगाचा।
सुरमा—( ना० पु० ) अंजन।
सुरसुराना—( अ० क्रि० ) थंडी वाजणें; सापासारखें फरपटणें।
सुरसुरी—( ना० स्त्री० ) गुदगुल्या; पोरक्रीडा।
सुरगाय—( ना० स्त्री० ) वनगाय।
सुरागी—( ना० पु० ) भेदिया ( हिं० ) गुप्त पोलीस, हेर; भेद्या।

सुराही—( ना० स्त्री० ) जांब; जाम; झारी; पंचपात्र।
—दार–( वि० ) जांब्याच्या आकाराचें।
सुरीला—( वि० ) सुस्वर, मनोहर।
सुरुकना—( स० क्रि० ) निगलना ( हिं० ) गिळणें; भुरकणें।
सुरेतना—( स० क्रि० ) चांगलादाणा बेचणें।
सुरैत } सुरैतिन } ( ना० स्त्री० ) वेश्या; रखेली।
सुर्ख—( वि० ) लाल; लाल भडक।
सुर्खाब—( ना० पु० ) एक बहुमूल्य पक्षी।
सुर्खी—( ना० स्त्री० ) लालिमा।
सुलगना—( अ० क्रि० ) जलना ( हिं० ) जळणें, पेटणें।
सुलगाना—( स० क्रि० ) जलना ( हिं० ) जाळणें, पेटविणें।
सुलच्छन—( वि० ) सुलक्षण, चांगला।
सुलझना—( अ० क्रि० ) मोकळाहोणें, गुंता सुटणें, उकलणें।
सुलझाना—( स० क्रि० ) गुंता सोडविणें, उकलणें, उलगडा करणें।
सुलझाव—( ना० पु० ) उलगडा, उकल, उगवणी, गुंता काढणें।
सुलफ़ा—( ना० पु० ) हुक्यांत घालण्याच्या तम्बाखूच्या लहान गोल्या।
सुलवाना—( स० क्रि० ) निजविणें, झोपविणें।
सुलह—( ना० स्त्री० ) शांति, तह, मुदतीचा किंवा तात्पुरता तह।
—नामा( ना० पु० ) तहनामा।
सुलाना—( स० क्रि० ) "सुलवाना" पहा।
सुलूक—( ना० पु० ) बर्ताव ( हिं० ) बागणूक।
सुलमान—( ना० पु० ) पैग़म्बर ( हिं० ) शहा मनुष्य, ज्ञाता।
सुल्तान—( ना० पु० ) बादशाह ( हिं० ) बादशहा राजा।
सुल्ताना—( ना० स्त्री० ) बेगम ( हिं० ) महाराणी।

सुल्तानी—( वि० ) शाही ( हिं० ) राजकीय ।
सवैया—( ना० पु० ) सोनेवाला ( हिं० ) झोपाळू, निजणारा ।
सुसकारना—( अ० क्रि० ) सुस्कारा टाकणें ।
सुसताना—( अ० क्रि० ) आराम करना (हिं०) विश्रांति घेणें, अंग टेकणें ।
सुसर—
सुसरा— } ( ना० पु० ) सासेरा, ( सासऱ्या विषयीं तिरस्कार दर्शक शब्द )
सुसरार-ल—( ना० स्त्री० ) सासुरवाड, सासऱ्याचें घर पत्नीचें माहेर ।
ससरी—( ना० स्त्री० ) सासु ( तिरस्कार सूचक शब्द )
सुस्ताना—( अ० क्रि० ) "सुसताना" पहा ।
सुस्ती—( ना० स्त्री० ) आळस, कंटाला, उदासपणा ।
सुहबत—( ना० स्त्री० ) संग, साथ ( हिं० ) सोबत, संगत, सहवास ।
वद्—( ना० स्त्री० ) वाईट संगत ।
सुहबती—( ना० स्त्री० ) साथी ( हिं० ) मित्र, स्नेही ।
सुहरना—( स० क्रि० ) फरफटणें, दरदर ओढणें ।
सुहाग—( ना० पु० ) सौभाग्य, सुदैव, प्रेम; लग्नांतील गाणें ।
—पुड़ा—( ना० पु० ) खाऊचा पुडा ।
सुहागन—( ना० स्त्री० ) सौभाग्यवती, सुवासिनी ।
सुहागा—( ना० पु० ) टांकणखार ।
सुहाता—( वि० ) आनंददायी, जुळता, कोमट ।
सुहाना—( अ० क्रि० ) भाना ( हिं० ) पसंत येणें-पडणें ।
सुहाल—( ना० पु०
सुहाली—(ना०स्त्री०) } तुपांत तळलेल्या पुऱ्या ।
सुहावना—(वि०) पंसन्दीदा (हिं०) पसंत, आनन्ददायी । ( अ० क्रि० ) पसंत पडणें, आनन्द देणें ।
सूअर—( ना० पु० ) डुक्कर, वराह, रानडुक्कर ।
—का गोश्त—( ना० पु० ) डुकराचें मांस ।
सूअरी—( ना० स्त्री० ) डुकरी, डुकरीण ।
सूआ—( ना० पु० ) राघ, मोठी सुई, धान्याचें कुसू, कुसळ ।
सूई—( ना० स्त्री० ) सुई, घडयाळाचाकांटा ।
—का नाका—( ना० पु० ) सुईचें नेडें ।
—पिरोना—( स० क्रि० ) सुईंत दोरा ओवणें ।
—का काम—( ना० पु० ) कशीदा, बुटो ।
सूंगरा—( ना० पु० ) म्हशीचें रेडकूं ।
सूंगा—( ना० पु० ) कशीदा, बुटी, नकशा ।
सूंघ—( ना० स्त्री० ) गंध, वास ।
सूंघना—( स० क्रि० ) वास घेणें ।
सूंघनी—( ना० स्त्री० ) तपकीर ।
सूंघा—( ना० पु० ) जातिवंत शिकारी कुत्रा, जामिनीचा वास घेऊन जमिनींतील द्रव्य किंवा धान्य जाणणारा ।
सूंड—( ना० स्त्री० ) हत्तीची सोंड ।
सूंडा—( ना० पु० ) टोंका-धान्यांतील एक किडा ।
सूंडी—( ना० स्त्री० ) बेंबी, नाभि, बोंडी ।
सूंड़ी—( ना० स्त्री० ) दारू गाळणारे व विकणारे ।
सूंतना—( स० क्रि० ) तोडणें; एकत्रित करणें; उपसणें ( तरवार )
सूंस—( ना० पु० ) गादामासा ।
सूंसू—( ना० स्त्री० ) तपकीर ओढणें ।
सूकटा—( वि० ) पतल ( हिं० ) रोडका; अशक्त; सड-पातळ; बारीक ।
सूकवा—( ना० पु० ) कुळीथ; हुलगा !
सूका+( ना० पु० )
सूकी+( ना० स्त्री० ) } चौअन्नी ( हिं० ) पावली, चार आण्याचें नाणें ।
सूखना—( अ० क्रि० ) सूखा होना ( हिं० ) वाळणें; रोडणें; कोमेजणें; शोषून घेणें ।
सूखा—( वि० ) वाळलेला; पातळ; रोडलेला ।
—जवाब—( ना० पु० ) स्पष्ट नकार; निषेध ।
सूगा—( ना० पु० ) तोता ( हिं० ) राघू; पोपट ।
सूची—( ना० स्त्री० ) सुई ।
सूजन—( ना० स्त्री ) आभास ( हिं० ) सूडा ।
सूजना—( अ० क्रि० ) फूलना ( हिं० ) सुजणें; फुगणें; रुसणें ।
सूजनी—( ना० स्त्री० ) रूभरलेलें कापड ।
सूजा—( ना० पु० ) मोठी सुई; दाभण ।

सूजी—( ना० स्त्री० ) जेवण; पीठ; सुई ।
सूजी—( ना० पु० ) दर्ज़ी ( हिं० ) शिंपी ।
सूझ—( ना० स्त्री० ) सिधाई ( हिं० ) सरळपणा; दृष्टी-नजर ।
सूझना—( अ० क्रि० ) दिखाई देना ( हिं० ) दिसणें; दृष्टीस पडणें ।
सूतक—( ना० पु० ) मुलाच्या जन्मामुळें किंवा नातेवाई-काच्या मृत्यु मुळें आलेला अशौच; सुतक ।
सूतना—( स० क्रि० ) "सूंतना" पहा ।
—( अ० क्रि० ) झोंपीं जाणें; झोंपणें ।
सूतला+—( ना० पु० ) गाडीचा लगाम ।
सूतली—( ना० स्त्री० ) सुतळी; सडा ।
सूती—( वि० ) सुताचा; सुताचा बनविलेला ।
—मास–( ना० पु० ) गर्भाचा शेवटचा महिना ।
सूथनी—( ना० स्त्री० ) "सुथनी" पहा ।
सूद—( ना० पु० ) नफा; व्याज ।
—वट्टा–( ना० पु० ) व्याज बट्टा ।
—ख़ोर–( ना० पु० ) व्याज बट्टा करणारा ।
—खोरी–( ना० स्त्री० ) व्याज बट्टा ।
—दरसूद–( ना० पु० ) चक्रवाढ व्याज ।
वे–( वि० ) विनव्याजी; निष्फल ।
सूदी—( वि० ) सूदपर ( हिं० ) व्याजानें ।
सूधा—( वि० ) ठीक हिं० ) योग्य; खरें; सरळ ।
सूधाई—( ना० स्त्री० ) सरळपणा; भोळेपणा ।
सून—( ना० स्त्री० ) ख़ामोशी (हिं०) शांतता; स्तब्धता; स्थिरपणा ।
सूना—( वि० ) खाली ( हिं० ) रिता; शून्य ।
सूप—( ना० पु० ) धान्य पाखडण्याचें सूप ।
सूपा वेना—( ना० पु० ) गळा; अन्नमार्ग ।
सूवड़ा—( ना० पु० ) हिणकस सोनें-चांदी ।
सूवर—( वि० ) मिलवा ( हिं० ) अशुद्ध; हिणकस ।
सूवा—( ना पु० ) प्रान्त ।
—दार–( ना० पु० ) सुभेदार ।
—दारी–( ना० स्त्री० ) सुभेदारी ।

सूम—( ना० पु० ) कंजूस ( हिं० ) कृपण; कंजूष ।
—पन, पना–( ना० पु० ) कार्पण्य; कृपणपणा; निर्लज्जपणा ।
सूर—( ना० पु० ) बहादुर ( हिं० ) शूर; वीर, सूर्य ।
—वीर–( ना० पु० ) योद्धा ।
सूरज—( ना० पु० ) सूर्य ।
—मयुल–( ना० पु० ) सूर्याचें खळें ।
सूरत—( ना० स्त्री० ) चेहरा ( हिं० ) मुखड़ा; आकार; तोंडावरील तेज-पाणी ।
—हराम–(वि०) बाहेरून चांगला व आंतून काळा ।
सूल—( ना० पु० ) काल; शूळ; दुःख; भाल्याचें टोंक किंवा फळ; टोंचणी ।
सूली—( ना० स्त्री० ) सूळ; संकट ।
सूवा, सूआ—( ना० पु० ) सुग्गा ( हिं० ) पोपट,राघू ।
सूसी—( ना० स्त्री० ) सुती कापड, एक प्रकारचें कापड ।
सूहा—( वि० ) लाल, किरमची ।
सेंक—( ना० पु० ) शेक, शेकणी ।
सेंकना—( स० क्रि० ) शेकणें, शेक देणें ।
सेंगरी—(ना० स्त्री०) फली, छीमी (हिं०) शेंग, चिंबी ।
सेंठा—( ना० पु० ), सेंठी—( ना० स्त्री० ) एक प्रकारचा वेत ।
सेंत—, सेंतमेंत— ( अ० ) मुफ्त ( हिं० ) फुकट, तसेंच ।
सेतना—( स० क्रि० ) "सेतना" पहा ।
सेंतालीस—( वि० ) सत्तेचालीस, ४७ ।
सेंतीस—( वि० ) सदतीस, ३७ ।
—वाँ—( वि० ) सदतीसाव्वा ।
सेंद—( ना० स्त्री० ) भाजी ।
सेंदुरिया—( ना० पु० ) शेंदीरी अंबा ।
सेंध—( ना० स्त्री० ) नक़ब ( हिं० ) चोरांनी भिंतीला पाडलेलें भगदाड, घर फोडणें ।
सेंधना—( स० क्रि० ) खोदना ( हिं० ) खोदणें, खणणें, उकरणें ।

सेंधा—( ना० पु० ) सैंधव, पांढरे मीठ।
सेंधिया—( ना० पु० ) घर फोडणारा, विष।
सेंधी—( ना० स्त्री० ) खजूराच्या झाडाचा रस किंवा, चीक।
सेंहुआ—( ना० पु० ) चकदल, रोग विशेष।
सेक—( ना० पु० ) "सेक" पहा।
सेकना—( स० क्रि० ) "सेंकना" पहा।
सेज—( ना० स्त्री० ) शय्या, आंथरूण।
—बन्द—( ना० पु० ) आंथरुणाच्यादोऱ्या।
सेठ—( ना० पु० ) साहूकार ( हिं० ) सावकार, शेठ।
सेठन—( ना० स्त्री० ) एक प्रकारचा कुंचला।
सेतक्ष—( वि० ) सफेद ( हिं० ) पांढरा, श्वेत।
सेतना—( स० क्रि० ) हिफाजत करना ( हिं० ) कालजी घेणें, कालजी पूर्वक राखणें।
सेदखाना—( ना० पु० ) पाखाना ( हिं० ) पायखाना, शौचकूप।
सेना—( स० क्रि० ) पालना ( हिं० ) पालन करणें, उबविणें, पोसणें, आपंगणें।
सेनानी—( ना० पु० ) सेनापति, सेना नायक।
सेब—( ना० पु० ) फल विशेष।
सेम—( ना० स्त्री० पु० ) घेवडा घेवडी।
सेमल—( ना० पु० ) सावरी, सावरीचें झाड।
सेर—( ना० पु० ) शेर।
सेराना—( स० क्रि० ) ठंढा करना ( हिं० ) थंड करणें। निववीणें, तरंगत ठेवणें, धाडणें, पिटाळणें।
सेरू—( ना० पु० ) भाला।
सेव—( ना० पु० ) शेव, एक मिठाई।
सेवई—( ना० स्त्री० ) शेवई, शेवया।
सेवकाई—( ना० स्त्री० ) नौकरी ( हिं० ) चाकरी, सेवा।
सेवड़ा—(ना० पु०) जैन भिक्षुक, मांन्त्रिक, गारुडी, ठक।
सेवन—( ना० पु० ) नोकरी, चाकरी।
सेवना—(स० क्रि०) सेवा करणें, उबविणें, चाकरी करणें।
सेवारी—( ना० स्त्री० ) सेवाळयानें स्वच्छ केलेली साखर एक प्रकारची साखर।

से[illegible]त—( ना० स्त्री० ) तन्दुरुस्ती ( हिं० ) आरोग्य।
सेहरा—( ना० पु० ) मंडोली, तुरा।
से[illegible]ी—( ना० स्त्री० ) "साहा" पहा।
सै—( वि० ) सैंकड़ा ( हिं० ) शभर।
सैंगर—( ना० पु० ) एक जातीचा घेवड़ा।
सैंतालीस—( वि० ) सत्तेचाळीस ४७।
सैंताव—( ना० पु० ) व्यवस्था, रचना।
सैंतीस—( वि० ) सदतीस ३७।
सैकड़ा—( ना० पु० ) एकशे, शंभर।
( वि० ) शेकडा।
सैन—( ना० स्त्री० ) सूचना, खूण, डुलकी, सैन्य।
सैलानी—( वि० ) आवारा ( हिं० ) भटक्या, फिरस्ता, हिंडणारा।
सैसांझ—(ना० स्त्री०) संध्याकाळचा प्रारम्भ, तिसरा प्रहर।
सैहरन—( ना० स्त्री० ) सोसणूक. क्षमा क्षांति।
सैहरनी—( ना० पु० ) सोसणारा, भोगणारा।
सो—( स० ना० ) वह ( हिं० ) तो, ती।
( अ० ) म्हणून. या करितां।
सोअर+—( ना० पु० ) बाळंतघर, बाळंतखोली।
सोआ—( ना० पु० ) बड़ीशेप बड़ीशोप।
सोई—( स० ना० ) तोच, तो स्वतः।
सौं—( ना० स्त्री० ) क़सम ( हिं० ) शपथ।
( अ० ) से ( हिं० ) पंचमीचा प्रत्यय।
सोंटा—( ना० स्त्री० ) दण्डा ( हिं० ) सोटा, दंड।
—बर्दार—( ना० पु० ) लाठीवाला।
सों—( ना० स्त्री० ) सूखा अदरक ( हिं० ) सुंठ।
सोंढूराय—( ना० पु० ) कंजूष, कृपण मनुष्य।
सोंधना—(स० क्रि०) मातीलावून कपड़ा धुणें मिसळणें।
सोंधाना—( स० क्रि० ) सुवासिक करणें सुगंधदेणें।
सोंधा—( वि० ) एक प्रकारच्या गोडवासचा।
सोंधापन—( ना० पु० ) } सुवास, सुगंध।
सोंधाहट—( ना० स्त्री० ) }
सोंपना—( स० क्रि० ) सोपविणें, हवाली करणें, ताब्यांत देणें।

सौंहीं—( अ० ) समक्ष, प्रत्यक्ष, अपरोक्ष ।
सोखना—( स० क्रि० ) सुखविणें शोषून घेणें ।
सोग—( ना० पु० ) दुःख, चिंता शोक, शोच ।
सोगा—( वि० ) दुःखी, शोकाकुल ।
सोच—( ना० पु० ) विचार, कल्पना, ध्यान, चिंता, दुःख, शोक ।
सोचना—( स० क्रि० ) ख्याल करना ( हिं० ) विचार करणें, कल्पना करणें, समजणें ।
सोझ—( ना० स्त्री० ) सीध ( हिं० ) सरळपणा ।
सोझा—( वि० ) सीधा ( हिं० ) सरळ, साधा ।
सोत—, सोता— } ( ना० पु० ) झरा, स्रोत, ओढा, ओघळ ।
सोता—( वि० ) झोपीं गेलेला, झोपलेला ।
सोथ—( ना० स्त्री० ) सूजन ( हिं० ) सूज ।
सोध—( ना० स्त्री० ) सफाई, खोज, ( हिं० ) शुद्धता शोध, चौकशी ऋणमुक्ति-फेड ।
सोधना—( सं० क्रि० ) शुद्ध करणें, शोधणें, कर्ज फेडणें।
सोनहरा—, सोनहला— } ( वि० ) सोनेरी, सोन्याचा ।
सोना—( ना० पु० ) सोनें, सुवर्ण ।
सोने का निवाला—( ना० पु० ) चमचमित, मेजवानी।
सोना—( अ० क्रि० ) निजणें, मरणें ।
सोनिया—( ना० पु० ) सोनें काढणारा ।
सोभना—( अ० क्रि० ) शोभणें, योग्य होणें ।
सोभा—( ना० स्त्री० ) शोभा, भूषण, आरास ।
सोरठ—( ना० स्त्री० ) गाण्यातील एक राग ।
सोरठा—( ना० पु० ) हिंदी काव्यांतील एक छंद ।
सोलह—( वि० ) सोळा, १६ ।
सोलही—( ना० स्त्री० ) सोळाकवड्यांनी खेळण्याचा एक खेल ।
सोह—( ना० स्त्री० ) आभरण, भूषण, दागिना ।
सोहन—( वि० ) सज्जन; आवडता, प्रिय ।
( ना० स्त्री० ) सहाण एक मिठाई ।
( ना० पु० ) मित्र, प्राणपति, प्राणनाथ ।

सोहना—( अ० क्रि० ) पसंद आना ( हिं० ) पसंत पडणें, मनाला येणें, लागू पडणें ।
सोहाई—( ना० स्त्री० ) वेणणें, खुरपणी ।
सोहागा—( ना० पु० ) टांकणखार, टंकण ।
सोहिणो—( वि० ) सुहावनो ( हिं० ) सुंदर मनोहर ।
सौ—( वि० ) "सैकड़ा" पहा ।
सौंदना—( स० क्रि० ) मिलाना ( हिं० ) मिसळणें, मारवणें ।
सौंपना—( स० क्रि० ) "सौंपना" पहा ।
सौंफ़—( ना० स्त्री० ) बड़ी शोप ।
सौंरा—( ना० पु० ) घरोसा, धुरकट ।
सौगंद—( ना० स्त्री० ) कसम ( हिं० ) शपथ ।
सौगात—( ना० स्त्री० ) तोहफ़ा ( हिं० ) बक्षिस, नजराणा ।
सौगाती—( वि० ) भेट किंवा नजर म्हणून दिलेला ।
सौत—, सौनी— } ( ना० स्त्री० ) सवत, दुसरी बायको ।
सौतियाडाह—( ना० स्त्री० ) सवती, मत्सर ।
सौतेला—( वि० ) सवतीचा, सावत्र ।
—भाई—( ना० पु० ) सावत्र भाऊ ।
सौदा—( ना० पु० ) व्यापार खरेदी, व्यवहार माल ।
—गर—( ना० पु० ) व्यापारी ।
—गरी—( ना० स्त्री० ) व्यापार, व्यवहार ।
सौरि—, सौरी— } ( ना० स्त्री० ) बाळतघर ।
स्यानपन—( ना० पु० ) हुषारी, नैपुण्य, शहाणपणा ।
स्याना—( वि० ) चतुर, हुषार, शहाणा ।
स्यामा—( ना० स्त्री० ) एक जातीची चिमणी ।
स्यार—( ना० पु० ) सियार ( हिं० ) कोल्हा ।
स्याह—( वि० ) काला, अंधेरा ।
—दिल—( वि० ) काळ्या अन्तःकरणाचा ।
स्याहा—( ना० पु० ) हिशोब वही, खाते वही ।
स्याही—( ना० स्त्री० ) कालख (हिं०) शाई, काळेपणा ।
—चट—( ना० पु० ) टीपकागद ।

स्वाँग—( ना० पु० ) नक़ल ( हिं० ) नक्कल, सोंग, अनुकरण।

स्वाँगी—( वि० ) नक़लची ( हिं० ) नकल्या।

स्वाधीन—( वि० ) स्वतंत्र, मुखत्यार।

स्वाधीनता—( ना० स्त्री० ) आज़ादी (हिं०) स्वतंत्रता।

स्वारथ—( वि० ) मतलब।

स्वासा—( ना० पु० ) साँस ( हिं० ) श्वासोच्छ्वास, जीव।

स्वेत—( वि० ) सफेद ( हिं० ) पांढरे, श्वेत।

---

## ह

हंकाना—( स० क्रि० ) हाकणें, आड मार्गाला लावणें।

हंकार—( ना० पु० ) चिल्लाहट ( हिं० ) ओरड, हांकणें।

हंकारना—( स० क्रि० ) हाकालणें, खटका, उडणें, भांडणें।

हंकारी—( वि० ) अहंकारी, गर्विष्ट।

हंगामा—( ना० पु० ) झगड़ा (हिं०) भांडण, दंगा, हल्ला।

हंफैल—( वि० ) हाँफता ( हिं० ) धापा टाकणारा।

हंसना—( अ० क्रि० ) हसणें, फजीत करणें।

हंसमुख—( वि० ) खुश ( हिं० ) हसतमुख आनन्दी।

हंसली×—( ना० स्त्री० ) हसळी।

हंसाई—( ना० स्त्री० ) ठट्टा ( हिं० ) थट्टा, विनोद।

हंसाना—( स० क्रि० ) हसविणें।

हंसिया—, हंसुआ— } ( ना० पु० ) इळी, कीमती, कोयतें।

हंसी—( ना० स्त्री० ) खेळ, हशा, गंमत, हसें।

हंसौड़—, हंसौड़ा— } ( वि० ) विनोदी, आनन्दी, हसरा, थट्टेखोर।

हंसौवा—( ना० पु० ) हंसोड़पन ( हिं० ) थट्टेखोरणा,

हक़—, हक्क— } ( वि० ) ठीक ( हिं० ) न्याय, बरोबर, खरें।

( ना० पु० ) हक्क, न्याय, क़र्तव्य- सत्य।

हकबकाना—( अ० क्रि० ) घबड़ाना ( हिं० ) व्याकुल, होणें, घाबरणें, उद्विग्न होणें।

हकला+—( वि० ) तुतला, लड़बड़ा ( हिं० ) तोतरा चोचरा, बोलतांना, आडखळणें।

हकलाना—( अ० क्रि० ) तुतलाना ( हिं० ) चोचरे, बोलणें, तोतरे बोलणें।

हकलाहा—( ना० पु० ) तोतरा, चोचरा।

हकारना—( स० क्रि० ) खदेड़ना ( हिं० ) हाकणें, पळविणें।

हकिया—( वि० ) कटहा, कटखना ( हिं० ) चावरा, पिसाळलेला।

हकीकत—( ना० स्त्री० ) वारता ( हिं० ) सत्य, खरें।
—में—( अ० ) खरोखर।

हक़्क़ी—( वि० ) सच्चा ( हिं० ) खरा, प्रत्यक्ष।
—भाई—( ना० पु० ) खरा बन्धू।

हकीम—( ना० पु० ) वैद्य।
—नीम—( ना० पु० ) बिन अनभवी वैद्य।

हक़ीर—( वि० ) तुच्छ, पातळ, सूक्ष्म।

हकाबका—( वि० ) परेशान ( हिं० ) गोंधळलेला, घाबरलेला।

हक़ियत—( ना० स्त्री० ) मालकी, स्वामित्व।

हगनेटी—( ना० स्त्री० ) शौचाची जागा।

हचका—, हचकोला— } ( ना० पु० ) धक्का, हिसका।

हचर मचर—( ना० पु० ) झगड़ा (हिं०) तंटा, बखेडा ढिलेपणा।

हज़म—( ना० पु० ) पाचन, परिपाक।

हज़रत—( ना० स्त्री० पु० ) महाराज, श्रीमंत।

हज़ारी—( ना० स्त्री० ) हजार घोडेस्वारांचा नायक।
—बजारी—( ना० पु० ) सर्व तऱ्हेची, माणसें, राव व रंक।

हजो—( ना० स्त्री० ) बुराई ( हिं० ) निंदेचा पोवाडा।

हज्ज—( ना० पु० ) मक्केची यात्रा।

हट, हठ—( ना० स्त्री० ) ज़िद्द ( हिं० ) हट्ट, चिकाटी।

हटक—( ना० पु० ) रोक ( हिं० ) प्रतीरोध, निषेध ।
हटकना—( स० क्रि० ) रोकना ( हिं० ) निषेध करणें, प्रतिरोध करणें ।
हटकाना—( स० क्रि० ) थांबविणें ।
हटका हटकी—( ना० स्त्री० ) मागे हटविणें, झगडणें ।
हटताल— } ( ना० स्त्री० ) हरताळ, बाजारांतील सर्व
हड़ताल— } दुकानें, वन्द ठेवणें ।
हटना—( अ० क्रि० ) मागें सरणें, मागें पडणें, माघार, घेणें, खचणें, पराजित होणें ।
हटवा—( ना०पु० ) धान्य तोलणारा किंवा मोजणारा ।
हटवाई—( ना० स्त्री० ) धान्य मोजणाराची कचेरी ।
हटाना—( स० क्रि० ) हटविणें, दूर करविणें ।
हटिया—( ना० स्त्री० ) हाट ( हिं० ) बाजार ।
हट्टा कट्टा—( ना० स्त्री० ) हट्टा कट्टा, धडधाकट ।
हट्टा+—( ना० स्त्री० ) कलप, झुंड, खांड, थवा ।
हठ—( ना० स्त्री० ) "हट" पहा ।
—धर्मी—( वि० ) हट्टी, एक कल्ली ।
हठना—( अ० क्रि० ) हट्ट करणें, चिडणें, हट्ट धरून, बसणें ।
हठरना+—( अ० क्रि० ) घाई करणें, उतावीळ होणें ।
हठी— } ( वि० ) हट्टी, चिडखोर, एक कल्ली ।
हठोजा— }
हट्टर—( ना० पु० ) घाई, उतावीळ ।
हड—( ना० पु० ) हडें ।
हड़गीला—( ना० पु० ) पक्षि विशेष ।
हड़जोड़ा—( ना० पु० ) एक औषधि वनस्पति ।
हड़पना—( ना० पु० ) अज्ञान, हूडपणा, उतावळपणा, घेतलेली वस्तु परत न करणें ।
हड़फूटन—( ना० पु० ) हड्डियों में दर्द ( हिं० ) हडा मध्यें होणारी पीडा ।
हड़वड़ाना—( अ० क्रि० ) गोंधळणें, घाई करणें ।
हड़वड़िया—( वि० ) जल्दीबाज़ ( हिं० ) उतावीळ, उतावळा ।
हड़वड़ी—( ना० स्त्री० ) जल्दी ( हिं० ) गड़वड़, दंगा, अव्यवस्था ।
हड़वड़ाना—( अ० क्रि० ) घाई करणें ।
हड़हड़ना—( अ० क्रि० ) कुडकुडणें; थरथरणें, अंगावर, कांटा येणें ।
हड़हड़ाहट—( ना० स्त्री० ) खडवड, हड़हड़ आवाज ।
हड़ाहड़ी— } (ना० स्त्री०) बाणाचा टणत्कार, झंकार ।
हड़ाहड़ा— }
हड्डा—( ना० पु० ) वारूळ, कुन्धारीण, हडें ।
हड्डी—( ना० स्त्री० ) अस्थि, हडें ।
हड्डीला—( वि० ) हडाचा कठीण, घट्ट ।
हण्डा—( ना० पु० ) मोठें भांडें ।
—भाड़ा—( ना० पु० ) माल, भाज वहातूक ।
हण्डाना—( अ० क्रि० ) निकालना ( हिं० ) हकालपट्टी करणें, काढून लावणें ।
हण्डिका — } ( ना० स्त्री० ) हण्डा, मोठें भांडें ।
हण्डी— }
हतक—( ना० स्त्री० ) अपमान, मानहानी ।
हतनी—( ना० स्त्री० ) मादा हाथी ( हिं० ) हत्तीण ।
हत्यारा—( ना० पु० ) घातक, मारेकरी, नीच ।
हत्यारी—( ना० स्त्री० ) हत्या, मारण्याचें पाप ।
हथ—( ना० पु० ) हाथ ( हिं० ) हात ।
—फूल—( ना० पु० ) एक भूषण ।
—फेर—( ना० पु० ) उसनवार, हात, चलाखी, हस्त लाघव ।
—लेवा—( ना० पु० ) लग्नांतील एक विधि ।
—खण्डा—( ना० पु० ) संवय, खुबी !
—छुट—( ना० पु० ) मारणारा, मारकाट ।
नाल—( ना० स्त्री० ) हतीवरील तोफ ।
हथनी—( ना० स्त्री० ) हत्तीण ।
हथरी—( ना० स्त्री० ) दांडा, आंग चोरणें ।
हथिया- ( ना० पु० ) एक नक्षत्र ।
—की राह—( ना० स्त्री० ) आकाश गंगा ।
हथियाना—( स० क्रि० ) पकडणें, धरणें ।
हथियार—( ना० पु० ) हत्यार, शस्त्र, औजार ।
—बन्द—( वि० ) सशस्त्र ।

हथी—( ना० स्त्री ) घोड्याचा खरारा ।
हथेला—( ना० पु० ) हथलेवा ( हिं० ) चोर; स्तेन ।
हथेली—( ना० स्त्री० ) तलहात ।
हथौटी—( ना० स्त्री० ) हतोटी, चतुरता, कौशल्य ।
हथौड़ा—( ना० पु० ) हथौडा, घण ।
हथौडी—( ना० स्त्री० ) लहान हथौड़ी ।
हदरना—( अ० क्रि० ) थरथरणें, कुडकुडणें ।
हदियाना—( अ० क्रि० ) कांकूं करणें, अनमान करणें ।
हदियाहट—( ना० स्त्री० ) संकोच, लाजाळूपणा ।
हदियाहा—( वि० ) मित्रा, लाजाळू, झोंपाळू ।
हद—( ना० स्त्री० ) मर्यादा; शेवट, सीमा ।
हप—( ना० पु० ) गिळण्याचा आवाज, गड़प, गट्ट ।
—झप—( वि० ) घाई, घाईचा ।
हफहफान—( अ० क्रि० ) धापा टाकणें, दम लागणें ।
हफ़्तार—( ना० पु० ) सप्ताह ( हिं० ) आठवडा ।
हबड़ा—( वि० ) भद्दा ( हिं० ) बेडौल, बोअड ।
हबरहबर—( अ० ) घाईनें, तातडीनें ।
हबशी—( ना० पु० ) नीग्रो, अबिसीनियांतील मनुष्य ।
हब्बा—( ना० पु० ) दाणा, धान्याचा कण, ठपका, शिक्का ।
हबस—( ना० पु० ) कैद, भरणें ।
हम—( स० ना० ) आम्ही ।
हमल—( ना० पु० ) गर्भ धारणा ।
हमला—( ना० पु० ) हल्ला, चढ़ाई, चाल, घाला ।
हमेम+—( ना० पु० ) अहंकार, पोकळ डौल, गर्व ।
हमेशा—( अ० ) सदा नेहमीं, सतत ।
हम्माल—( ना० पु० ) दरबान ( हिं० ) देवढ़ी वाला, दर्वान, द्वारपाल ।
हया—( ना० स्त्री० ) शरम ( हिं० ) लाज, विनय ।
—दार—( वि० ) विनय; शील ।
बे—( वि० ) निर्लज्ज, उद्धट ।
बेहयाई—( ना० स्त्री० ) निर्लज्जपणा ।
हयात—( ना० स्त्री० ) जिन्दगी ( हिं० ) जीवन ।
—अस्तित्व, हान—( ना० स्त्री० ) जीवित, आयुष्य ।
—हान—( अ० ) आयुष्य भरांत ।
हर—( ना० पु० ) हल ( हिं० ) नांगर ( वि० ) प्रत्येक ।
—बार—( अ० ) प्रत्येक वेळा ।
—कोई—( ना० पु० ) प्रत्येक जण कोणी ही ।
—कारा—( वि० ) हरकाम्मा ।
हरका—( ना० पु० ) ओरडणें, कण्हणें ।
हरकाना—( स० क्रि० ) थांबविणें, मना करणें, आडकाठी करणें; होरपळणें ।
हरकारा—( ना० पु० ) डाकिया ( हिं० ) संदेशवाहक, बातमीदार ।
हरख—( ना० पु० ) आनन्द, खुषी, सुख, चैन ।
हरखना—( अ० क्रि० ) आनन्द होणें, विकसणें ।
हरगुणी—( वि० ) होशियार ( हिं० ) चतुर, कुशल ।
हरताल—( ना० स्त्री० ) "हड़ताल" पहा ।
हरना—( ना० पु० ) हरण, काळवीट ( स० क्रि० ) हरण करणें, लुटणें ।
हरनी—( ना० स्त्री० ) हरनी; मृगी ।
हरनौटा—( ना० पु० ) पाडस, हरणाचें पिलूं ।
हरफारेवड़ी—( ना० स्त्री० ) एक प्रकारचें आंबट फल ।
हरमुष्टा—( वि० ) दांडगा, सशक्त; चपळ ।
हरमुष्टी—( ना० स्त्री० ) दांडगेपणा, सशक्तता, बळकट पणा ।
हरवाहा—( ना० पु० ) नांगरहा; हलधर ।
हरसिंगार—( ना० पु० ) सुगंधित पुष्प ।
हरा—( वि० ) सब्जा ( हिं० ) हिरवा, ताजा; अपयशी; पराजित ।
हराई—( ना० स्त्री० ) सब्जी ( हिं० ) हिरवेपणा; ताजे-पणा ।
हराना—( स० क्रि० ) थकविणें; हटविणें; जिंकणें ।
हराम—( वि० ) नाजायज़ ( हिं० ) त्याज, चूक; नीच नष्ट ।
—खोर—( ना० पु० ) अनीतिवर जगणारा ।
—ज़ादा—( वि० ) अनौरस ।
—जादी—( ना० स्त्री० ) दुष्ट स्त्री ।

—ज़ादगी—(ना० स्त्री०) हलकट पणा।
—कार—(ना० स्त्री०) हलकट; कृत्यें।
—का माल—(ना० पु०) कुमार्गानें मिळविलेलें, धन।
हरामी—(ना० पु०) हलकट, दुष्ट।
—पिल्ला—(ना० पु०) रांडेचा; दासीचा; किंवा बटकीचा मुलगा।
हरारा—(ना० पु०) भित्रा; पळ पुटा।
हरावल—(ना० पु०) विनी, विनी वाले।
हरिचंदन—(ना० पु०) एक जातिचें चंदन।
हरियल—(ना० पु०) सब्ज कबूतर (हिं०) हिरवें, कबूतर किंवा पारवल।
हरियाना—(अ० क्रि०) हरा होना (हिं०) हिरवा होणें; ताजातवाना होणें, हुषारी येणें।
हरियाला—(वि०) सब्ज (हिं०) "हरा" पहा।
हरियाली—(ना० स्त्री०) सब्जी (हिं०) "हराई" पहा हिरवें गवत।
हरिस—(ना० स्त्री०) नांगराचें लाकूड।
हरीरा—(ना० पु०) कढी, एक पेय।
हरीरी—(ना० स्त्री०) हल्ला, चाल धमार।
हरीला—(वि०) हिरवा, ताजा; (ना० पु०) मित्रा, पळपुट्या।
हरीवा—(ना० पु०) पोपट, राघू।
हरेरा—(ना० पु०) एक प्रकारची भाजी (वि०) हिरवा ताजा।
हरौटी—(ना० स्त्री०) छडी; काठी।
हर्गिज़—(अ०) कभी (हिं०) केव्हांही।
हर्ज़—(ना० पु०) नुकसान (हिं०) तोटा; गोता; हरकत; धक्का।
हर्फ़—(ना० पु०) अक्षर; मूळाक्षर; हस्ताक्षर; अव्यय, शब्द।
हर्रा—(ना० पु०) हर्डा।
हर्षना—(अ० क्रि०) आनन्दित होणें।
हल—(ना० पु०) नांगर; गर्भाशय।
—जोता—(ना० पु०) नांगऱ्या, नांगरणारा।

हल—(ना० पु०) उलगडा; फोड; दळणें।
हलक़—(ना० पु०) गळा (हिं०) गळा; नळी।
हलक़ा—(ना० पु०) चक्र; वर्तुल; अंगठी; चक्कर।
हलका—(वि०) हलका, नीच; सोपा; स्वस्त।
—पन—(ना० पु०) हलकेपणा, हलकटपणा।
हलकाई—(ना० स्त्री०) "हलकापन" पहा।
हलकाना—(अ० क्रि०) पाठपुरावा करणें; मदत देणें।
हलकोरना—(स० क्रि०) जमा करणें; एकत्रित करणें, हेलावणें, हालणें।
हलगी—(अ०) सावकाश; हळूच।
हलचल—(ना० स्त्री०) गडबड; दंगा, गोंगाट।
हलद्रिया—(ना० पु०) व्यापाऱ्याची एक जात; एक प्रकारचें, विष; कावीळ; कामीण; (वि०) पिवळा।
हलदी—(ना० स्त्री०) हळद।
हलपना—(अ० क्रि०) तड़फड़ाना (हिं०) व्याकुळ; होणें; उद्विग्न होणें; तडफडणें।
हलफ़—(ना० पु०) शपथ।
—नामा—(ना० पु०) शपथ पत्र।
हलफ़ल—(ना० स्त्री०) गड़बड़; घाई,
हलफा—(ना० पु०) मोठी लाट; समुद्र; लाट।
हलवलाना—(अ० क्रि०) घबड़ाना (हिं०) गोंधळणें घाबरणें।
हलवलाहट—(ना० स्त्री०) परेशानी; घबड़ाहट (हिं०) गोंधळ; घाई; भीति; घाबरटपणा।
हलरा—(ना० पु०) तरंग; लहर;।
हलरावना—(अ० क्रि०) विनोद करणें; मनरंजन करणें।
हलवा—(ना० पु०) सांजा; शिरा।
हलवाइन—, हलवायन— (ना० स्त्री०) हलवायाची स्त्री, हलवाईण।
हलवाहा—(ना० पु०) हरवाहा (हिं०) नांगऱ्या।
हलवाही—(ना० स्त्री०) नांगरणें, लागवड।
हलहलाना—(स० क्रि०) हलविणें, थरथरविणें, रोमांचित करणें।
हलहलाट—, हलहलाहट— (ना० स्त्री०) रागानें किंवा भीतीनें थरथर कांपणें।

हलहली—( ना॰ स्त्री॰ ) अजार, रोग, संधिवात।
हलाई—( ना॰ स्त्री॰ ) "हलवाही" पहा।
हलाक—( ना॰ पु॰ ) वध, मृत्यु, नाश।
—त ( ना॰ स्त्री॰ ) मौत ( हिं॰ ) नाश, मृत्यु।
हलाकू—( वि॰ ) मृत, नाशक, मारणारा।
हलिया—( ना॰ पु॰ ) कळप, झुंड, थवा।
हलियाना—( अ॰ क्रि॰ ) कंटाळणं, किळसणें, विटणें।
हलोरना—( स॰ क्रि॰ ) "हलकोरना" पहा।
हलोरा—( ना॰ पु॰ ) लहर, लाट, समुद्र-लाट।
हल्ला—( ना॰पु॰ ) शोर ( हिं॰ ) गलबला, दंगल, हल्ला, गडबड, गोंगाट।
हवस— } ( ना॰ स्त्री॰ ) आकांक्षा, हव्यास, इच्छा,
हविस— } जिज्ञासा, हौस।
हवा—( ना॰ स्त्री॰ ) वायु, परिस्थिति।
हवाई—( वि॰ ) हवेचा, हवेशीर।
—चक्की ( ना॰ स्त्री॰ ) पवनचक्की।
हवाला—( ना॰ पु॰ ) तावा, सम्बन्ध।
हवालात—( ना॰ स्त्री॰ ) कारागार ( हिं॰ ) कोठडी, देवढी, तुरुंग।
हवास—( ना॰ पु॰ ) शुद्धी, चेतना इंद्रियें।
हवेली—( ना॰ स्त्री॰ ) मकान ( हिं॰ ) घर वाडा।
हसद—( ना॰ स्त्री॰ ) डाह ( हिं॰ ) मत्सर।
हसना—( अ॰ क्रि॰ ) "हंसना" पहा।
हातिम—( ना॰ पु॰ ) पुण्यात्मा, उदार धी।
हाथ—( ना॰ पु॰ ) हात।
हाथा—( ना॰ पु॰ ) हात, तावा, सामर्थ्य।
—बांही ( ना॰ स्त्री॰ ) धक्काबुक्की, भांडण, हातघाई।
हाथी—( ना॰ पु॰ ) हत्ती, वान ( ना॰ पु॰ ) माहुत।
हापर—( ना॰ स्त्री॰ ) उसाकरितां तयार केलेली जमीन।
हाफ़िज़—( ना॰ पु॰ ) रक्षक, पालनकर्ता, ज्याला सर्व कुराण मुखोद्‌गत आहे असा।
हाफ़िज़ा—( ना॰ पु॰ ) ज़हन ( हिं॰ ) स्मरणशक्ति, धारणाशक्ति।
हामी भरना—( स॰ क्रि॰ ) स्वीकारणें, कबूल करणें, विश्वास ठेवणें।

हाय—( अ॰ ) अरेरे ! हाय हाय !! सुस्कारा वाईट शाप।
हार—( ना॰ स्त्री॰ ) शिकस्त ( हिं॰ ) पराजय; अपयश। ( ना॰ पु॰ ) माल।
—जीत—( ना॰ स्त्री॰ ) जुगार।
हारना—( अ॰ क्रि॰ ) हरणें, अपयश येणें, थकणें।
—हिम्मत—( स॰ क्रि॰ ) नाउमेद होणें।
हारियल—( ना॰ पु॰ ) हिरवे कबूतर। ( वि॰ ) हिरवा।
हारू—( ना॰ पु॰ ) खोनेवाला ( हिं॰ ) हारणारा, सांडणारा।
हार्द— } ( वि॰ ) मनापासूनचें; अन्तःकरण
हार्दिक— } पूर्वक।
हाल—( वि॰ ) जल्द ( हिं॰ ) जलद, लवकर। ( ना॰ पु॰ ) नांगर-स्थिति, परिस्थिति, वर्तमानकाळ, हक़ीकत।
हालत—( ना॰ स्त्री॰ ) अवस्था, स्थिति, परिस्थिति।
हाला—( ना॰ स्त्री॰ ) शराब ( हिं॰ ) दारू।
हालडोला—( ना॰ पु॰ ) हिलचुल ( हिं॰ ) धरणीकंप
हालात—( ना स्त्री॰ ) "हालत याचें अनेकवचन"।
हालाहली—( ना॰ स्त्री॰ ) "हाला" पहा।
हालिम—( ना॰ पु॰ ) हालीव, आहालीव।
हाव—( ना॰ पु॰ ) नखरा ( हिं॰ ) चोचले, हावभाव।
हाशिया—( ना॰ पु॰ ) किनारा ( हिं॰ ) कांठ।
हासिल—( ना॰ पु॰ ) उत्पन्न, परिणाम, फायदा, वसूल।
हासी—( ना॰ स्त्री॰ ) हंसी ( हिं॰ ) हसें, स्मित।
हाहा—( ना॰ पु॰ ) खुशामत; आर्जव, विनवणी।
हिंडोल—( ना॰ पु॰ ) पहाटे म्हणण्याचा संगीतांतील एक राग।
हिंडोला—( ना॰ पु॰ ) झोका, पाळणा, झोपाळ्या वरील गाणें।
हिकमत—( ना॰ स्त्री॰ ) हुनर ( हिं॰ ) युक्ती, शहाणपण, वैद्यकी।
हिकमती—( वि॰ ) चालाक ( हिं॰ ) हुषार, लुचा।
हिक़ारत—( ना॰ स्त्री॰ ) तिरस्कार, तिटकारा।
हिचकना—( अ॰ क्रि॰ ) मागें पाय घेणें, कांकूं करणें।

हिचकाना—( स० क्रि० ) दचकावसणें, हादरणें, आंचकणें, हिसडे बसणें ।
हिचकिचाना—( अ० क्रि० ) शंकाघेणें, अनमान करणें, कांकूं करणें, अधांत्री रहाणें ।
हिचकिची—( ना० स्त्री० ) अनमान, शंका ।
हिचकी—( ना० स्त्री० ) उचकी ।
हिचिरपिचिर—( ना० स्त्री० ) अनमान कांकूं ।
हिएडच—( ना० पु० ) भटकणारा, फिरणारा ।
हिदायत—( ना० स्त्री० ) शिक्षा ( हिं० ) शिक्षण, मार्ग दाखविणें ।
हिनहिनाना—( अ० क्रि० ) खिंकाळणें, खेकाळणें ।
हिना—( ना० स्त्री० ) वृक्ष-विशेष ।
हिनाई—( वि० ) हिन्याच्या रंगाचा ।
हिनौता—( ना० स्त्री० ) प्रार्थना, विनवणी, मिनतवारी, विनती ।
हिन्ताल—( ना० पु० ) एक जातीचें खजूराचें झाड ।
हिन्द—( ना० पु० ) हिन्दोस्तान ( हिं० ) भारतवर्ष ।
हिन्दवाना—( ना० पु० ) तरबूज, टरबूज ।
हिन्दी—( वि० ) हिन्दुस्तानी; हिन्दुस्तान विषयक ।
हिन्दोला—( ना० पु० ) "हिंडोला" पहा ।
हिफ़ाजत—( ना० स्त्री० ) रक्षा ( हिं० ) रक्षण, सुरक्षितता तावा ।
हिमाकत—( ना० स्त्री० ) बेवकूफ़ी ( हिं० ) मूर्खता, मूढता ।
हिमायत—( ना० स्त्री० ) रक्षण; पाठिंबा; मदत ।
हिम्मत—( ना० स्त्री० ) निश्चय, मन, धैर्य, औदार्य, जोम ।
हिया—( ना० पु० ) दिल ( हिं० ) छाती, जीव, आत्मा, अन्तःकरण ।
हियान—( ना० पु० ) "हिम्मत" पहा ।
हियो—( अ० ) गुरांना बोलावण्याचा आवाज ।
हिरद—, हिरदा—, हियौ— ( ना० पु० ) दिल ( हिं० ) मन, हृदय, अन्तःकरण, आत्मा जीव ।
हिरदावल—( ना० पु० ) घोडयामधील एक दोष ।
हिरन—( ना० पु० ) हरिण ।
हिरनी—( ना० स्त्री० ) हरिणी ।
हिरनौटा—( ना० पु० ) हरणाचें पिल्लू ।
हिराना—( श० क्रि० ) गमाविणें; सांडणें ।
हिरासत—( ना० स्त्री० ) निगरानी ( हिं० ) काळजी, तावा, रक्षण ।
हिर्का—( ना० स्त्री० ) युक्ति, उपाय ।
हिर्स—( ना० स्त्री० ) ख्वाहिश ( हिं० ) इच्छा, हाव, महत्वाकांक्षा ।
हिर्सी—( वि० ) लालची ( हिं० ) लोभी ।
हिसाव—( ना० पु० ) लेखा ( हिं० ) हिशोब ।
—किताव—( ना० स्त्री० ) हिशोबाची वही ।
हिलकना—( अ० क्रि० ) आळे पिळे देणें, दुःख सहन करणें ।
हिलकोर—( ना० स्त्री० ) क्षोभ, लहर, लाट ।
हिलकोरना—( स० क्रि० ) वटोरना ( हिं० ) जमा करणें, गोळा करणें, हालणें, झोंके खाणें ।
हिलकोरा—( ना० पु० ) लहर, लाट, उसाळी ।
हिलगना—( अ० क्रि० ) लटकत रहाणें, चिकटून रहाणें ।
हिलना—( अ० क्रि० ) हलणें, क्षुब्ध होणें, संवयीचा होणें ।
हिलमिल—( वि० ) मिलित, जिवलग ।
हिलमिलना—( अ० क्रि० ) खेळीमेळीणें रहाणें ।
हिला—( वि० ) पालू ( सिं० ) पालीव ।
—मिला—( वि० ) खेळी मेळीचा, प्रेमळ; स्मित ।
हिलाना—( स० क्रि० ) हलविणें, क्षुब्ध करविणें, माणसाळवणें, तरंगविणें ।
हिलोरना—( अ० क्रि० ) लाटा उसळणें ।
हिलोरा—( ना० पु० ) लाट, लहर ।
हिसका—( ना० पु० ) नक्कल, भाँडण, द्वेष ।
हिसाव—( ना० पु० ) हिशोब, गणित ।
हिसाबी—( वि० ) हिशोबाचा, हिशोब विषयक । ( ना० पु० ) हिशोबनीस, कारकून ।

हिस्सा—( ना० पु० ) भाग ।
—दार—( ना० पु० ) भागीदार ।
—दारी—( ना० स्त्री० ) भागीदारी ।
—रसदी—( ना० स्त्री० ) योग्यभागी ।
ही—(अ०) अगदीं, च; बरोबर, देखील, फक्त, खरोखर ।
हींग—( ना० पु० ) हिंग, हिंगाचें, झाड ।
हींसना—( अ० क्रि० ) खेकाळणें; ओरडणें ।
हीक—( ना० स्त्री० ) उबकाई ( हिं० ) वाईट स्वाद किंवा वास, घाण, पोटाचा आजार ।
हीर—( ना० पु० ) सार; तथ्य, मथितार्थ, वज्र; जोम । ( वि० ) शुद्ध, पवित्र ।
हीरक—
हीरा— } ( ना० पु० ) हिरा ।
हीरामन—( ना० पु० ) एक जातीचा पोपट ।
हीरावल—( ना० पु० ) फकीरांचा एक कपडा ।
हील—
हीला— } ( ना० पु० ) राड, चिखल गाळ, चीक ।
हीला—( ना० पु० ) बहाना ( हिं० ) बहाणा, सोंग, कपट, शकल; फटवण, पेंच ।
—बाज़—( वि० ) कपटी०, फसव्या ।
—हवाल—( ना० पु० ) छक्के पंजे, पेंचपांच ।
ही ही—( अ० ) आश्चर्य किंवा, हास्यबोधक, उद्गार ।
हुंकार—( ना० पु०) धमकीची सूचना देणारा आवाज, हुं ऽ ऽ ऽ ।
हुंडणी—
हुंडा— } ( ना० स्त्री० ) हुंडी; चेंक ।
हुँडार—( ना० पु० ) भेड़िया ( हिं० ) लांडगा ।
हुँडावन—( ना० पु० ) हुंडणावळ ।
हुकूमत—( ना० स्त्री० ) शासन, सत्ता ।
हुक्का—( ना० पु० ) चिलीम, नळीची चिलीम ।
हुक्काम—( ना० पु० ) शासक, राज्यकर्ते ।
हुक्म—( ना० पु० ) हुकुम, आज्ञा ।
—नामा—(ना० पु०) लेखी हुकुम कोर्टाचा निकाल ।
हुक्मी—( वि० ) खात्रीचा, जरूरीचा, आवश्यक ।
हुज्जत—( ना० स्त्री० ) बहस (हिं०) वादविवाद; पुरावा, संभाषण, टीका ।
हुज्जती—( वि० ) बहस करने वाला ( हिं० ) टीकाकार, भांडखोर ।
हुड़क—( ना० पु० ) ढोल ।
हुड़का—( ना० पु० ) दाराचा आडणा, लहान मुलांनी दाराबाहेर जाऊ नये म्हणून दाराला लावलेली लहानशी फळी ।
हुड़दंगा—( वि० ) दांडगेश्वर, मस्तखोर ।
हुड़दंगी—( ना० स्त्री० ) दांडगाई, मस्ती, मस्तखोर, स्त्री, आडदांड स्त्री ।
हुड़हुड़ी—( ना० स्त्री० ) बाणाचा टणत्कार ।
हुडुक—( ना० पु० ) "हुड़क" पहा ।
हुरगुएडा—( ना० पु० ) एक प्रकारची भाजी ।
हुरमत—( ना० स्त्री० ) मान, आदर, गौरव ।
हुरहुर—( ना० पु० ) एक प्रकारचें झाड ।
हुरुफ—( ना० पु० ) हर्फचें अनेक वचन, अक्षरें, वर्ण ।
हुर्रा—( ना० पु० ) फांकाफांक, विल्हेवाट, तुरंगांतून पुष्कळ कैद्यांची एकदम झालेली सुटका ।
हुर्सा—( ना० पु० ) सहाण, साण ।
हुलकना—( अ० क्रि० ) घुसणें, तुटुन पडणें ।
हुलकारना—( स० क्रि० ) छौ घालणें, चेतविणें ।
हुलकी—( ना० स्त्री० ) साथ, सांथीचा रोग ।
हुलसना—( अ० क्रि० ) आनंदित होणें, उल्हासणें ।
हुलसाना—( स० क्रि० ) आनंद करणें, जयजयकार-करणें ।
हुलास—( ना० पु० ) खुशी ( हिं० ) आनंद, उल्हास ।
हुलास—(ना० स्त्री० सुंघनी ( हिं० ) तपकीर ।
—दानी—( ना० स्त्री० ) तपकिरीची डबी ।
हुलिया—( ना० स्त्री० ) शरीर वर्णन ।
हुलुक—( ना० पु० )कै ( हिं० ) ओकारी ।
हुल्लड़—( ना० पु० ) भीड़, गड़बड़ ( हिं० ) गर्दी, गडबड, तंटा, झगडा ।
हूँ—( अ० ) होकारार्थी अव्यय ।
हूँसना—( अ० क्रि० ) शिक्षा करणें, टोला मारणें ।

हूँह—( ना० पु० ) गडबड, गोंगाट ।
हूक—( ना० स्त्री० ) दर्द ( हिं० ) दुःख, ठणका ।
हूड़ } ( ना० स्त्री० ) धींगाधींगी ( हिं० ) धिंगा-
हूड़ाहूड़ी } मस्ती, मारामारी ।
हून—( ना० पु० ) एक मद्रासी नाणें ।
हूल—( ना० स्त्री० ) हल्ला, भोसकणें, खुपसणें ।
हूलड़—( ना० पु० ) गडबड, दंगा, गोंगाट ।
हूलना—( स० क्रि० ) घुसविणें, ढकलणें, खुपसणें, हत्ती हांकणें ।
हूहा—( ना० पु० ) अफ़वाह ( हिं० ) खबर, बातमी, ऐकीव बातमी, कंडी, वाद्ळ ।
हे—( अ० ) अरे, अहो ।
हेंकारना—( अ० क्रि० ) हंबरणें, हंबरडा फोडणें ।
हेंगा—( ना० पु० ) शेत सारखें करण्याचें लाकूड, हेंगा ।
हेकड़—( वि० ) बलवान, दांडगा, धष्टपुष्ट ।
हेकडी—( ना० स्त्री० ) बल, शक्ति, ताकद ।
हेठ—( अ० ) नीचे ( हिं० ) खालीं, खालच्या बाजूला ।
हेठा—( वि० ) बुजदिल, नीच ( हिं० ) भित्रा, शेळपट, आळशी, नीच ।
—पन-( ना० पु० ) भित्रेपणा, शेळपटपणा ।
हेत—( ना० पु० ) सबब ( हिं० ) कारण, हेतू ।
हेरना—( स० क्रि० ) खोजना ( हिं० ) हुडकणें, पाठलाग करणें, पहाणें, नजर ठेवणें ।
हेरफेर कर—( अ० ) आख़िरकार (हिं०) सरते शेवटीं ।
हेलाना—( अ० क्रि० ) तैरना ( हिं० ) पोहणें, पोहून पलीकडे जाणें ।
हेलमेल—( ना० पु० ) परिचय, दाट मैत्री, सलगी ।
हेला—( ना० पु० ) अनादर ।
हेंगा—( ना० पु० ) "हेंगा" पहा ।
हैक—( ना० पु० ) घोड़ा ।
हैकल—( ना० पु० ) चांदी किंवा सोन्याच्या मोहोरांची माळा ।
हैज़ा—( ना० पु० ) पटकी, कॉलरा ।
हैरत—( ना० स्त्री० ) आचरज ( हिं० ) आश्चर्य, अचंबा ।
हैरान—( वि० ) परेशान ( हिं० ) गोंधळलेला, त्रासलेला, चिडलेला ।
हैरानी—( ना० स्त्री० ) परेशानी ( हिं० ) त्रास, चित्तविक्षेप, गोंधळ ।
हैवान—( ना० पु० ) जानवर ( हिं० ) जनावर, पशु ।
हैवानियत—( ना० स्त्री० ) पशुत्त्व, पशुता ।
हैवानी—( वि० ) पशूचा, पशु संबंधी ।
हैसियत—( ना० स्त्री० ) सामर्थ्य, साधन, प्रतिष्ठा, चेहरा ।
होंकना—( अ० क्रि० ) हाँफना ( हिं० ) धापा टाकणें, हुशूशू करणें ।
होंठ—( ना० पु० ) ओंठ ।
होड़—(ना० स्त्री०) बाजी, शर्त (हिं०) पैज, पण, प्रतिज्ञा ।
होड़ल—( ना० पु० ) अभ्रक ।
होत—( ना० स्त्री० ) कुवत, साधन ।
होतव } ( ना० स्त्री० ) भावी ( हिं० ) नशीव, दैव ।
होतव्यता }
होनहार—( वि० ) होतकरू, होणारे, भावी ।
होना—( अ० क्रि० ) असणें, होणें ।
होमना—( स० क्रि० ) हवन करणें, यज्ञ करणें ।
होला—( ना० पु० ) फुटाणे, एक प्रकारची नाव ।
होली—( ना० स्त्री० ) होळी ।
होहल्ला—( ना० पु० ) "हुल्लड़" पहा ।
होश—( ना० पु० ) समझ (हिं०) समज, समजूत ।
होशमंद—( वि० ) बुद्धिवान ।
होशियार—( वि० ) हुषार, शहाणा, काळजीचा ।
हौज़—( ना० पु० ) हौद, पीप, पाण्याच्या साठयाचें भांडें ।
हौदा—( ना० पु० ) हत्तीवरील अंबारी ।
हौल—( ना० स्त्री० ) भीति, महाभय, अतिभय ।
—दिल-( वि० ) भयभीत, उदास ।
—नाक-( वि० ) भयंकर, भयानक ।
हौले—( अ० ) धीरे ( हिं० ) हळूहळू, सावकाश ।

हौवा—( ना० पु० ) बाऊ, बागुलबोवा, प्रेत, पिशाच ।
हौसिला—( ना० पु० ) कुवत, महत्वाकांक्षा, इच्छा, जोम ।
—मन्द—( वि० ) महत्त्वाकांक्षी, जोमाचा ।

## च्

च्ई—( ना० स्त्री० ) क्षयी ( हिं० ) क्षय ।
च्रीरी—( वि० ) दूधिया ( हिं० ) दुधाळ ।
च्रौण—( ना० स्त्री० ) धरती ( हिं० ) पृथ्वी ।



# हिन्दी भाषेंतील कांहीं वाक्-संप्रदाय

## अ

अंकुस मारना—ताब्यांत आणणें।

अंधेरे घर का उजाला—एकुलता एक मुलगा, नवसाचा मुलगा।

अक्खोभक्खो—दुष्ट।

अक्ल खर्च करना—शहाण पणानें वागणें।

अक्ल चक्कर में आना—गडबडून जाणें, गोंधळून जाणें

अक्ल जमाना—विचार करणें।

„ दौड़ाना— „ „

अक्स खींचना—फोटो घेणें।

अगाडी मारना—शत्रूचा पराजय करणें, अपशकुन करना।

अग्नि देना—( प्रेताला ) अग्नि देणें।

अग्नि का पानी हो जाना—थंड पडणें, शान्त होणें।

अचम्भा-अचरज करना—आश्चर्य करणें।

अचार डालना—जतन करून ठेवणें, सांठविणें ( तुच्छतार्थी )।

अच्छा कहना—कबूल करणें।

अज़ाब में फंसना—संकटांत पडणें।

अज़ाब मोल लेना—स्वतःवर संकटें, आढवून घेणें, विकतचें श्राद्ध घेणें।

अटवाटी खटवाटी लेना—आजाराचें सोंग घेऊन रागावून आंथरूणावर पडून राहणें।

अटेरन कर देना—हड्डी नरम करणें।

अएटाचित्त होना—अनपेक्षित खबर ऐकून आश्चर्यानें भान भुलून जाणें।

अदना व आला—राव व रंक।

अदब करना—आदर करणें।

अदवायन खींचना—वाजलें आवळणें।

अदा-इ-ख़िद्मत—( ना० ) कर्तव्य बजावणें।

अदा-इ-जर—( ना० ) पैसे चुक्ते करणें।

अदा-इ-देन—( ना० ) देणें फेडणें, कर्ज देणें।

अदा-इ-मालगुजारन्स—सारा देणें।

अदा-इ-लगान—( ना० ) भाडें देणें।

अधिकार जताना—अम्मल गाजविणें, अधिकारावर रहाणें।

अधूरा जाना—असमय गर्भ-पात होणें।

अनजान बनना—अज्ञान पांघरणें।

अनर्थ करना—पाप करणें, जुलूम करणें।

अनसुनी करना—टाळाटाळी करणें, न ऐकल्या सारखे दाखविणें।

अन्तडियों में आग लगाना—अत्यन्त भूक लागणें।

अन्धा करना—फसविणें।

अन्धेर मचाना—जुलूम करणें, अत्याचार करणें।

अपना गाना गाना—आपलीच स्तुति करणें, दुसऱ्याचें, न ऐकणें।

अपने को मानना—स्वतः ला मोठें समजणें, गर्व करणें।

अपने खयाल में मस्त होना—दुसऱ्याची किंमत न राखणें।

अपने मुँह—( अ० ) आपल्या तोंडून।

अपने हाथों—( अ० ) आपल्या हातानें।

अपने हाथों कुल्हाड़ी मारना—आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा मारून घेणें।

अपराध लगाना—दोष लावणें।

अपराध होना—दोष असणें।

अबतर करना—बिघडविणें।

अबतर होना—नाश पावणें, बिघडणें।

अबतब करना—टाळणें, विलंब करणें।

अबतब होना—मरावयास टेकणें।
अमानत में खियानत—ठेव खाऊन बसणें।
अयाल व अतफ़ाल—मुलबाळांचा परिवार।
अलअनकमा कान—पूर्वी प्रमाणें, नेहमीं प्रमाणें, पूर्ववत्।
अल्ल वल्ल बकना—मूर्खपणानें बोलणें।
आँख उठाकर न देखना—गर्विष्ट होणें, लाजाळू होणें।
आँख ऊँची न होना—लाजणें, दृष्टी वर न होणें ( वाईट अर्थी )
आँख का पानी ढलना—निर्लज्ज होणें।
आँख खुलना—डोळे उघडणें, समजणें।
आँख चढ़ना—डोळे ताठणें, डोळे ताटकळणें।
आँखें चढ़ाना—रागावणें, झिंगणें।
आँख चीर के देखना / आँख चीर चीर देखना — रागानें पहाणें, अत्यंत लक्ष देऊन पहाणें।
आँख चुराना—लज्जेनें दृष्टी बाजूला नेणें, लक्ष न देणें, एकाद्याच्या दृष्टीला दृष्टी न भिडविणें, एकाद्याला टाळणें।
आँख झपकाना—डोळे मिचकावणें।
आँख न ठहरना—डोळे दिपणें।
आँख डबडबाना—डोळे भरून येणें।
आँख डालना—एकाद्या गोष्टींत मन घालणें।
आँख दाबना—डोळ्याच्या खुणेनें रागें भरणें किंवा बंदी करणें।
आँख दिखाना-दिखलाना—भिवविणें।
आँख देख के कुछ करना—दुसऱ्याच्या परवानगीनें एकादी गोष्ट करणें, कळ पाहून वागणें।
आँख देखना—हुकुमाची वाट पहात बसणें, ( वरिष्ठाच्या हुकुमाची, थोराच्या आज्ञेची किंवा गुरुजींच्या उपदेशाची उपेक्षा करून त्यांच्या कडे लावलेली दृष्टी )
आँख फड़कना—डोळा लवणें।
आँख फूटना—आंधळा होणें।
आँख फूटी पीर गई—रात्र गेली आणि पीडा टळली।
आँख बचाना—दुसऱ्याचा डोळा चुकविणें।
आँख बराबर न कर सकना—डोळ्यालाडोळा न लाविणें।
आँख भर के देखना—डोळे भरून पहाणें।
आँख भर लाना—डोळे भरून आणणें।
आँख मिंच जाना—मरणें, डोळे मिटणें।
आँख लड़ाना—उद्दाम दृष्टीनें पहाणें।
आँखें नीली पीली करना—रागानें लाल होणें।
आँखें सामने करना—निर्लज्जपणानें वर तोंड करणें, लाज न वाटणें।
आँखों पर बिठाना—आदर करणें, मानणें।
आँखों में ख़ाक डालना—डोळ्यांत धूळ फेंकणें, फसविणें।
आँखों में चरबी छाना—गर्विष्ट होणें।
आँखों में रात काटना / आँखों में रात ले जाना — जागून रात्र काढणें, रात्रभर जागणें।
आँसू बहाना—अश्रू ढाळणें।
आँसू पी जाना—अश्रू गिळणें।
आँसू पोंछना—अश्रू पुसणें, शांतवन करणें।
आँसू भर लाना—डोळे भरून येणें, रडणें।
आकबत-अंदेशी करना—पुढील तजवीज करून ठेवणें।
आग उठाना—कलह अथवा उपद्रव उत्पन्न करणें।
आग बबूला होना—अत्यंत क्रुद्ध होणें।
आग भड़काना—कलह वाढविणें, क्रोध आणि शोक वाढविणें।
आग देना—( प्रेताला ) अग्नि संस्कार करणें।
आगम बांधना—भविष्य सांगणें किंवा करणें।
आगा तागा लेना—बारकाईनें पहाणें।
आगा पीछा करना—कांकूं करणें, मागें रेंगाळणें।
आगा पीछा सोचना—पूर्ण पणें विचार करणें।
आजकल करना या बताना—चुकविणें, टाळणें।
आटा गीला होना—संकटांत पडणें।
आटे में नोन—फार थोडें, विशेष नाहीं।
आत्मा ठंढी करना—समाधान करणें।
आत्मा सताना—चिडविणें, त्रास देणें।
आदमी बनाना—सुधारणें, शिस्तीला लावणें, रीतभात लावणें।

